## *अशी रंगली कथा—*

महाकाव्यांत महाभारत आणि रामायण ही दोन अत्यंत आवडती ! शतकानुशतकें ती गायली जात आहेत. महापुराण हेंही असेंच अमर महाकाव्य ! तें मराठीतून इतक्या संक्षेपीपणें कुणी मांडलें नव्हतें. माझ्या मौनकाळांत त्या ग्रंथाचे वाचन चालू असतां मला ग्रंथलेखनास प्रवृत्त करणारे माझे परम स्नेही श्री. हिरालाल व्होरा आणि बंधुतुल्य श्री. सुमेरजी यांनी मला ती कथा मराठी वाचकांपुढें सुरस भाषेंत ठेवण्यास विनती केली. माझ्यावरील त्यांच्या लोभामुळें त्यांचा आग्रह ठीक, पण हजारो श्लोकांतून वर्णिलेली कथावस्तुनिवडून वेचक भाग वाचकासमोर ठेवणें अत्यंत अवघड होतें. लिहावयाचे मान्य केलें तरी त्यात महापुरुषाची कथा सांगण्याच्या भक्तीचाच अंश जास्त होता. मी मराठी साहित्याशी अपरिचित बाई-माणूस ! यांत माझें कर्तृत्व नसून भक्तीचें बळच आहे. ' पुण्यवंत व्हावें घेतां सज्जनाचीं नांवें ' या तुकोबांच्या वचनाचा आधार घेऊन मी आदिपुरुषाची जीवनगाथा लिहिणें चालू केलें .

माझ्या या मृत्तिकेच्या घटांत जीवन-अमृताचा सांठा आहे. मृत्तिका ती मृत्तिकाच ! थोर पुरुषाच्या जीवनगाथेच्या आधारानेच माझे शब्द जिवंत झाले. त्यांना अर्थ आला. गाथेचें सौष्ठव आणि लालित्य मला काय ठाऊक ! भक्तीनें वेड घेतलें. त्या वेडया भक्तीनेच ही कथा लिहून पुरी केली.

कथा लिहिण्यापूर्वी कथावस्तु कशी असावी, कोणकोणते प्रसंग निवडले जावेत, कोणकोणत्या ग्रंथांतून ते प्रसंग आलेले आहेत याची कथाकार श्री. सुमेरजी आणि साहित्यप्रेमी श्री. व्होराजी यांच्याशी चर्चा होई. त्यांतून कथावस्तूला अधिकच रंग चढे, भावविवश होऊन श्री. सुमेरजी अनेक पात्रांचे सूक्ष्म मनोविश्लेषण करीत. मला उत्साह येई. कधी कधी तर " अद्यापि दिवा कसा मालवला गेला नाही ' म्हणून माझ्या आश्रमांतील कार्यकर्त्या श्रीमती विद्युल्लता खोलीत येत व मी लिहिण्यात गढून गेलें आहे हे पाहून थक्क होत. त्यावेळी रात्रीचे तीन वाजलेले असत.

महिनाभर अगदी भक्तीरसांत मी पोहत होतें. केवळ छंद होता— महापुरुषाच्या चरित्र-संकीर्तनात रमावे-देहभान विसरून जावें. एका महिन्यात कथा लिहून झाली. त्यानंतर तिचें वाचन सुरू झालें. स्थानिक पं. श्री. जिनदासजी शास्त्री यानी अनेक मौलिक सूचना केल्या. त्यामुळें प्रयास अधिकच सप्रमाणता आली. त्याचे आभार मानावें तेवढें थोडें आहेत.

महाकवि जिनसेन आणि पुष्पदंत यांनी लिहिलेल्या आदिब्रह्माच्या या मंगल कथेने माझ्यावर झालेले संस्कार काय आहेत हें सांगायचे झालें तर म्हणावें लागेल—

" सोनियाचे ताटी अमृताची वाटी "

वाचकांपुढें ही कथा सादर करीत आहे. त्यांनी ती गोड करून घ्यावी प्रमादामुळें कांही चुका राहून गेल्या असतील तर त्या क्षमा कराव्यात.

—लेखिका

हें ऐकून साऱ्यांना आनंद झाला. एक महर्षि म्हणाले, ' श्रेणिक, तू धन्य आहेस ! आम्ही जें विचारावं म्हणत होतों तेंच तू विचारलं आहेस. " दुसरे ऋषि म्हणाले– " श्रेणिक, तूं धर्माचं तत्व जाणण्याच्या इच्छेने सर्व जगाचंच ज्ञान करून घेण्याची इच्छा प्रदर्शित केली आहेस. तू धन्य आहेस. मेघाना आवाहान करणारा जगाच्या उत्कर्षालाच आवाहान करीत असतो. "

) तिसरे ऋषि म्हणाले– असाच प्रश्न भ. वृषभनाथांना सम्राट भरताने विचारला होता. तूहि अनेक वर्षांनी तोच प्रश्न कैवल्यमूर्ति भ. महावीराना विचारीत आहेस, तू धन्य आहेस "

त्या नंतर भ. महावीराचे प्रमुख शिष्य गौतमऋषि म्हणाले-" श्रेणिक, तुम्हा सगळ्याची इच्छा पूर्ण होईल. भगवान ऋषभ देवानी जी आत्मकथा त्याकाळी सम्राट भरताला सांगितली तीच मी तुला भगवंताच्यावतीने सांगत आहे. "

गौतमऋषींचें हें बोलणें अमृतासारखें सुखकारक वाटलें असेल यात नवल नाही. गौतमाची वाणी म्हणजे प्रत्यक्ष सरस्वती. त्याच्या शब्दातील माधुरी मधाच्या गोडीलाहि लाजविणारी. त्यांच्या डोळ्यातील तेजानं जणु सारी सभा उजळून निघाली होती. चेहऱ्यावरील भाव बोलतांना बदलत नसल्यामुळें मुखसौंदर्य जलेंच्या तसेंच शांत–गंभीर राही.

गौतमऋषि गंभीरपणे म्हणाले– " थोरऋषि वृषभनाथांचं जीवन चरित्र म्हणजे समुद्रासारखं विशाल. त्यातील जीवन–रत्ने सारीच हाती येतील असें नाही. पण जी हाती लागतील त्यानेंहि जीवन उजळून निघेल. त्यांच्या जीवनांत जें चांगले म्हणून गणले जाईल ते जगांतहि चांगले ठरेल. जें वाईट म्हणून मानलें गेलें असेल तें नेहमीच वाईट समजले जाईल म्हणून वरवरुन दिसणारी ही कथा म्हणजे प्रत्यक्ष धर्मच होय "

' यावर श्रेणिक म्हणाला– " हे प्रभू, जें चांगलं आहे तें ऐकायला माझे कान अधीर झाले आहेत. कथेच्या श्रवणाने माझं जीवन निष्कलंक होऊं द्या. "

क्षणभर गौतम मौन झाले. अमाप आनंद त्यांच्या नेत्रांतून ओसंडू

लागला. डोंगरातून नदीचा प्रवाह सळाळून वाहूं लागावा त्याप्रमाणें महा-
पुरुष आदिनाथ यांची जीवन कथा त्याच्या ओठांतून बाहेर पडू लागली.

० ० ०

काळ अनंत आहे. सर्वव्यापि आहे. त्या काळाच्या उदरांत समाविष्ट असलेली महान व्यक्ति म्हणजे आदिनाथ ऋषभ ! तो काळ फार फार सुखाचा होता. त्याच्या वडीलाचें नाव नाभिराज.

अनेक युगप्रवर्तकांतील नाभिराज हे आदर्श युगप्रवर्तक होत त्यांना ज्यावेळी जन्म झाला होता त्यावेळी आज दिसणारी भारतभूमि भोगभूमि होती. भोगभूमि म्हणजे स्वर्ग. केवळ सुखोपभोग हाच जीविताचा पुरुषार्थ ! सुखाची सारी साधनें उपलब्ध करून देणारे " कल्प-वृक्ष " त्याकाळी सर्वत्र पसरलेले होते. हवेहवे वाटणारे सर्व पदार्थ केवळ आठवण झाल्याबरोबर त्यांना मिळत. म्हणून कष्टाची सवय त्याकाळीं कुणाला नव्हती. शरीरहि वज्रासारखं मजबूत ! कितीहि उपभोग घेतला तरी जीर्ण न होणारं, म्हातारं न होणारं, कधीच न थकणारं ! रोग-राई नव्हती. विषमता नव्हती स्पर्धा नव्हती. व्यापार उदीम नव्हते. पोटाच्या मागे लागणारी गरजूतीच उदयाला आली नव्हती......

असलं वर्णन ऐकत असता सारा श्रोतृगण तल्लीन झाला होता. क्षणभर त्यांनाहि वाटलं की आपणहि त्याच जगांत आहोंत. जिथें स्पर्धा नाही-द्वंद्व नाहीं, धडपड नाही. "

तेव्हा श्रेणिकानें विचारलं- " असलं जीवन म्हणजेहि एक शिक्षाच नव्हे काय ? जिथें परिश्रम नाही-पुरुषार्थ नाहीं. "

गौतम म्हणाले, ' भद्र पुरुषा, हें सुख म्हणजे ही शिक्षाच

वृक्षांच्या शीतल सावलीत बसून मिळणारं हें सुखहि दुःखांत बदलत गेलं. हळुहळूं कल्पवृक्षांचा नाश झाला. पुण्याई लोपत चालली असें कां म्हणेनास!

कल्पवृक्षापासून सुख मिळत होत तें गेलं भुकेचा प्रश्न निर्माण झाला. सर्व लोक नाभिराजाकडे गेले. नाभिराजा म्हणाला, "आता तुम्हाला कष्टाची सवय झाली पाहिजे. कल्पवृक्षांवर अवलंबून राहून तुम्ही स्वस्थ बसू नका. चला, जंगलांत जाऊन उगवलेल्या फळा-फुलाची, धान्याची ओळख करून घेतली पाहिजे."

नाभिराजानें अनेक फळांचा परीचय करून दिला. इतकेच नव्हे तर ती फळें कशी खावीत हेंहि शिकविलें. मानवानें पहिल्यांदाच फळें चाखली तेव्हां त्याला काय वाटलें याची कल्पनाच केलेली बरी. त्याच प्रमाणे गाई आणि बैल या प्राण्याना माणसाळवून त्यांच्याकडून शेती कशी करवून घ्याची याचीहि कल्पना नाभिराजानें लोकाना करून दिली.

नाभिराजाचें घर म्हणजे विद्येचें माहेर बनलें. दैनन्दिन जीवनांत शेंकडों विघ्ने येऊं लागली. घरें बांधणीचा प्रश्न, विटा तयार करण्याचा प्रश्न, पाणी साठविण्यासाठी भांडी करण्याचा प्रश्न, आजारी लोकासाठीं औषधें तयार करण्याचा प्रश्न, असे शेंकडों प्रश्न उपस्थित होत होते. कुचं-बणा होत होती. नाभिराज हा जणु सार्वजनिक जीवनाचा पहिला नागरिक होता. त्याने अनेक प्रकारें लोक जीवनाच्या विविध क्षेत्रात नवीन व्यवस्था निर्माण केली

नाभिराजाचें शरीरहि तसेंच वज्रमय होतें भरपूर उंच बांधा, भरीव व सौष्ठव शरीर, पाणीदार सतेज डोळे, कुरळें केस आणि विशाल वक्ष यामुळ त्याचा चेहरा भव्य पण आकर्षक होता.

त्यामुळें आपोआपच त्याच्या विषयीं आदर निर्माण होणें साहाजिकच होतें. या सर्वांत श्रेष्ठ म्हणजे त्याची अचूक दृष्टि. कोणत्याहि प्रश्नाकडे पाह-ण्याचा त्याचा दृष्टिकोण हा लोकाभिमुख होता त्यामुळें त्यात जनकल्याण हाच मुख्य भाग असे.

यावर श्रेणिकानें मध्येंच विनयाने हात जोडून विचारलें " नाभिराज

त्याचं मूळचं नाव होतं की लोकांनी तें त्याला दिलं होत ? "

श्रेणिक उत्कृष्ट प्रश्नकर्ता होता. कोणत्याहि कथेतील गोडी वाढ-विण्याचें कार्य जितकें सागणाऱ्याचें असतें जितकें ऐकणाऱ्याचेहि असते.

त्यावर गौतम ऋषि म्हणाले, " लक्षावधि वर्षापूर्वी मानवाच्या उत्पत्तीची कथा वेगळी होती. ज्या स्त्री-पुरुषापासून मुलं जन्मत ती जन्मतःच दोन जन्मत असत. एक मुलगी व मुलगा. त्यांच्या जन्माने आईला प्रसूतीचा त्रास होत नसे. बाळन्तपण किंवा दाई यांची गरजच भासत नसे. परन्तु नाभिराजाच्या काळी स्थिति बदलली.

(प्रसूति म्हणजे काय? बाळन्तपण म्हणजे काय? दाईचे काय काम? हे सर्व नाभिराजाला शिकवावं लागलं. मूल जेव्हा जन्मास आलं तेव्हा त्याच्या बेंबीला जोडून एक कातडी ' वार ' ( नलिका ) असे. ती कापून तिची गांठ बांधून व नंतर पोट शेकून मुलाच्या जीविताची शाश्वती निर्माण करण्यांत नाभिराजानें आपलें कौशल्य खर्ची घातलें. देववाणीत ( संस्कृतांत ) नाभि म्हणजे बेंबी म्हणून लोक त्याला नाभिराज म्हणजे प्रसूति शास्त्राचा महान संशोधक म्हणू लागले.)

हे उत्तर ऐकून साऱ्यांना मोठी-मौज वाटली. मानवाने आपल्या ज्ञानाने अज्ञानाचा पडदा हळुहळू कसा दूर सारला याची कल्पना येऊन श्रेणिक आनंदित झाला.

त्यानंतर गौतम ऋषि. म्हणाले, " आपणास आजच्या स्थितिवरून इतक्या प्राचीन काळाची कल्पना पूर्ण रूपाने येणार नाही. एक अगदीच वेगळी मानवी संस्कृती दुसऱ्या संस्कृतीत परिवर्तन पावत होती. जुनी मूल्यें व नवी मूल्यें यांची गल्लत होणाचा तो प्रसंग होता. काळाप्रमाणें आचार-विचार बदलणें आवश्यक होते. बळजवरीने तसें करणें समाज धारणेच्या दृष्टीनें अनिष्ट झालें असतें. नाभिराजानें तें काम फारच चोख बजावलें. कोणाचेंहि दास्य न पत्करणाऱ्यांना, कसलेंहि बंधन ठीक वाटत नाही. राज्य-व्यवस्थाच तेंव्हा नव्हती. कुणाची काही चूक झाल्यास केवळ नापसंती दर्शीवणे हेच फार मोठी शिक्षा होती. ही नापसती केवळ " हा ! " या एका

शब्दाने दर्शविली जाई. केवळ याच एका शब्दाने मानवी व्यवस्थेच नियंत्रण होणं यालाच खऱ्या अर्थानं " स्वर्ग " म्हणता येईल.

परतु हळुहळू मानसिक पातळी खाली जाऊ लागली. तेव्हा " मा " या शब्दाचा वापर होऊं लागला. " मा " म्हणजे नको. असें करणे चूक असून तें तू पुनः करू नकोस.

पुढें पुढें एवढ्यानेहि भागेनासें झाले. मनें निर्ढावत गेली तशी शिक्षाहि वाढत गेली. एकमेकाचा शाब्दिक धिक्कार करण्यापर्यंत मजल गेली.

नाभिराजाच्या उत्तर आयुष्यांत लोकाना शारीरिक सजा करण्याची पाळी त्यावर आली होती.

लोकांत भाडणें होऊ नयेत म्हणून फळांची झाडें त्याने वाटून दिली होती. एका व्यक्तीनें आपली सारी झाडें तर सम्पविलीच त्यानन्तर त्याची दृष्टी शेजाऱ्याच्या झाडाकडे वळली. खरे म्हणजे त्याने शेजाऱ्याला विचारून ते कार्य करावयाचें होते पण तसें झाले नाही तक्रार नाभिराजाकडे आली. नाभिराजाला फार वाईट वाटलें. त्याने विचार केला– फळे ही खाण्याची वस्तु. त्यासाठी एखाद्याला दुसऱ्यावर अन्याय करण्याची पाळी यावी ना! पण घालून दिलेला नियम पाळला नाही तर व्यवस्था ती काय उरली? नाभिराजाने दोघाना समजाऊन सांगितलें.

नाभिराजाला मिळालेला " राजेपणा " हा कुणी अभिषेक करून दिला नव्हता. तो सर्वाचा अनभिषिक्त राजाच होता. कुळपरंपरेनेहि राजेपणा त्याला कुणी बहाल केला नव्हता. असें असताना स्वत.च्या अंगच्या विविध गुणांनी त्यान लोकांना आकर्षित केलं. राजा जसा प्रजेचं पालन करतो तसं प्रजेचे पालन त्यानें केलें. प्रजेवर पितृवत् प्रेम केल्या शिवाय प्रजा राजावर-प्रेम करीत नाही.

अशा नाभिराजाच्या पोटी चरित्र नायक ऋषभदेवांचा जन्म झाला

गौतम म्हणाले—श्रेणिका, मानवाचें जीवन अनेक जन्मांतून घडत असतें. शेंकडों जन्म घेतल्यावरहि मानवाची बुद्धि स्थिर होत नाहीं. सारासार विवेक निर्माण होत नाही. ज्या आदिनाथाचं चरित्र मी सांगणार आहे तोहि अगदी तुमच्या आमच्या सारखा साधा माणूस होता. पण त्यानं साधना केली. जीवन उज्वल बनविण्याचा प्रयत्न केला. जीवन हें मडक्यासारखं असतं. त्याला कुंभार जसा आकार देतो तसें तें बनतें.

अशाच एका पूर्व जन्माची गोष्ट आहे आदिनाथाची.

या जंबुद्वीपांत गंधिल नांवाचा देश होता. धनधान्यानें समृद्ध. निसर्ग तर नुसता बहरला होता. पोपटांची रांग आकाशांतून खाली उतरतांना पाहून रक्षकांना वाटे जणु पाचूचे तोरणच आकाशांत कुणी बांधलें आहे.

घराघरांतून बालकांच्या हास्य विनोदाचे आवाज बाहेर येत सर्वत्र स्त्रिया सुंदर असल्याने परस्पराविषयी सारखाच आदर निर्माण येत होता.

त्या देशात अलका नावाचं सुंदर शहर होतं. स्वर्गातील सौख्यानं समृद्ध असं शहर. बाजूला विजयार्ध नावाचा मोठा पर्वत. त्या पर्वताच्या पूर्व-पश्चिम उतरणीवर विद्याधर जमाती राहात होत्या. या जामातीचें वैशिष्ट्य म्हणजे विद्येच्या सहाय्यानें ते विमान तयार करीत. त्यांच्या घराची रचना सर्वाहून वेगळी असे. इतराना मिळणें कधीच शक्य नाही असें सुख ते उपभोगीत असत. विमानात बसून या देशांतून त्या देशांत नेहमी फुलपाखरासारखं हिंडणं हेंच त्यांचं काम.

त्या अलका नगरीत आदिनाथाचा जीव महाबल नावाचा राजा होऊन जन्मला. त्याच्या वडीलाचं नाव अतिबल. अतिबल कितीहि पराक्रमी असला तरी त्यानं इतर राज्यावर कधी स्वारी केली नव्हती. प्रजेकडून होणाऱ्या चुकाना स्वतःच्या मुलाने केलेल्या चुका मानून तो क्षमा करी. त्यामुळं सारं गांव म्हणजे एक कुटुंब असं स्वरूप त्या गावाला आलं होतं. नाही म्हणायला त्यागांवांत अनेक जातीचे, अनेक धर्माचे, अनेक स्वभावाचे, चालीरीतीचे लोक होते. परन्तु अशा वैचित्र्यांतहि त्यांचे भ्रातृत्व टिकून होतें.

एके दिवशीं महाबलाचे वडील वनांत फिरावयास गेले होते. विविध फळाफुलांनी सृष्टि नटून बसली होती. जणुं तिला माहित झालं होतं की आज आपला " पति " येणार आहे कारण राजाला संस्कृत मध्यें ' भू-पति ' असं म्हणतात. तें कांहीं खोटं नाही.

तळ्याच्या कांठावर बसून तो तळ्यांतील कमळांची शोभा पहात होता. अनेक भुंगे कमळावर गुंजारव करीत होते. कमलदलाचा रस चाखण्यांत ते गढून गेले होते. इतक्यात एका कमळांत मेलेले कांही भुंगे राजानें पाहिले. त्यानें आपल्या स्वयंबुद्ध नावाच्या मंत्र्यास विचारलें " हा भुंगा का मरून पडला आहे ? "

मंत्री म्हणाला, ' महाराज, हें सूर्य विकासी कमळ आहे. सूर्य अस्तास चालला म्हणजे ह्या कमळाच्या पाकळ्या बंद होतात. मध्याकाळ झालेली त्यांच्या लक्षांत येत नाही. इतका तो लोलुप झालेला असतो. कमळ मिटल्यावर आंतल्या आंत तो मरून पडतो. '

त्यावर राजा म्हणाला, ' भुंग्याला कठीणांत कठीण अशी लाकडें फोडून टाकण्याची कला अवगत आहे. मग त्याला हे कमळदल छेदून बाहेर कां पडतां येऊ नये ? ' "

" महाराज, आपण पूर्ण विवेकी आहांत. मी कांही सांगावे असें नाही. कसल्याहि मोहाला जिंकणें यासाठी फारमोठी मानसिक शक्ति लागते. ती शक्ति मानवांत देखील दिसून येत नाही; मग तर हा क्षुद्र कीटक आहे. म्हातारपण आलं तरी भोगलालसा सपत नाही असें कितीतरी लोक या जगांत आहे. "

राजाला वाटलं हें वाक्य मंत्र्याने स्वतःलाच उद्देशून म्हटलें आहे. राजान रात्रभर विचार केला.

त्याचंहि जीवन त्याला भुंग्यासारखं क्षणभंगुर वाटलं. गेली अनेक वर्षे तो असाच सुखात–उपभोगात–मोहांत गडून गेला होता. त्या रेशमी कोशांतून त्याला बाहेर पडायला वेळच मिळाला नव्हता. त्यानं ठरविलं की हा राज्याचा भार मुलावर सोंपवायचा.

दिवस उजाडतांच त्यानं आपल्या आवडत्या मुलास–महाबल यास बोलावून घेतलें.

महाबलानें वडीलांना विनयाने नमस्कार केला व त्याच कुशल विचारल. वडील म्हणाले, " मुला, माझं सर्व कुशल आहे. तूं आता तरूण झाला आहेस. मी ठरवलं आहे कीं तुला राज्यपद देऊन जंगलांत निघून जावं. तेथें आत्म्याचा विचार करावा. संपूर्णपणें संन्यस्त जीवन व्यतीत कराव. "

महाबलाच्या डोळ्यात अश्रू उभे राहिले. ज्या वडीलानी सपूर्ण आयुष्यात कधी जमीनीवर पाऊल ठेवलं नाहीं, दु:ख काय तें पाहिलं नाही, ते जंगलात कसें राहतील ? ऊन, पाऊस, थंडी यांपासून कसं संरक्षण करतील, या विचारानं तो दु:खी झाला. वडीलांच्या गुडघ्यांत डोके घालून तो रडूं लागला. वडीलांच्याहि ममतेला पाझर फुटला. ते म्हणाले, ' अरे ' जें एकदा होणार आहे त्याचीच मी तयारी करीत आहे. हा व्यामोह मी सोडणार सोडणार म्हणत होतो, तो आज सोडत आहे.

मुलाला धीर देवून वडीलांनी त्याचा राज्याभिषेक केला. सर्व प्रजेला, दान–दक्षिणा देऊन संतुष्ट केलं. त्यानंतर स्वत: केवळ एका वस्त्रानिशी त्याने गृहत्याग केला.

० ० ०

महाबलाची राज्य करण्याची रीत आई जसं घर चालवते तशी होती. प्रजा सुखानं राहात होती.

एके दिवशी त्याचा वाढ दिवस साजरा होत होता. शहराला निराळीच शोभा प्राप्त झाली होती. विद्याधरांनी विमानांतून फुलांचा वर्षाव करावयास सुरुवात केली. नृत्यांगनांनी आपल्या पायांतील नूपुरांनी सारं आकाश व्यापून टाकलं. सारे रस्ते, चौक आणि घरें मांगल्यानी भरून गेले.

राजा महाबल सिंहासनावर बसून होता. त्याच्या भोवती त्याचे मित्र आसनावर बसलेले होते. सभेतील लोक आपआपल्या शुभेच्छा प्रदर्शित करून महाबलास नजराणे देत होते. त्याच्या आयुष्याची व आरोग्याची वाढ होवो अशी सदिच्छा ते बोलून दाखवित होते. राजाहि आनंदित झाला होता. सर्वांचा यथायोग्य सत्कार होत आहे की नाही इकडे त्याचे बारीक लक्ष होतें.

अशाप्रकारे उत्सव चालू असतां महाबल राजाने स्वयंबुद्ध मंत्र्याला विचारलं, " तुम्ही अनेक शास्त्रांचा अभ्यास केला आहे. तेव्हा आजच्या या वाढदिवसाचं तुमच्या दृष्टीनं तुम्ही कसं मूल्यमापन करतां ? "

सारी राजसभा मंत्री काय उत्तर देतो हें ऐकण्यास उत्सुक झाली.

मंत्री म्हणाला, " राजन्, मेघाशिवाय वृष्टि होत नाही; बीजा–

शिवाय वृक्ष होत नाही, छत्री शिवाय सावली दिसून येत नाही, तसंच पुण्या-शिवाय हे वैभव पहावयास मिळणं शक्य नाहीं. हें वैभव भोगावयास मिळणें किंवा पहावयास मिळणं यालाहि पुण्यच कारणीभूत आहे. "

त्यानंतर राजानं दुसऱ्या, महामती नांवाच्या मंत्र्याला विचारलं, " या संबन्धी आपलं काय मत आहे. "

महामती हा चार्वाक मताचा होता. पुण्य-पापावर त्याचा विश्वास नव्हता हें महाबल जाणून होता. विचार-विमर्षातूनच खरं तत्व बाहेर पडतं म्हणून तो नेहमी अशी चर्चा करीत असे.

महामती म्हणाला, ' राजाधिराज, सत्य म्हणून बोलावयाची प्रतिज्ञा असल्याने माझ वचन आपणास न पटल्यास मला क्षमा करावी. माझ्या मतें आत्मा-जीव, पुण्य-पाप या गोष्टी खऱ्या नाहीत. तांदूळ, द्राक्षाचा रस हे पदार्थ सडवून त्यांच्या ठिकाणीं जशी मादकता निर्माण होते तशीच नेमकी गोष्ट जीव जन्मतांना होते. माणूस मेला की त्याचं कांहीच उरत नाही "

सभेंत एकच हंशा पिकला. दोन्ही मंत्री महाविद्वान होते. एकमेकाचे मुद्दे कसे खोडावेत, आपले मुद्दे कसे मांडावेत हें बोघांनाहि फारच चांगलें माहित होतें.

तिसऱ्या शतमती नांवाच्या मंत्र्याची पाळी आली. तो शून्यवादी होता. तो म्हणाला, ' हे सारं जग म्हणजे माया आहे. जें जें आपण पाहतो तें सर्व खोटं आहे. जितका उपभोग खोटा तितकं पापपुण्य हि खोटं. मृगजळाच्या पाठीमागें लागून ज्या प्रमाणं तहाण भागणं शक्य नाही, त्या प्रमाणं आत्मा-मोक्ष, पुण्य-पाप, याच्या मागे लागूनहि काहीं हाती येणार नाही.

अशा प्रमाणें हा वाद फारच रंगत गेला. कुणी कुणास हार जाणारा नव्हता. महाबल राजानें यासर्व दृष्टिकोणाचा विचार पूर्वीच केला होता. तो म्हणाला-- " सभासद हो, हा वाद-विवाद ऐकून तुमची केवळ करमणूक व्हावी हा माझा हेतू नव्हता. प्रत्येक विचारांत सत्यांश आहे. हें मान्य करूनहि प्रत्येक दृष्टीकोण म्हणजे जीवनाचें संपूर्ण कोडें उलगडणारें तत्वज्ञान आहे असें समजणे शहाणपणाचें होणार नाही. " इत्यादि अनेक गोष्टी सांगून

त्यानें जीवनाकडे पाहण्याच्या वेगवेगळ्या दृष्टीकोणांचा सभेला परिचय करून दिला.

त्यादिवशीं सारी आमंत्रित मंडळी राजा बरोबरच जेवली. परततांना राजानें प्रत्येकास खूप धन देऊन त्यांच्या त्यांच्या हुद्याप्रमाणें त्यांचा निरोप घेतला. हा उत्सव अलकापुरीत "न भूतो न भविष्यति " असा झाला.

० ० ०

महाबलाचें स्वयंबुद्ध मंत्र्यावर फार प्रेम होते. स्वयंबुद्धाच्या ठिकाणी दिसून येणारी निस्वार्थी प्रवृत्ति व तत्व प्रतिपादन करतांना सत्याकडे उघड्या डोळ्यांनी पाहाण्याची निडरवृत्ती या दोन गोष्टीमुळें महाबल खुष असे.

सुखोपभोगांची विविध व विपुल सामुग्री जवळ असतांना केवळ 'कर्म-भोग' म्हणून शांत–चित्तानें जीवन कठणें फारच थोड्यांना जमते विका–रांच्या पेटत्या ज्वालांत भुंग्याप्रमाणें न जळून जातां, भोगाच्या मोहक रेशमी जाळ्यांत माशाप्रमाणे न अडकतां महाबलानें आपलें जीवन आदर्श बन–विलें होतें.

० ० ०

एके दिवशी राजवाड्यांच्या गच्चीवर बसून महाबल आपल्या राणी–बरोबर गप्पा गोष्टी करीत बसला होता. चंद्रकिरणांनी सारी पृथ्वी न्हाऊन निघाली होती. इतक्यांत महाबलानं म्हटलं—

" अशा रम्य, प्रशांत वेळी उत्कृष्ट गायिकेचे मधुर आलाप कानीं पडतील तर काय बहार होईल. "

राजाची इच्छा पूर्ण होण्यास कितीसा वेळ लागणार. राणीन घन्टीचा टोका घेऊन घन्टीवर आघात केला. त्यासरशी प्रतिहारी ( नोकर ) धांवत तेथें आला.

" काय आज्ञा आहे, महाराज " त्यान नम्रतेनं विचारणा केली.

" नीलप्रभा नांवच्या गायिकेला जाऊन सांग की महाराज तुझ्या संगीतासाठी वाट पहात आहेत, " राणीने नोकराला सांगितलें.

आज्ञा ऐकून नोकर पळत जाईल अशी राणीची खात्री होती. पण तो मान खाली घालूनच उभा होता.

" अरे, तूं अजून इथंच उभा कां ? "– राणीनं विचारलं.

" महाराज, नीलप्रभेचा स्वर्गवास आज दुपारी झाला असून तिला अग्निसस्कार देऊन लोक नुकतेच परतले आहेत. "

नोकराकडून ती बातमी कळतांच महाबल राजाचं विवेकी मन जागृत झालं. कारण कालच त्यानं नीलप्रभेच्या आवाजावर खूप होऊन तिला भर-पूर रत्नाभरणें बक्षीस दिली होतीं. अगदी कोवळ्या वयाची गायिका म्हणून ती दरबारांत आली होती.

राजा खिन्न झाला. आयुष्याची अस्थिरता त्यानं पाहिल्यांदाच अगदी जवळून पाहिली होती. जीवन प्रवाहाचा ओघ वाहून जात असून गेलेला क्षण जातांना जणु मृत्यूची आठवण करून देत आहे असें त्यास वाटलें एकीकडे तीव्र जीवनासक्ति व दुसरीकडे जीवनाची क्षणभंगुरता या दोन परस्पर विरोधी गोष्टीचा मेळ कसा बसणें शक्य आहे ?

राजानं राणीला म्हटलं– " तूं जा. झोप. मला कांहीं काळ एकट्या–लाच इथं राहूं दे. "

राणीनं महाराजांना वन्दन केलं व ती तेथून निघून गेली.

सकाळी त्यानं स्वयंबुद्ध नांवाच्या मंत्र्यास बोलावून घेतलें. इतक्या

सकाळीं त्यानं मंत्र्याला कधीच बोलावलं नव्हतं. मंत्र्यालाहि कांहीच समजेना.

आल्याबरोबर मंत्र्याने राजाला अभिवादन करून म्हटलें " आपल्या सवेंत मी हजर झालो आहे. काय आज्ञा असेल ती करावी "

राजा ह्मणाला, " हें सारं राज्य सोडून वडीलांनी जसा वनाचा मार्ग धरला तसा मीहि धरावा असें माझ्या मनाने घेतलें आहे. लोकहितासाठीं आयुष्यांतील अमोल क्षण मी घालविले आहेत. त्यानं लोकांचे हित झालें की नाही याचा अंदाज काढतां येण शक्य नाही. परन्तु माझ्या दृष्टीनं माझी अनेक नव्या दमाची वर्षें मी घालविलीं. स्वतःचं हितहि पाहणं माझ कर्तव्य आहे. "

" पण हें राज्य........"

मंत्र्याचे वाक्य पूर्ण होण्यापूर्वीच महाराज ह्मणाले, " हें राज्य ज्यांना हवें असेल त्यांनी पुढें यावे. सर्वांच हित समोर ठेऊन तें चालवावें. "

० ० ०

अनेक तऱ्हेनें विचार झाला. महाबलाच्या विचारांत अस्थिरता नव्हती. जियें लालसा असते—लोभ असतो—स्वार्थ असतो तियंच अस्थिरता असते. " मोठ्या उत्साहानं लोकांनी मला निरोप द्यावा. जनतेवर राज्य करण्यापेक्षांहि मोठें राज्य करावयास मी जात आहे आपण सारेच प्रवासी आहात. हा संसार म्हणजे काही माझें–तुमचे घर नव्हे. "

असा अनेक प्रकाराने महाबल राजाने जनतेला समजावून सांगितलें.

महाबल राजा जंगलांत गेला. सर्वस्वाचा त्याग त्यानं केला. इतकंच नव्हे तर तपानं त्याच शरीर अगदी वाळून गेलं.

एके दिवशीं एक दिव्य ज्योत त्यां देहांतून बाहेर पडून स्वर्गस्थ झाली.

० ० १

## स्वर्गीय सुखाचे दान

स्वर्गस्थ झालेला महाबल स्वर्गामध्ये ललितांग नावाचा देव होऊन जन्मला. स्वर्गातील जन्माची तऱ्हाच वेगळी. तेथील जन्म आई–बापा पासून होत नाही. कारण देवाची शरीरे रक्त–मांस–हाडे–आतडे यांची बनलेली नसतात. म्हणूनच त्यांना म्हातारपण नसते.

फुलांच्या राशीत त्याचा जन्म झाला. फारच थोड्या वेळांत त्याचे शरीर तरुण झाले. जन्मतःच त्याच्या गळ्यात सुंदर फुलांची माळ होती. त्याचे सारे शरीर सुगंधाने दरवळत होते. क्षणभर त्याला काहीच कळाले नाही. " मी इथे कसा आलो ? कोठून आलो ? ही फुलांची सेज इथे का आहे ? हा पायांतील चाळांचा आवाज कोणाचा आहे ? या इतक्या सुंदर सुंदर स्त्रिया इथे का उभ्या आहेत ?"

अशा विचारात थोडा वेळ जातो न जातो तोच त्याला देवाला जन्म-*तःच होणाऱ्या अवधि नावाच्या ज्ञानाने त्याच्या प्रश्नांची* उत्तरे त्याला मिळाली.

काही देवांनी त्याच्याशी मैत्री केली. त्याला स्नान करण्यास सांगितले.

नतर स्वर्गातील विविध व्यवस्थेचा त्याला परिचय करुन दिला. नाट्यशाळेंत चाललेलें देवांगनेंचे मधुर नृत्य त्यानें पाहिले.

त्या नंतर त्याच्या वाटणीस आलेल्या चार हजार अप्सराचा त्याने परिचय करुन घेतला सान्याच अप्सरा एकाहून एक सुदर होत्या नृत्य, सगीत, नाटक, यांत त्या प्रविण होत्या. त्या सर्व अप्सराच्या सहवासात हजारो वर्षे कशी निघून गेली हें त्यास मुळीच कळाले नाही

त्या सर्व अप्सरा–समूहांत स्वयंप्रभा नावाची अप्सरा फारच विलोभ–नीय होती. शृगार, प्रणय, भोग याहूनहि श्रेष्ठ असा विवेक आणि विनय तिच्या जवळ होता. स्वयंप्रभेचा त्याला इतका लळा लागला की पुढच्याही जन्मात तीच पत्नी व्हावी असे विचार त्याने तिला बोलून दाखविले ऋणा-नुबध ही अशीच गोष्ट आहे. कोणत्या जीवाशी कसा सबध येईल हे सागता येत नाही.

स्वयंप्रभा ही देखील ललितागावर बेहद् खूप होती. दोघांनी किती क्रीडा करावी, थट्टा–मस्करी करावी, मनो–विनोद करावा याला पारावारच उरला नव्हता. मानवी देह हा भोगाला अपुरा असतो. रोग, चिंता आणि कमकुवतपणा यामुळं निश्चितपणे भोगांना भोगताच येत नाही. उलट देहच जीर्ण होतो व मरण जवळ येतें.

स्वर्गीय सुखात हें घडत नव्हते. तारुण्याला मर्यादा नव्हती. भोगाच्या साधन–सामुग्रीला अंत नव्हता. सामर्थ्याला सीमा नव्हती. दोघेही काम–क्रीडेच्या कलेंत तरबेज कधी हिमालयावर तर कधी अनत आकाशात, कधी नंदीश्वर द्वीपात, तर कधी मेरू पर्वतावर विहार करण्यात दोघे देहभान विसरुन जात.

अशा प्रकारें मानवी चिंतनाच्या कक्षेबाहेरील अमर्याद, असीम, अव्या-बाधित सुख भोगण्यात हजारों वर्षे निघून गेली तरी ललितागास त्याचा पत्ता लागला नाही.

एकें दिवशी त्याच्या गळ्यांत असलेली पुष्पमाळा कोमेजली. देवास फार नवल वाटलें. त्यानें याचें कारण एका देवास विचारलें. तो म्हणाला–

" देवांची आयुर्मर्यादा सहा महिने राहिली असता असा प्रकार नेहमी घडतो. आपण ह्या स्वर्गलोक सोडून पृथ्वीवर जन्म घेणार आहोत. आपण फार काळ सुखात घालविला आहे. आता पुढील जीवनाची तयारी करावी हेच सुच-विण्यासाठी जणु ही पुष्पमाळा सुकून गेली आहे. "

देवाचा हा खुलासा ऐकल्यावर ललितांगास फारच वाईट वाटलें. स्वर्ग-सुखाला मुकण्याचा त्याला खेद नव्हता. पण आपली आवडती अप्सरा पुढील जन्मात आपल्याला मिळेलच असें नाही, या विचारानें तो फारच दुःखी झाला होता.

नेहमीच उत्साह-आनंदाचा अक्षयझरा असणाऱ्या ललितांगास चिंता-तुर पाहून स्वयप्रभेनं विचारलं-

" आज काहीं अशुभ घडलं आहे का? माझ्या कडून वागण्यांत प्रमाद झाला आहे का ? "

त्यावर ललितांग म्हणाला- " प्रिये, प्रमाद तुझ्या कडून नाही माझ्या-कडून झाला. सुख भोगताना त्याची दुसरी बाजू मीं विसलो होतों माझ्या सुखाच अधिष्ठान तू होतीस. तुझ्या शिवाय क्षणभर करमायचं नाही असं जें मला वाटत होतं ते चूक ठरणार आहे. "

" तें कसं ? "- तिन विचारलं

" तें असं की मी सहा महिन्यानंतर भूलोकी जन्म घेणार. तूं कुठं तरी जन्म घेशील. सपूर्ण याल्यवस्था तुझ्या शिवायच नाही का मला काढावी लागणार ! शिवाय भूलोकी तू माझी पत्नीच होशील हें कसं शक्य आहे ? आपल्या हातीं जन्म असला तरी बाकीच्या गोष्टी दैवाधीनच नसतात का?"

स्वयंप्रभेलाही फारच वाईट वाटल. दोघांनी ठरवलं की या पुढचा काळ साधनेत घालवायचा. त्या साधनेने तरी पुढील जन्मीं तू माझा पति होशील.

स्वयप्रभा आणि ललितांग यांनी ऋषि पति-पत्नी सारखं जीवन जगा-यचा प्रयत्न केला.

एके दिवशी आयुष्य संपल्याबरोबर स्वयंप्रभे जवळ बसलेला ललितांग

प्रयत्नान-भरलेलं असावं पण त्यात कमळे असावीत,--वेल बहरलेली असावी पण तिला फुले नसावीत, तसेच वज्रबाहु राजाचे होतें. त्यास मूल नव्हतें. हेच सौख्य समाधान असे आहे की त्यासाठी पति--पत्नी वाटेल ते करायला तयार होतात.

ललितांग देवाला जणु हेंच स्थान उपयुक्त वाटलं. स्वर्गातून येऊन त्यानं वसुंधरेच्या पोटी जन्म घेतला. राजानं आपली सारी हौस पूर्ण झाली असं समजून खजिना रिता केला. सार्‍या जनतेनं ' नवीन राजाचं ' स्वागत केलं. सारं शहर सचेतन झालं. सूर्योदयानं पृथ्वीवरील सर्व जीव प्राणी जसे आनंदित व उत्साहित होतात तसें त्या बालकाच्या जन्मानें झालें.

त्याच्या मांड्या जन्मतःच वज्रासारख्या होत्या म्हणून त्यास ' वज्र--जंघ ' असें नाव ठेवण्यात आलें. वज्रजंघाने आपल्या बाल्यकाळात आई-वडीलानाहि बालक बनविलं. बालकाशी बोबडे बोलून, त्याच्यासाठी गुड-घ्यावर चालून, त्याचे अनेक हट्ट पुरवून आई--वडील स्वतःला धन्य मानीत होते. बालक--सुखापेक्षा राज्यसुख श्रेष्ठ मानणाऱ्याच्या मनात काही तरी विकृति असावी हेच खरे. बालकाच्या मूर्खपणाच्या गोष्टीही किती सुख देतात याचा प्रत्यय येऊन ते दोघे स्वतःला धन्य मानीत.

o o o

बाल्याचा सुखाचा काळ सपायला वेळ लागला नाही. वज्रजंघ राज-कुमार तरुण झाला. एखाद्या पहिलवानासारखे त्याचे बाहु म्हणजे शत्रूना नित्य आव्हानच असे त्याचे झाकेभोर डोळे म्हणजे युवती--जनांना भुरळ पाडावेत असें होतें.

या रूपाबरोबरच त्याचं ज्ञान--विज्ञान अतुलनीय होतं. नसल्याही

विषयावरील त्याचें मत हें अनाग्रही असून सर्व–संग्राहक होतं.

एकदां वज्रजंघ फिरत फिरत एका मंदिरांत आला. तें मंदिर एका डोंगराच्या गुहेत होतं. इतकं विस्तृत मंदिर त्यानं यापूर्वी पाहलच नव्हत. वरून डोंगरासारखा दिसणारा हा भाग म्हणजे उत्कृष्ट कलाकृतीने युक्त असें देऊळ असेल अशी थोडी देखील शंका त्याला आली नव्हती. जवळच असलेल्या सरोवरात स्नान करून व तेथील कमळें तोडून तो देवळात गेला. सहस्त्र खांबाचं तें देऊळ म्हणजें प्रत्यक्ष स्वर्ग–लोकचं त्याला वाटल. भिंतीवर वैविध प्रकारची रंगीबेरंगी चित्रें काढलेलीं होती. ती चित्रें पाहून तो इतका मुग्ध झाला की आपण पूजेसाठी आलों आहोत हे तो विसरून देखील गेला.

एकेका चित्राच्या दर्शनाने होणारें सुख हें त्याने अनुभवलें आहे असें वाटूं लागलें. एका सुंदर उपवनात आम्र वृक्षाखाली बसलेली सुंदर स्त्री दाखविण्यांत आलेले एक चित्र पाहून त्याच्या तोंडांतून एकाकी शब्द बाहेर पडूं लागले– " स्वयप्रभे ! तू इथें कशी ? तुझ्या आणि माझ्या स्वर्गीय सुखाचा चित्रपट इथं कसा ? "

त्या हाके सरशी त्या मंदिराच्या भिंतीतून, " स्वयंप्रभे, स्वयप्रभे " असे निनाद उठू लागले.

गत जन्मात भोगलेल्या सर्व सुखाची त्याला आठवण झाली. तो तेथेंच दिङमूढ होऊन एका दगडावर बसून विचार करू लागला–

" कुणी तरी हेतु परस्पर मला फसविण्यासाठी हें कारस्थान तर करीत नाहीना !"

वज्रजंघ तेथून उठणार इतक्यात एक वयस्क स्त्री त्याला दिसली. ती इतकावेळपर्यंत चोरून आपणाकडे पहात असावी अशी त्याला शंका आली.

त्यानें विचारले " देवि, अशा निर्जन अरण्यातील देवळांत तुम्ही कशा आलात ? कां आलांत ? तुम्हाला काही दु:ख तर नाही ना ? "

स्वत:च्या दु:खांतही दुसऱ्याच्या दु:खाची विचारपूस करणारा हा कुणी तरी सज्जन आहे अशी खात्री पटल्यावर ती स्त्री म्हणाली–

" जीवनात दुःखें ही असणारच. पण जें दुःख मी सांगणार आहे तें माझं नाहीं. माझ्या एका मालकाच आहे. "

वज्रजंघ म्हणाला " मला शक्य असेल तर मी तुमची अडचण दूर करून माझ्या कर्तव्याचें पालन करीन. आपण ती सधी मला द्यावी. "

त्या नंतर ती स्त्री सांगूं लागली—

" माझं नाव पंडिता. मी याच विदेह क्षेत्रांतील पुंडरीकिणी शहराच्या राजाची दासी आहे. माझ्या देशात कशाचीच उणीव नाही. परंतु एकच चिंतेचा विषय आहे तो म्हणजे त्या नगरीच्या वज्रदन्त राजाच्या मुलीचा. तिच नाव श्रीमती. इतकी सुंदर मुलगी कुणी जन्मात पाहिली नसेल. त्या मुलीनं एका-एकी खाणपीणं सोडल ; शृंगाराचा त्याग केला. गवतावर ती झोपत आहे. काही केल्या बोलत नाही. आईला वाटलं भूतबाधा झाली असावी. पण वडीलाचं अनुमान खरं ठरलं. वडील म्हणत होते— तिच आता लग्न करून टाकावं हें बरं.

फार विनती केल्यावर अगदी एकांतात श्रीमतीनं आपलं गुपित मला सांगितलं. ती मला म्हणाली, ' हे पंडिते, एके दिवशीं मी बगीच्यांत बसून होतें. वनातील शोभेंन माझं तारूण्य अधिकच मोहक दिसत होतं. इतक्यात आकाशांतून दोन दिव्य आकृति जातांना मी पाहिल्या. त्या आकृति म्हणजे माझ्या गत जन्मीचा इतिहास पटच होता. गतजन्मीं मी स्वर्गांत स्वयंप्रभा नांवाची अप्सरा होते. माझा आवडता देव ललितांग होता. त्या ललितांगाची आठवण होताच माझं हृदय विदीर्ण होतं. त्याला केव्हा पाहीन असं होऊन गेलं आहे मला. त्याच्या दर्शनाशिवाय मी जिवंत राहाणार नाही. "

तिचें हें बोलणें ऐकून मला बरें वाटलें. परंतु तिचा पूर्व जन्मीचा पति हुडकून काढणें हें साधे काम नाही. माझ्या विनंतीला मान देऊन तिनं स्वतः लावलेली चित्रं तयार केली. आपण हा चित्रपट पाहताच आपल्या तोंडून तिच्या नावाचा उच्चार मी ऐकला. परंतु एकाएकी तुम्हास मी अनाहूतपणे कांही सांगावं हें स्त्रीजातीला कसं शोभून दिसलं असतं…………

आपल्या शोधासाठी आलेल्या त्या स्त्रीला वज्रजंघानें अंगावरील सर्व

अलंकार भेट म्हणून दिले व स्वतःचे एक चित्र तिच्या निघ रंगवून देऊन पंडितेला खुष केले.

अपूर्व आनंदाने वज्रजंघ घरी आला. त्याने आईला सारी हकीगत सांगितली. राजाने आपले दूत पाठवून लग्नाची बोलणी केली.

सर्वांना अतोनात आनंद झाला. दोन्ही नगरात महोत्सवाची भेरी वाजू लागली. सर्व रस्ते अत्तराच्या सड्यांनी सुवासिक झाले. घरा-घरातून धूपाचा सुवास बाहेर पडू लागला.

लग्नाचा अपूर्व सोहाळा पाहण्यास सर्व देशीचे विद्याधर, किन्नर, किंपुरुष, नागकुमार उपस्थित होते. स्वर्गातील देवकुमारांनीही त्यात भाग घेतला होता.

० ० ०

अनेक वर्षे सुखात निघून गेली. वज्रजंघाच्या काळी नगर राज्ये होती. त्यामुळे आपले नगर हेच राज्य. या राज्यापलिकडे फार मोठी सीमा त्यास नव्हती. सैन्य असे परंतु ते शोभेसाठी, वैभवासाठी.

सर्वांचच जीवन सुखी. युद्ध—लढाई यांना विचार करण्याचे कारण नसे. त्यामुळे केवळ असलेल्या वैभवाचा उपभोग घेण्याची चिंता नाही, नस-लेल्याची हाव नाही. केवळ वैवाहिक [illegible] पति—पत्नीच्या [illegible] [illegible]—[illegible]-लेकाच्या प्रगतीत, स्नेहात अथवा [illegible] नव्हती.

असाच एके वर्षी वज्रजंघ आपल्या प्रिय पत्नी [illegible] [illegible] होता. [illegible] तिथे त्यांनी [illegible] [illegible] [illegible] [illegible] [illegible]-[illegible] [illegible] [illegible] होते सुंदर [illegible] व [illegible] [illegible]

चादरी, हिऱ्यांचा कोमल प्रकाश, यानी तें शयनकक्ष फारच सुशोभित दिसत होतें

शयनकक्षाची देखरेख करणाऱ्या दासीनं सुगंधी धूपपात्रें सर्वत्र ठेवून दिली होती. सारी खोली दरवळून गेली होती.

धूर निघून जाण्यासाठी ठेवलेली गवाक्षें नित्याप्रमाणे उघडें ठेवायला ती विसरली होती खोलीतील हवा अधिक धुरानं जड झाली होती.

श्रीमतीचा श्वास अवरुद्ध झाला. काय घडत आहे हें तिलाहि कळले नाही.

दुसरे दिवशी मंगलवाद्यें शयनकक्षाच्या दाराशी वाजू लागली. बराच वेळ झाला. परंतु आतून कसलीच हालचाल नाही म्हणून वादकांनी मंत्र्याला वर्दी दिली. मंत्री धाऊन आला. त्याने प्रयत्नपूर्वक दारे उघडली. खोलीत धूर साठला होता इतका धूर कोठून आला हें कळत नव्हतें. धूर कमी झाल्यावर पलंगावर शांतपणें पहुडलेल्या राजा–राणीस प्रधानानें पाहिले. एखाद्या बालकाप्रमाणे ते झोपले होते. कायमचे झोपले होते.

या बातमी सरशी सर्वत्र शोकाचें साम्राज्य पसरलें. कुणी म्हणत होते विषारी धूपानें असें झालें असावें, कुणी सांगे धुरानें गुदमरून त्यांचा प्राण गेला असावा

• • •

## चक्रवर्ती वज्रनाभि



"श्रेणिका, आत्म्याची ही स्थित्यंतरे पाहिली म्हणजे मोठी मौज वाटत असेल नाही ?"

"कधी स्वर्गीय सुख तर कधी मानवी सुख–दुःखें हें उपभोगूनहि तृप्ति कशी होत नाही. अशा वैचित्र्यपूर्ण जीवनाचा चित्रपट तुम्ही सांगत असतांना असं वाटतं हा सारा इतिहास प्रत्येक जीवाचाच झाला असावा "

"खरं आहे, श्रेणिक राजा," गौतम म्हणाले, "तू काय, मी काय, इथें असलेले अनेक प्राणी काय सारे याच इतिहासातील पात्रें आहेत.

गौतम पुढें म्हणाले, "श्रेणिका, अशा प्रकारें पुढें आदिनाथ होणारा हा जीव अच्युत" स्वर्गात देव झाला. अच्युत स्वर्गातील सुखांना सीमा नाही. पण त्या सुखालाहि अंत आहे.

पुण्डरीकिणी नगरीचा राजा वज्रसेन होता. त्याची राणी श्रीकांता होती. या राणीच्या पुण्यामुळ अच्युत स्वर्गातून तो देव मरून वज्रनाभि नावाचा मुलगा होऊन जन्मला.

वज्रनाभीच्या जन्मामुळें माता—पित्याना फार आनंद झाला. जन्माच्या वेळी आलेल्या ज्योतिष्यानें सांगितलें की तुमचा मुलगा षट्खंड—पृथ्वी जिंकणारा चक्रवर्ती होईल. चक्रवर्तीत्व ही फार मोठी आकांक्षा आहे. षट्खंडाचा अधिपति होणं व तें ऐश्वर्य भोगण हें जितक महत्वाचं तितकच अशा विराट ऐश्वर्याला निर्मोही होऊन सोडून देण हेंहि महत्वाचं आहे.

काळाच्या दृष्टीनं पिकलेली वस्तु झाडावर राहात नाही तसंच पक्व झालेलं आयुष्य नष्ट पावत.

कांहीं वर्षांनी सर्व विद्या पारंगत होऊन वज्रनाभि एखाद्या तरुण हत्ती सारखा सुंदर दिसूं लागला. त्याचं शरीर इतकं सुंदर होतं कीं देवाचं रूपहि फिक्क पडलं असतं व स्वर्गीय अप्सरानी याला लग्नाची याचना केली असती

एकदां त्याचे वडील महालावर बसले होते. आकाशांत मेघमाला फिरत होत्या. बुडत्या सूर्याच्या दीप्तीनं त्याच्या कडा सारवल्या होत्या. मत्त हत्ती—प्रमाणे दंगा करणारे ते मेघ इकडून तिकडे फिरताना पाहून महाराजाना फारच मौज वाटली. ते स्वतःशीच म्हणाले, " लोक व्यर्थच नाटक, नृत्य, संगीतात इतके गढून जातात. या आकाशाच्या विशाल नी अनंत रंगभूमीवर चाललेलं मूक नाटक, मूक नृत्य, आणि मूक पण गंभीर संगीत जो ऐकील त्याचे मन कशांतच रमणार नाही "

इतक्यात एका मेघाकडे त्याचं लक्ष गेलं त्याचा आकार एका शिखरा-सारखा होता. तसलं शिखर आपण बांधित असलेल्या नवीन चैत्याला ( देवळाला ) असावं अशी भावना महाराजांच्या मनात आली. त्यानी आपल्या आवडत्या राणीस हांक मारली.

थोडाच वेळांत श्रीकान्ता महाराणी तेथें आली. तिनं स्मितहास्य करून विचारलं—

" मला बोलावलं आहे का ? "

ती येई पर्यंत मेघाची आकृती पार बदलून गेली होती. त्याचा आकार यमाच्या रेड्यासारखा दिसू लागला होता. महाराजांना वाटलं हा रेडा मला घेऊन जाण्यासाठीच जवळ जवळ येत आहे. क्षणभर ते गोंधळले. अंग शहारलं.

महाराजांना त्या अवस्थेत पाहून राणीनं विचारलं—

" अहो, तुम्ही बोलवलत, आणि असं घाबरायला काय झालं ? बरं नाही का वाटत ? "

राजा शांतपणे म्हणाला,—

" आपण नवीन मंदिर बांधित आहोत ना ? त्या मंदिराचं शिखर कसं असावं म्हणून विचार करीत होतो. एका मेघानं जणु माझा विचार ऐकला. त्यानं शिखराचं रूप धारण केलं. तुला ती कृती दाखवावी म्हणून मी तुला हांक मारली. पण कदाचित ते त्याला आवडलं नाही. तो पाहिलास कां ढग ? आता एकाद्या रेड्यासारखा दिसत आहे. "

राणी हसू लागली. म्हणाली, " काव्य करतांहात वाटतं. आता आपण म्हातारे झालो आहोत. वज्रनाभीचं रूप, तारूण्य पाहून त्याला सारं राज्य देवून आपण स्वस्थ रहावं असं वाटू लागलय मला. "

राणीनं ते गमतीनं म्हटलं असेल पण राजानं ते खरं मानलं.

० ० ०

मंत्र्याचा विचार घेऊन वज्रनाभीच्या राज्याभिषेकाची घोषणा त्यानें केली. वज्रनाभीला प्रथम धन्यवाद दिले वज्रनाभि वडीलांकडे गेला.

म्हणाला— " पिताजी, ही फार मोठी जबाबदारी आपण माझ्यावर टाकीत आहात. "

वडील म्हणाले, " क्षत्रियाला असें म्हणणें शोभत नाही मला माहिती आहे, हे तूं विनयानें म्हणत आहेस. सिहाचा छावा जमा प्रचड हत्ती असला तरी त्याला प्रचंड म्हणत नाही. त्याप्रमाणं तुहि खासच म्हणणार नाहीस. "

एका शुभ महुर्तावर राज्याभिषेकाची तयारी करण्यांत आली. वडी–लानी आपल्या हातानी वज्रनाभीच्या डोक्यावर मुकुट ठेवला. मुकुटात बसविलेल्या रत्नाचा प्रकाश राजकुमाराच्या तोंडावर पसरला होता.

आईनं राजकुमाराच्या कपाळांचं चुबन घेतल. लोकानी जयजयकार केला. मंत्रविदानी मंत्रांचा उच्चार केला. यावेळी विद्याधर लोकानी विविध प्रकारची मौल्यवान वस्त्रें, अलकार शस्त्रें, इत्यादि सामुग्री भेट दिली.

कुमार वज्रनाभि ' राजा ' झाला. त्याचे नेत्र पाणवले. आई, वडील, गुरू याना त्याने नमस्कार केला.

वडीलांनी एकाएकी वनात जाऊ नयें म्हणून मुलाने विनती केली. मुलाच्या प्रेमाखातर वडीलांनी संन्यास घेण्याचा विचार कांही दिवस तहकूब केला. मोठ्याचे केवळ अस्तित्व हें देखील लहानाच्या मनात धैर्य निर्माण करते.

० ० ०

कांही वर्षांनी वडील त्याला सोडून जंगलांत गेले. ते थंडीत नदीकांठीं तप करीत. पावसाळ्यांत वृक्षाखाली बसून ध्यान करीत. उन्हाळयात दगडा-वर बसून चिंतन करीत. सुखासीन शरीर मुल्वातील यासाठी तयार होत नाही परंतु दु.सहि अंगवळणी पडलं. त्यांचा सर्व वेळ ' मी कोण आहे ? "

" माझं जीवित–कार्य काय ? " या दोन प्रश्नाची खरीखुरी उत्तरे शोधून काढण्यात कसा निघून जाई हेच कळत नसे.

वज्रनाभि राज्य करण्यात तरबेज झाला. जसजसा काळ जाऊं लागला तसतसा एक विचार त्याच्या मनांत येऊं लागला तो म्हणजे षट्खंडपृथ्वी जिंकण्याचा. महत्वाकांक्षा मोठी असली तरी ती पूर्ण करण्याचे दैवी सामर्थ्यहि त्याच्या जवळ होते.

एके दिवशी तो सभेत बसला होता. एक दूत धावत सभेमध्यें आला. त्यानं सांगितल की कितीहि बलाढ्य राजा असला तरी तो अंकित होईल असें ' चक्र ' शस्त्रागारांत निर्माण झालें आहे त्या चक्राचे दर्शन घडताच मोठमोठ्यांचा गर्वहि आपोआप गळून पडेल.

मंत्र्यासहित राजा त्या चक्राचें दर्शन घेण्यासाठी गेला. राजाला पाहू–तांच ते चक्र राजाकडे आले. राजाच्या भोंवती तीन फेऱ्या मारून उजव्या बाजूस येऊन स्थिर झालें.

राजाने त्या शस्त्राची पूजा केली पुष्प–पर्णांनीं ते चक्र अधिकच चांगले शोभू लागले.

त्यानंतर त्यानें (पूर्व, पश्चिम, दक्षिण व उत्तर या चारही दिशेस अस–लेल्या राजांना जिंकून घेतले पण आश्चर्य हे रक्ताचा थेंबहि त्या युद्धांत पडला नाही. ज्या राजाना पराक्रमाचा गर्व होता तो गर्व त्या चक्राच्या दर्शनानेंच नष्ट होऊन जाई. जे राजे अभिमानी असत ते राज्य–त्याग करून जंगलांत निघून जात.

अशा रीतीनें सर्व देशांना जिंकून वज्रनाभि स्वदेशी परतला )

• • •

षट्खंड पृथ्वी जिंकली. कुणालाहि दुर्लभ असं ऐश्वर्य प्राप्त झालं तरी वज्रनाभीला गर्व कसा शिवला नव्हता आयुष्यातील तीस तरी वर्षं त्याने

चतुर्दिक भ्रमण केलं होतं लक्षावधी राजे त्याचे मांडलिक व दोस्त होते. असें असतां एकच गोष्ट त्याच्या हृदयात सलत होती. ती म्हणजे— जे राजे राज्य सोडून जंगलात निघून गेले पण याचें चक्रवर्तित्व मान्य केलें नाही त्यांची.

राज्याहून श्रेष्ठ अन काही तरी श्रेयस आणि प्रेयस त्यांना वाटलं होतं. असलं श्रेयस आणि प्रेयस ते काय हें जाणून घेण्याची तीव्र आकांक्षा त्याला लागून राहिली होती.

इकडे त्याच्या वडीलांना कैवल्य प्राप्त झालं होतं. त्यांचा निवासहि जवळच होता म्हणून आपल्या सर्व परिवारासह तो दर्शनास गेला

वडीलांचं ते मंगल, पवित्र रूप पाहून त्याला अतोनात आनंद झाला. अग्नीत सोनं जसं शुद्ध होतं तसं तपामुळं त्यांचा आत्मा शुद्ध झाला होता. तो वडीलांना म्हणाला—

" आपल्या भोवती पसरलेली चैतन्याची प्रभा कशाची आहे ? आपण सर्वस्वाचा त्यागकरून आनंदित कसे ? मजजवळ कसलीहि कमतरता नाहीं. पण माझं मन शांत नाही "

वडील म्हणाले, " तूहि माझ्या सारखा वागलास तर तुलाहि सुख होईल. त्यागांतला आनंद कसा असतो ते सूर्याला विचार, नद्यांना विचार, फल–वृक्षांना विचार, मातेला विचार "

वज्रनाभीला तेच हवें होतें. त्यानें वडीलाच्या साक्षीनें अहिंमाव्रत घेतलं. सर्व कपड्यांचा त्याग केला वडीलाच्या सेवेत त्याच्याहि आत्मा पवित्र झाला " जो आत्म्याला जाणतो तो सर्व जगतास जाणतो " हें वडीलांनी सांगितलें. तत्व अनुभवास आलें.

फार मोठें तप करून तो ' सर्वार्थसिद्धि ' नावाच्या अत्युच्च स्वर्गांत गेला.

## सर्वार्थसिद्धीच्या वाटेवर

स्वर्गातील अत्युच्च स्थान म्हणजे, सर्वार्थसिद्धि. सर्व इच्छांची पूर्ति तिथं होते म्हणून त्या स्वर्गाला सर्वार्थसिद्धि असं म्हणतात. त्या ठिकाणी गेलेला आत्मा कसल्याहि वैषयिकतेत न रमणारा, स्वर्गीय दिव्य सुखं भोगतांना देखील ' आलिया भोगासी ' सादर असणारा असतो. तेथील वातावरण इतर स्वर्गांहून अगदीच वेगळें असते सर्व देव ' अहमिंद्र ' असतात. कुणावर कुणाची सत्ता नाही. सर्वच श्रेष्ठ !

ज्या सर्वार्थसिद्धि विमानात तो जन्मला असतो ते विमान फार मोठें असतें. नैसर्गिक शोभेनं मोहरून गेलेलं दिव्य वातावरण तर असतेच त्याशिवाय रत्न–हिरे–माणकांनी मढविलेली आसनें, मोठमोठी सुंदर तळीं ; कल्पवृक्षांनी भरलेलीं वनें. सूर्यासारखी उष्णता नाही की केवळ चंद्रासारखी शीतलता नाही. कधीच अंधार नाही. कसलीच चिंता नाही. इतर स्वर्गांत देवादेवात असलेली ईर्षा, असूया देखील नाही.

आहाराची आसक्ति किंवा वासना नाही. सर्वच उपभोग केवळ मान-सिक होते. मानसिक भोजन, मानसिक निद्रा, मानसिक उपभोग ! शरीराची जरूरीच नसते. असलं कल्पनेच्या पलीकडे असलेलं तें स्वर्गसुख भोगतांना नेहमी " मी सर्व उपभोगाचा कर्माची फळं म्हणून स्वीकार करीत आहे. यात माझी वासना नाही, यात अहंकार नाही. " अशी भावना त्या अहमिंद्राच्या ठिकाणी असे.

नेहमी उत्तर-दक्षिण राहणाऱ्या लोहचुंबकाप्रमाणे तो केवळ आत्म्याच्या चिंतनातच मग्न असे. या चिंतनातून दिव्य अशी आत्मिक शक्ति निर्माण झाली होती.

इकडून सौख्याचा शोध घेणाऱ्या इतर वैमानिक देवासारखा तो नव्हता. सौख्य हे बाहेर इकडून मिळणार नसून ते आत्म्यांतूनच निर्माण होणार अशी दृढ भावना त्याची असते. फुलांतून सुगंध हा जसा स्वतः बाहेर पडतो आणि सर्व वातावरण सुरभित करतो त्याप्रमाणे आत्मिक सौख्य हे कस-ल्याहि बाह्यसाधनाशिवायच प्राप्त होतं.

असंख्य वर्षांचा दिव्य आयुष्याचा काळ कसा निघून गेला हें त्या अह-मिंद्राला कळालें सुद्धा नाही. जगांतील विविध वस्तूंचा उपभोग घेण्याचं अचाट सामर्थ्य प्राप्त झालं असतांना देखील तो अहमिंद्र आत्मिक साधनेंत रमत होता. दुसरे सौख्य जणु त्यास दिसत होतें.

आयुष्य संपत आलं. त्या अहमिंद्राच्या गळ्यातील कल्पद्रुमाची माळ कोमेजली. अहमिंद्राच्या हें लक्षात आलंच.

तो त्या हाराला उद्देशून म्हणाला, " तुला असं निराश होण्याचं कारण नाहीं. तू मला माझ्या आयुष्याच्या समाप्तीची सूचना दिली. जगाचं कल्याण व्हावं व साधना पूर्ण व्हावी, ही माझी इच्छा पूर्ण होण्याचा काळ जवळ येत आहे असं मला वाटतं "

सहा महिन्यांनी त्या देवाचं शरीर अंतर्धान पावलें. त्याचा दिव्य आत्मा पहिला तीर्थंकर म्हणून भारताच्या कर्मभूमीत जन्म घ्यावयास निघाला.

० ० ०

## मरुदेवी

मरुदेवी ही नाभिराजाची पत्नी दोघांचा जन्म अशावेळी झाला होता कीं सर्व भारतांत मोठं भौगोलिक व नैसर्गिक परिवर्तन होत होतं. कल्पनेच सुख मावळत होतं. कष्टाचं युग निर्माण झालं होतं केवळ मौजेखातर असलेलं जीवन संपत आलं होतं. जीवनाला ध्येयाची जोड मिळून होती जीवनाचा प्रवाह गतिमान होत होता. जगण्याची धडपड सुरु झाली होती

नाभिराजाचा मित्र इंद्र त्यानं इन्द्राला पृथ्वीवर बोलावून म्हटलं—

" कल्पवृक्षांच्या नाशामुळं जीवनाचा ओघ बदलत आहे मानवी जीवनाचा प्रवाह योग्य मार्गानं नेण्यास तुम्ही मला मदत करावी. "

इंद्र म्हणाला, " आनंदाची गोष्ट आहे तुम्ही मला काम सांगावं आणि तें मी करावं, मात्र मला केवळ समाधानच नव्हे तर अभिमानही वाटतो. "

नाभि म्हणाला, " या सर्व लोकांना एकत्र वसविल्याशिवाय याना नीति-धर्माच्या मार्गानें नेणें अशक्य आहे. समाजाची स्थापना त्या शिवाय होणार नाही "

इन्द्राला नाभिराजाची कल्पना फारच आवडली. त्यान अगोदर विमानांतून हिंडून उत्तम जागेची पाहाणी केली. नाभिराजानं आणि मरूदेवीन मिळून शहराचा नकाशा तयार केला. इन्द्राच्या सम्मतीने शहर वांधण्याची योजना आखली

इन्द्रानं कुबेराला सांगून रत्नहिऱ्यांचा वर्षाव करायला आज्ञा केली. शहराचा पाया घालण्याचा मोठा समारंभ घडवून आणण्यांत आला. या निमिताने विखुरलेल्या लोकाना आमंत्रित करण्यात आल. जमीनीचं पूजन करण्यात आल. फुलाफळांचा उपयोग जगांत पहिल्यांदा पूजनासाठी झाल्याचा हाच पहिला दाखला. इन्द्राने पृथ्वीला फुले वाहिली तेव्हा नाभिराजा त्या फुलाकडें पाहून म्हणाला, " मरूदेवि, ही पहा पृथ्वी आपले डोळे उघडून जणु नवीन मानवाच्या कृतीकडे आश्चर्यमुग्ध होऊन पहात आहे. "

एका वर्षांत शहराच काम पूर्ण झाल. नगराच्या मध्यभागी राजवाडा. त्याच्या चारही दिशेनें चार प्रशस्त राजमार्ग. त्या राजमार्गावर विविध फुलाफळाची झाडें. तीस हजार घरे. तीस व्यक्तींना पुरेल असें प्रत्येक घर. प्रत्येक घर सर्वप्रकारच्या सुखसोयींनी पूर्ण. गावाच्या भोवती तीन दगडी तट. त्या तटाला चार प्रवेश द्वारे व एक चोर-दार. तटाभोंवती मोठें खंदक. त्या खंदकात गंगेचे निर्मळ पाणी आणून सोडलेले. हें पाहून नाभीला फार समाधान वाटले

शहराची रचना झाल्यावर इन्द्राने नाभिराजाच्या संमतीने चैत्र शुद्ध प्रतिपदेला नगराचे उद्घाटन केले. अनेक कुटुंबियाना प्रेमादर पूर्वक त्यांच्या त्यांच्या आवश्यकतेनुसार वेगवेगळ्या घरातून जागा दिली.

मोठ्या मेजवानीचा बेत नाभिराजाने केला होता. अन्न आणि पक्वान्न अद्यापि मानवाच्या भोजनांत येण्यापूर्वीचा तो काळ होता. नैसर्गिक फळें व कंद हेंच सुरुवातीच्या मानवाचें अन्न !

त्यावेळी इन्द्रानें नाभिराजाला गमतीनें म्हटलें, " मित्रा, तू योग्य वेळीच माझ्याकडून हे काम करवून घेतलं !

" ते कसे काय ? "

" त्याचं असं की यानंतर सहा महिन्यातीच तू जगत्शिरोमणी पुत्राचा पिता होशील. पितृत्व व मातृत्व या दोन सुखाच्या अभावामुळं प्रत्यक्ष स्वर्गसुख देखील फिकं पडून जातं "

इन्द्र निघून गेल्यावर नाभिराजानं त्या नगराला ' अयोध्या ' हे नाव दिलं. असंख्य वर्षानंतरही ते नाव कायम आहे. उत्कृष्ट घरांनी सुशोभित अशी एकुलती एक नगरी म्हणून तिला " साकेता " असंहि नाव पडलं तेथील लोकांपासून जगानं विनय आणि विद्वत्ता शिकावी म्हणून जणु तिचं तिसरं नाव " विनीता " असं पडलं.

० ० ०

मरुदेवी ही आपल्या प्रिय पतीची पत्नि होती एवढेंच नव्हे तर युग–निर्मात्या पतीला योग्य सल्ला व सहाय्य देऊन जगत्कल्याणाचा गाडा चालू ठेवण्याच्या महत्वाच्या कार्यातील ती एक प्रमुख व्यक्ति होती.

राजेपणाच्या व प्रजेच्या कल्पनेला नुकतीच सुरुवात झाली असल्यानें लोकांचा उपमर्द होईल, त्यांच्या अभिमानाला धक्का लागेल अशी एकहि गोष्ट घडू नये यासाठी ती फार जपत असे

एकत्र येऊन समाजरूपानं सामुदायिक विकास कसा करून घेता येईल यासंबंधी ती पतीशी चर्चा करीत असे. पावित्र्याच्या कल्पनेची निर्मात्री देखील मरुदेवीच होती आपल्या कौशल्यानें पतीचं मन नेहमी आकर्षून घेत

घ्यावं, ममतेन त्याची सेवा कशी करावी; मुलाबाळाचा सांभाळ करताना मातृत्वाची भावना कशी बाळगावी या गोष्टी शिकविताना ती प्रत्यक्ष विश्वमाता शोभत होती.

एके दिवशी ती आपल्या राजप्रासादात सुखनिद्रेचा अनुभव घेत असता एक प्रचंड हत्ती तिने स्वप्नात पाहिला. गंभीर गर्जनेने सारे वातावरण भरून गेले होते क्षणात ते स्वप्न भंगले नंतर एक मोठा बैल तिला दिसला. अत्यंत सुंदर, वर्णाने पांढरा, अर्धवक्र शिंगे, काळेभोर मोठे वशिंड. तेहि स्वप्न अंतर्धान पावले. त्यानंतर तिला सिंह दिसला अक्राळविक्राळ जबडा रंगाने पांढुरका असामान्य तिने क्रमाने महालक्ष्मी. पुष्पमाला, तारका बरोबर विहार करणारा चंद्र, सूर्योदय, दोन सुवर्ण कलश, तलावात क्रीडा करणारे दोन मोठे मासे, तलाव, मर्यादा सोडून जमीनीवर आक्रमण करणारा समुद्र, उच्च सिंहासन, देवाचं विमान, रत्नराशी, नागेंद्राचा राजवाडा, अशी सोळा, स्वप्ने पाहिल्यावर तिला फारच मौज वाटली आतापर्यंत तिला झोपेत स्वप्ने पडतात हे ऐकून माहित होते पण प्रत्यक्ष अशी ही स्वप्नमालिका तिने आजच पाहिली होती

तिला मौज वाटली खरी. परंतु हे काही गैर तर नसेल ना ! सुख-निद्रेचा भंग करून पडणारी ही स्वप्ने म्हणजे माझे जीवन काळवंडून टाक-णाऱ्या किंवा उजळून टाकणाऱ्या भावी घटना सूचित करणारे दूत तर नव्हेत ना !

इतक्यात तिला पुन: झोप आली. रात्रीचा शेवटचा प्रहर सर्वत्र शांत होता बागेत फुललेल्या फुलांचे परागकण घेऊन वाहाणारा मंदमंद समीरण सर्वत्र वाहात होता सर्व वातावरण सुरभित झाले होते. अशा वेळी जगा-तील प्राणिमात्र गाढ झोपेत असता मरुदेवी कमलयातरी सुखसेवनानी आनंदीत झाली होती.

जवळच तिचा पति, नाभिराजा, झोपला होता जगत्‌कल्याणासाठी सदणारी मनती जणु विसाव्यासाठी क्षणभर पहुडली होती. झोपेतही जागृत असणारी ती व्यक्ती होती.

इतक्यांत अचानकपणें ती दचकून उठली. ती काहीशी घाबरली होती. पण तें क्षणभरच. हेंही स्वप्नच तर !

आपल्या दचकण्याने पतीची झोंपमोड तर झाली नाही ना इकडें तिच प्रथम लक्ष गेलं.

शुक्राचा तारा दूरच्या टेकडीवर लखाखत होता. एकुलता एक. नंतर तिनं पतीच्या तोंडाकडें पाहिलं.

मैत्री, प्रमोद, कारुण्य आणि सुखदु:खात समत्व या विविध गुणांचा पुतळाच वाटला तिला तो. " आपण किती भाग्यवान आहोत. सुखाचा सारखा वर्षाव करणारा नाभिराज म्हणजे मेघराज तिला वाटला

नंतर तिने डोळे मिटून घेतले. ती विचार करूं लागली—

" आपण का दचकून उठलो ? " मग तिच्या पुढें तोच प्रसंग उभा राहिला. एक सोन्याच्या रंगाचा पुष्ट बैल अगदी डोलत डोलत जवळ येत होता. त्याच्या डोळयांत आश्रय मागण्याची भूक होती. जणु तो बैल नम्रतेन विनवीत होता—

" हे माते, मला तुझ्या उदरी जागा दे. तुझ्या मनातील अपूर्ण अस-लेली जगत्कल्याणाची इच्छा अंशत: सफल बनविण्याचामी प्रयत्न करीन. तुझा पुत्र होऊन ' आई ' म्हणून हाक मारू दे मला. "

" आई, या शब्दान ती रोमांचित झाली होती. तिला मूल नव्हत. हवंहवंस वाटणार मातृ—सुख तिला मिळाल नव्हत. ' आई ' अशी हाक मार-णारं तिच्या घरी अद्याप जन्माला आल नव्हत. वर्षावान एखादी वेल बह-रावी, मंदवायूनं ती नारखी हेलावत रहावी, भ्रमराकडून नेहमी जिची स्तुति केली जावी पण फुलांनी ती सुशोभित होऊ नये अशी ती होती.

० ० ०

आज ती सुखावली होती. त्यानं मागितलेली गोष्ट तिनं कबूल केली होती. " आई होणार " ही कल्पनाच किती सुखद वाटली तिला !

सकाळी उठून तिनं लवकर स्नान केलं. स्वत: फुलं तोडून आणून तिची माळ गुंफली. ती प्रसन्न होती. तृप्त होती. आनंदानं मोहरली होती. तान्या सूक्ष्मभावनांच्या तारा निनादत होत्या. जणू त्या दशसहस्त्र सूक्ष्म तारांच्या स्वरांतून " आई " हा शब्द निघत होता व त्यातच तो विरून जात होता "

० ० ०

थोड्या वेळानं नाभिराजाही उठला त्यानं प्रार्थना करायला सुरु-वात केली—

" हे अचिंत्य शक्तिमान आत्म्या, तुला माझं वंदन. मोहाच्या पाशात मला मुक्ततेची जाणीव दे अज्ञानाच्या निबिड अंधारांत तुझी स्मृति दीप होऊन प्रकट होऊं दे अहंकाराच्या सर्पवनात गरुडाचं तेजस्वी बळ मला दे."

नाभिराजानं हात जोडले. प्रार्थना संपली. स्नानाने पवित्र झालेली, पांढरे, रेशमी वस्त्र नेसलेली, हातात फुलांचा गुच्छ घेऊन समोर उभी अस-लेली मरुदेवी त्यानं पाहिली.

" मरुदेवी, आज इतका आनंद कसला ? स्वर्गीय विमानाच्या शुभ्र-पताकेप्रमाणे तुझं हे निर्मळ हास्य पाहून मला कांही तरी शंका येत आहे."

" कसली शंका, तुमचं आपलं नेहमी असंच... "

" बरं ते जाऊं दे. अशी जवळ बैस आणि खरं सांग तू अशी आनंदित कां आहेस ? "

" अगदी साधं आहे कारण. मी मघाशी एकामागून एक अशी मोठ्या स्वप्नं पाहिली. पांढराशुभ्र बैल, सिंह इ. पाहून मला फारच मौज वाटली. पण मी घाबरलें ते दुसऱ्याच एका गोष्टीनं. "

" म्हणजे स्वप्नांत तू घाबरली देखील. खर ना ? "

" घाबरलेंच म्हणाना. एक चांगला चपळ बैल धावत येत होता मल वाटलं आता तो माझ्या अंगावर चाल करुन येणार पण तो नम्र झाला ."

" होणारच. मी नाही का अगदी गोगल गाय होतो तुझ्या पुढ तुझी समजूत काढायची म्हणजे . ."

" मी चेष्टा म्हणून नाही मागत बरं. तुम्हाला जेव्हा पहाव तेव्हा मजाच सुचते. ... ."

राणीची प्रसन्नता अशा उपहासगर्भ विनोदाने अधिकच खुलते हे राजाला माहित होतें. अनायासी केलेली कोणतीहि गोष्ट अप्रीतीस कारणी-भूत होते.

" हं, तर तो बैल मला म्हणाला— तू मला तुझा पुत्र म्हणून आश्रय देणार का ? मी तुझी जगत्‌कल्याणाची इच्छा पूर्ण करीन "

" मग तूं काय म्हणालीस, " राजाने विचारले.

या राजाच्या प्रश्नाने राणी लाजली. तिचा चेहरा अधिकच मोहक झाला. सारे अंग मोहरून गेलं. हृदयांतील सूक्ष्मभावना आपल्या अंगविक्षे-पानी प्रदर्शित करण्यांत राणी चतुर होती.

• • •

नाभिराजानं नंतर तिला सांगितलें, " सुंदरी, तुझ्या आशाआकांक्षा पूर्ण होणार हेंच तीं स्वप्न सूचित करीत आहेत. सिंहासारखा पराक्रमी, बैलासारखा स्वतःच्या कष्टानं सर्वांचा आवडता होणारा, चंद्राप्रमाणें अनेक कलानी युक्त असलेला, साक्षात सरस्वतीचा पुत्र असलेला, आणि सर्वार्थसिद्धी नांवाच्या स्वर्गातून तुझ्या उदरी येणारा मुलगा तुला होणार आहे."

पुत्रप्राप्ती होणार आहे या केवळ साध्या कल्पनेनें मरुदेवीला फारच बरें वाटले. काय बोलाव हेंच तिला कळेना ! ती लाजून निघून जाणार तोंच राजानं नोकराला सांगून ही बातमी गांवांतील लोकांना कळविली

स्त्रिया जात्याच उत्सवप्रिय असतात. त्यांना ही बातमी कळतांच अनेक स्त्रिया मरुदेवीला भेटायाला आल्या. सारा राजवाडा स्त्रियांनी भरून गेला गर्भात आलेल्या पुत्राचें मंगल इच्छिणाऱ्या गाण्यानी वातावरण भरून गेलें. आलेल्या स्त्रियानी मरुदेवीला नवीन वस्त्रें नेसविली. तिच्या वेणींत फुलें माळली. गळ्यात, हातात फुलांच्या माळा घातल्या. एका सोन्याच्या झोपाळ्यावर तिला बसविलें. सुंदर सुंदर वस्त्रांनी व फुलमाळांनीं सुशोभित मरुदेवी एखाद्या वनदेवतेप्रमाणें दिसू लागली. संगीत, नृत्यांनी सारें वातावरण बेहोश झालें.

राजसभेंतही आज गर्दी उसळली होती. सर्व मित्रपरिवारांनी महाराजाचें हार्दिक अभिनंदन केले रत्न, हिरे माणकें, त्यांना भेट म्हणून दिले. नाभिराजा एखाद्या स्थितप्रज्ञासारखा होता. मुलाच्या प्राप्तीनं त्याला आनंद होत होता. परंतु त्याला हे इंद्रानें अगोदरच सांगितलें होतें की तुझ्या पोटीं सर्वजगाला नवीन मार्ग दाखविणारा ' महापुत्र ' जन्माला येणार आहे.

तेवढ्यात इंद्रराजही आपल्या देवदेवतांच्या सहस्त्रावधि परिवारांसहित दाखल झाला. वातावरण आणखीनच उत्साही झालें. देवांनी विविध वाद्यें वाजवून महाराजांची करमणूक केली. इंद्राने मुद्दाम तयार करून आणलेला रत्नखचित मुकुट महाराजाच्याशिरावर स्वहस्ते ठेवला. महाराज नाभि अधिकच सुशोभित दिसू लागले.

स्वर्गीय नर्तिकांनीं विविध हावभांनी व मुद्रांनीं महाराजांच्या

गुणांचे प्रगटीकरण केलं. त्या नर्तिकानी जणू उदरी येणाऱ्या पुत्राच्या विविध जन्माची कथाच ( जी मागील प्रकरणात सांगितली ) सांगितली. सर्व सभासदाना तें नृत्य पाहून संसारांतील सुखदुःखाचे अनुभव म्हणजे कर्म-भोगच आहे असा साक्षात्कार झाला.

अशाप्रकारें तो संपूर्ण दिवस आमोद-प्रमोदात कसा सपला आणि केव्हा संपला याचें भानही कुणाला उरले नव्हते.

० ० ०

इन्द्रपत्नी आणि मरुदेवी बोलत बसल्या होत्या. इन्द्रपत्नीने म्हटले, " तुम्ही फार भाग्यवान आहात. मातृत्वाचं सुख मला मिळणं शक्य नाही. परन्तु तुमचा नित्य सहवास घडावा, सेवा घडावी म्हणून मी दर-रोज येईनच. "

मरुदेवी म्हणाली, " भाग्य मातेचं तसं सर्वांचहि भाग्य म्हटलं पाहिजे. जगाचा उद्धारक माझ्या पोटी येणार ही तुमची भविष्यवाणी खरी ठरली तर मला त्यात आनंदच आहे. फुलाचा वास जसा दगडालाहि लागतो त्या प्रमाणें त्या पवित्र पुत्राच्या सहवासाने माझंहि जीवन सुरभित होईल. "

इन्द्रपत्नीने आपल्या सहा देवकुमारींना म्हटले, " तुम्ही या विश्वमा-तेच्या सेवेत निरंतर रहा. मातेच्या जेवणाची, झोपण्याची, स्नानादिकांची सर्व व्यवस्था तुम्ही पहा. "

त्या देवकुमारींचा परिचय करून देतांना इन्द्रपत्नी मरुदेवीस म्हणाली, " ही श्री नावाची अत्यंत रूपवती अशी देवकुमारी असून मागल्याची

निर्मात्री आहे. दुसरी ऱ्ही नावाची असून स्त्रियांच्या ठिकाणी स्वभाविकपणें असणाऱ्या लज्जेची साक्षात् मूर्ति आहे. आणि ही तिसरी धृति नावाची देव-कुमारी पहा. कसल्याहि संकटांना पोटात घालून जगाला धैर्य शिकविणारी मूर्तिमंत धीरताच ! आणि ही पहा कीर्ति ! मानवी गुणांचा ज्णु ठेवा वाट-णारी ही देवता तुझ्या गुणाची पताका स्वर्गात देखिल फडकवील. ही बुद्धि नावाची पांचवी देवता पहा पण छे ! तुमच्या बुद्धिपुढें ही दासी शोभेल. तरीहि पण ती असू द्या, वर कां तुमच्या सेवेला. आणि ही सहावी देवकुमारी लक्ष्मी ! तुमच्या सर्व इच्छा पूर्ण करणारी ही कल्पलताच समजा तुम्ही. ''

त्या नंतर त्या सहा देवकुमारी मनोहर अंगविक्षेप, नेत्रविक्षेप, वक्ष-विक्षेप, भृकुटि विक्षेप इत्यादि नृत्यातील विविध विलोभनीय विक्षेप करीत मातेला नमस्कार करुन म्हणाल्या—

" तुमच्यामुळ पृथ्वीवरील अलौकिक सुख आम्हाला पहावयास मिळत आहे. तुमच्या शरीराला व्यापून आम्ही राहू. आमच्याकडून काही अपराध झाला तर क्षमा करावी ''

मरुदेवीनं सर्व देवकुमारींच्या मस्तकाचे चुंबन घेतलं. त्याना हृदयाशी धरलं इन्द्रपत्नीने तिचा निरोप घेतला.

## ज न्मो त्स व

गर्भवती मरुदेवीचा काळ सुखांत चालला होता. पोटात आलेल्या बालकाची आंतल्या आत होणारी हालचाल होईना म्हणून ती साशंक झाली होती. घाबरली होती. तिनं देवतांना विचारलं, " गर्भातील हालचाल अशी बंद का ? "

देवी म्हणाली, " तुमच्या पोटी आलेला बालक हा अत्यंत मातृभक्त आहे. आपल्या हालचालीनं आईला कष्ट होऊ नये म्हणून तो असा स्तब्ध झाला आहे. "

आपली समजूत पटत नसेल तर जेव्हा तुम्ही साशंक व्हाल तेव्हा तुम्हास पुन: हालचाल होत असलेली कळून येईल.

माई मरुदेवीला या गोष्टीचं मोठं कौतुक वाटलं. नऊ महिन्यांचा काळ तिनं मोठ्या मजेत घालविला होता. नऊमहिने कसे संपत आले हेंहि तिला कळालें नाहीं.

एकदां ती सचित असतां देवकुमारींनी नानाविध प्रश्नांनी तिचं मन आनंदित केलं.

श्री नावाच्या देवतेन विचारलं—

" हे माते, असा कोणता पदार्थ आहे की तुमच्या पेक्षाही महाराजांना अत्यंत आवडतो ? "

चेष्टेनं विचारलेल्या या प्रश्नाला मरुदेवीने उत्तर दिलं— " हे कुमारी महाराजाना माझ्याहून आवडता असा एकच पदार्थ आहे तो म्हणजे माझे आरक्त ओठ "

तें उत्तर ऐकून साऱ्या देवकुमारी लाजेने चूर झाल्या.

तेव्हा दुसऱ्या देवकुमारीने विचारलें,— " तुमच्या शरीरावर अत्यंत आवडती अशी रेषा कोणती ? "

साऱ्या देवता उत्तराची वाट पहात होत्या. तेव्हा माता म्हणाली:-

" अग हे ओळखणं फार सोपं आहे. हातावरील भाग्यरेखा हीच माझी आवडती रेषा होय "

तिसऱ्या देवतेने म्हटलं, " हे प्रश्न अगदी साधे आहेत. माझ्या प्रश्नाचं आता तुम्ही कृपाकरून उत्तर द्यावं. "

ती म्हणाली, " मी दोन प्रश्न विचारणार आहे. त्या दोन प्रश्नांचे उत्तर मला एकाच शब्दांत मिळावें.

मरुदेवी म्हणाली, " ठीक आहे. "

तेव्हा देवकुमारीनें विचारलें—

" देव देखील ज्याची पूजा करतात त्याला काय म्हणावें ? आणि उत्तम हत्तीची निवड कशा वरून केली जाते ? "

प्रश्न दोन आणि तेही अगदीच वेगळाले. सर्व देवता गंभीरपणें माते कडे पाहात होत्या.

" सुचलं बरं कां, " आई म्हणाली, " सुर-वरद " या एका शब्दांत दोन्ही उत्तरें आहे. सुर म्हणजे देव त्याना श्रेष्ठ ( वर ) असलेला तो सुर-

वरद हें झालं पहिल्याच उत्तर. आत्ता चांगला हत्ती कोणता हें दोन गोष्टी वरून ओळखतात–सु–रव–रद. सु–म्हणजे चांगला; रव म्हणजे आवाज आणि रद म्हणजे दांत. चांगला आवाज व चांगले दात यावरून हत्तीची परीक्षा होते.

या उत्तरानें साऱ्यांना मोठी मौज वाटली.

अशा प्रकारें अनेक गोष्टीवरून प्रत्यही चर्चा होई. मरुदेवी कोण–त्याही कलेत चतुर होती.

कधी संगीताची मैफल भरे. विविध रागांच मिश्रण करून देवतांनी रागाच आलाप करावयाचा. आणि राणी मरुदेवी मोठ्या चातुर्याने त्यातील विविध रागाची नावें सांगायची.

नऊ महिन्याचा काळ संपला. चैत्र शुद्ध नवमीच्या दिवशी अगदी सूर्योदयाच्या वेळी, उत्तराषाढ नक्षत्राच्या समयी मरुदेवीन मुलाला जन्म दिला.

बालसूर्य उदयाचली यावा, वेलीला फूल यावं, आकाशात पूर्णचंद्राच आगमन व्हावं तस झाल. जणु आज पृथ्वी सनाथ झाली होती सीमावर्ती समुद्र ही आपली मर्यादा सोडून आनंद प्रदर्शित करीत होता.

महाराजाना ही बातमी कळायला उशीर लागला नाही. ज्या दूतान ही बातमी आणली होती त्यास भरपूर रत्न–हिरें देऊन महाराजानी संतुष्ट केलं. गोपुरांतील नगारे निनादू लागले. तरुण युवतींनी फेर धरून नृत्य करायला सुरुवात झाली.

याच वेळी महाराजाच्या दीर्घ प्रयत्नानें ऊसांपासून साखर तयार करण्याला यश आलें होतें. त्या साखरेचा प्रसाद सर्व जनतेला आजच्या दिवशी देण्यात आला. साखर वाटण्याला जें मागल्याचे रूप आलें तेंही याच दिवशी.

इतक्यात एक दूत महाराजाकडे आला आणि म्हणाला, " हे स्वामी जंगलांतून धरून आणलेले जंगली बैल अत्यंत शांत झाले असून त्यांच्या ठिकाणची क्रूर प्रवृत्ति नष्ट झाली आहे."

महाराजाना फार आनंद झाला. इकडे प्रयोग शाळेंत साखर निर्माण

झाली होती. बैलाला माणसाळविल्यात यश मिळाले होतें.
महाराजानीं आपल्या आवडत्या मुलास 'वृषभ' ( बैल ) याच नांवानं हाक मारली.

मरुदेवीनं मुलाचं मुख पाहिलं. तिनं त्याच्या कपोलाचं चुंबन घेतलं. त्या चुंबनातील आनंद अवर्णनीय होता. राणी आनंदानं बेहोश झाली होती. जगातील परमोच्च सुखच जणु जन्माला आलं होतं तिच्या घरी. नाक, डोळे, जिवणी, हात, पाय, सारे किती विलोभनीय होते. इवलाशा डोळ्यातील गांभीर्य, बंद असलेल्या मुठीतील औत्सुक्य. सारंच विलोभनीय!

ही गोष्ट नाभिराजाच्या मित्राला—स्वर्गीच्या इंद्रालाही कळली. आपल्या परिवारासहित तो खाली आला. इंद्राने नाभीचें अभिनंदन केलें— अगस्त्य फुलाच्या वर्षावानं.

" नाभिराजा, तू फार भाग्यवान आहेस. जगाचे हित, जगाचे कल्याण, जगाचा मित्रच जणु तुझ्या घरी जन्मला आहे. योग्य विधि—संस्कारानीं त्या थोर मुलाचा जन्मोत्सव करावा म्हणून मी मुद्दाम आलो आहे."

हा सर्व रुक्ष संवाद ऐकायला इंद्रपत्नी होती कुठे. ती थेट प्रसूतीच्या खोलीत गेली होती. नवजात शिशूचे ते मंगल रूप पाहून ती वेडावली होती. सुखावली होती. त्या बालकाला हातात घेऊन ती मटामट मुके घेत होती. कुरवाळत होती. हृदयाशी धरून जोजावत होती. बालकाच्या मांसल शरीराचे स्पर्शानं ती पहिल्यानदा अशी सुखावत होती. इवल्याशा डोळ्यातील तेज पाहून तिला आपल्या अलंकाराचें तेज फिक्कं वाटत होतं.

थोड्या वेळाने इंद्राही तेथें आला. स्वर्गातच सौंदर्य अनंत हा त्याचा गर्व नष्ट झाला होता. तोही वेडावला. त्यानं आपल्या बायकोकडून ते मूल हिसकावून घेतलं. म्हणाला—

" अग, तूं पाडशील त्याला. " इन्द्रपत्नी लजील झाली. इन्द्रानं हजारों डोळे केले. त्या हजार डोळ्यांनी इन्द्र बालकाचे रूप निहाळू लागला. परन्तु तृप्ती होईना. इंद्रपत्नी हंसून म्हणाली, " हजार डोळे करून पाहिलें. तरी रूप ते रूप. नाही तर तुमचे रूप पहा. "

सान्या देवकुमारी हंसू लागल्या ते इन्द्र पतिपत्नींचं भांडण पाहून.

परतताना इन्द्राने बालकास विविध प्रकारची रत्ने, वस्त्रें, अलंकार भेटी दाखल दिले.

इन्द्रपत्नीने पुन: भेटण्याचें आश्वासन दिलें. व ते सर्व आपल्या परि–वारांसहित स्वर्गाला निघाले.

हा जन्मोत्सव आठ दिवस चालू होता. देवकुमारी बालकाला न्हाऊ घालत, तेलानं मालीश करीत, नवी नवी वस्त्रें तयार करून घालीत. त्याला खेळवीत असत. मरूदेवीच्या गांवातील मैत्रीणी दररोज येऊन बालकाचे कोडकौतुक करीत. मरूदेवीला बालकामुळ एक नवीनच तेज प्राप्त झालं होत. मनाला अननुभृत असा आनंद झाला होता. बालकाच्या जन्माने स्वत:चं यौवन फळालं आलं होतं.

स्त्री शरीराची उत्कृष्ट सीमा मातृत्व हीच नव्हे का ? स्त्रियांची चित्तवृत्ती बालकाच्या मुखदर्शनाने जितकी उल्हसित होते तितकी कशानेच होत नाही हे म्हणणें तिला आज खरें वाटू लागले होतें.

नाभिराजहि पुत्रजन्मान वेडावला होता. कुलाचं संरक्षण, कुलाची वृद्धि मुलावरच अवलबून नसतात कां ? नाभिराजानं स्वत:च्या कुलाला " ईक्ष्वाकु " असें नाव याच वेळी देऊन नव्या वंशपरंपरेची स्थापना केली. ' ईक्ष्वाकु ' म्हणजे ऊस. उसाच्या एका पेरांतून दुसरें, दुसऱ्यातून तिसरे अशी पेरें निघतात त्याप्रमाणे वंशाची सतत व मधुर वाढ व्हावी हाच त्यांचा उद्देश हें नाव ठेवण्यात असावा.

• • •

वृषभाचं जीवन कळीप्रमाणें विकसू लागलं. फुलांना सुगंध स्वाभाविकतःच असतो त्याप्रमाणं त्या बालकातील अनेक गुण हळुहळू विकसू लागले. तो 'दुडुदुडु' धावताना आईला परम आनंद होई. त्याचं हंसणं, रुसणं, रडणं, हट्ट करणं, गडबडा लोळणं सारंच मनोहर असे.

त्याच्या हट्टानं कधी कधी नाभिराजे दिङ्मूढ होऊन जात. काय करावं हेंच सुचत नसे. पण आईवडिलांना असे पेचात सांपडलेले पाहून तो आपला हट्ट मोडून पुन्हा खदखदा हसू लागे.

इन्द्राने अनेक देवांना व देवकुमारींना बालक रूपे घेऊन वृषभासवें खेळण्यास पाठविले होते. देवांना अनेक रूपें धारण करतां येत असल्यामुळें वृषभनाथांची करमणूक होत असे.

देवांनी हत्तीचं रूप घ्यावं त्यावर वृषभनाथाला बसवावं, कधीं आपल्या

सोंडेंत त्याला धरून हळुहळू फिरवावं. आणि हळूच फुलांच्या गादीवर फेकावं. कधी विमानातून फिरवून आणावं. जंगलातील मोठ मोठे हत्ती, गेंडे, वाघ, सिंह दाखवावेत नदी काठी नेऊन पाण्यातील मासे ते दाखवीत. स्वतः देखील माशाची रूपें घेऊन बालकाची करमणूक ते देव करीत.

वेगवेगळ्या प्रदेशात, देवकुमाराच्या सन्निध राहून अनेक प्रकारची क्रीडा वृषभ करू लागला.

लहानपणचे तोतरें व लाडिक बोलणे कमी झाले. आईशी नवीन नवीन गोष्टी करायच्या, तिच्या मनाला प्रसन्न वाटेल अशा लाडिकवाणीत तिच्याशी थट्टामस्करी करायची यात बालपण निघून जात होत.

मरूदेवी बालकाला विविध पोषाख करण्यात, त्याची मुलीसारखी वेणी गुंफून तिच्यात फुले माळण्यात रंगून जाई देवकुमारानी केलेल्या खोट्या वृषभ जेंव्हा आईला सागे तेंव्हा तर हसता हसता मुरकुडीच वळे तिची बालकाच्या वाणीतील मिठ्ठासपण पहिल्यादाच ती अनुभवत होती विविध खेळांतील त्याचे चातुर्य नाभिराजाला सागण्यात, बालकाची स्तुति करण्यात तिला फारच मौज वाटू लागली. दोघांना बालकाच इतक वेड झाल की उठता बसता तोच एक विषय पुरत असे बालकाच्या ममतेचा कधी कुणाला कंटाळा आला आहे काय ?

कधी कधी ते बालक गमतीनें विचारी, " आई, माझे केस तुझ्या इतके लाब केव्हा होणार ग ? "

आई म्हणायची, " तुझी दाडगाई कमी झाली की केस आपो-आपच वाढतात. "

या उत्तरानं वृषभ हंसू लागे त्याला जणु सागायच होत की तुम्ही मोठे लोक सारे खोटे आहात.

नेमकी स्नानाची वेळ झाली की वृषभ लपून राहू लागला. काढलेलं पाणी नेवू लागे हाताला लावलेलं उटण बोटाना तसेंच लागून राही. आणि सटपाळ बालक आईला अगदी त्रासून सोडी हांक मारून ती दमून जाई.

मग सारा राजवाडा शोधण्यास सुरुवात होई. आई पुढें आणि बालक वृषभ मागे असा प्रकार होई.

जेवतानाहि वृषभ असाच प्रेमळपणे छळीत असे. त्यामुळें आईचा खोटा राग उसळून येई ती वृषभाचे दोन्ही हात धरून त्यास जेऊ घाली. जेऊ घालतानाहि तो तोंडातला घास तसाच ठेवून आईला तसेंच तिष्टत ठेवण्या-तहि त्याला मोठी मौज वाटे.

या सर्व खोडयांची नाभिराजाकडे फिर्याद होई. वृषभाच्या चेहऱ्यावरील प्रेमळ, अव्याज भाव पाहून पित्याची ममता उसळून वर येई वृषभाच्या गालावर पित्याच्या प्रेमाचे ठसे उमटु लागत. वडीलाच्या मांडीवर बसून त्यांच्या दाढी-मिशाशी खेळत बसण्यात तिला, कुरवाळण्यात बालकाला फार मौज वाटे.

वडील त्याला अनेक गोष्टी सांगत. त्या गोष्टीत तो रमून जाई नाभि-राजाने स्वतः त्याला वनात फिरायला न्यावे, तेथील पशु-पक्षांनी ओळख करून द्यावी, निरनिराळया फुलाचे गुणधर्म समजावून सांगावेत, विविध फळांचा आस्वाद मुलाला घेऊ द्यावा, अशा रीतीने बालकाचा विकास साध-ण्याचा आई-वडील प्रयत्न करीत.

० ० ०

आईवडीलांचा आदर करणे या व्रताशिवाय अन्य व्रतें कमी मोलाची आहेत हे जणु ' नाथा ' ने आपल्या वागणुकीने सिद्ध करून दाखविलें.

नाथांचें वय ८ वर्षांचें होतांच नाभीने इन्द्राच्या सल्यानें 'ज्ञान संस्कार' दिन साजरा केला. गांवांतील प्रमुखाना आमंत्रणें गेलीं. इन्द्र म्हणाला.

" नाभिराजा, तुझा मुलगा त्रिकालज्ञानी आहे. अशा वेळी"

# यौ व न

वृषभाचं शरीर वज्राचं. या शरीरातील वैभव म्हणजे कसलीहि शारीरिक पीडा उद्भवत नसे. वात, पित्त, किंवा कफ यामुळे कसलाहि रोग उद्भवत नसे. अपघात कसला असतो त्या देहरचनेला माहिती नसतो.

अशा देहरचनेला वज्र—वृषभनाराच रचना म्हणतात. वृषभकुमाराला ही शारीरिक रचना पहिल्यांदाच प्राप्त झाली म्हणून तेंच नांव दिलं गेलं. या रचनेंत म्हातारपण येत नाहीं. घामाचा त्रास होत नाही. खोकला येत नाही. कितीहि शारीरिक कष्टानं ते शरीर दमून जात नाही.

यामुळें वृषभाचं शरीर म्हणजे शहरवासियींना जबरदस्त आकर्षण होतं. रत्नाप्रमाणं चकाकी होती त्याच्या शरीराला. त्यांच्या भुजा, त्याची विशाल छाती, त्यांच्या पिळदार मांड्या, त्यांचे राजीव नयन, त्यांचे काळे कुरळे केस मनाला मोहिनी घालीत. वृषभाची शरीरयष्टी देवांहून सुंदर व आकर्षक होती.

ज्ञान संस्कार म्हणजे सूर्याला प्रकाश–संस्कार केल्यासारखाच नाही का ? "

नाभि म्हणाला, " पितृकर्तव्य म्हणून काही असतंच कीं. शिवाय मला जनाभिमुख असलें पाहिजे. प्रत्येक आर्य पुरुषाने आपल्या संततीवर योग्य संस्कार करावेत व ही प्रथा चालू रहावी हा हेतू आहे यात. "

एका मंगलदिनी सकाळच्या शुभ मुहूर्तावर वडीलानींच स्वत: गुरू होऊन मुलाला मंत्रांनी पवित्र केलें. त्यास अष्टव्रते दिली. मद्य, मास आणि मध या पदार्थांना जन्मांत शिवणार नाही. ज्ञानाभ्यासाची ब्रम्हचर्य पूर्वक आराधना करीन. आई–वडील–गुरु यांच्या आज्ञेत राहीन इत्यादि नीति–वचनांची केवळ कबूलीच नव्हे तर प्रतीज्ञा त्या 'आदर्श पुत्राने' पित्या–समोर केली. नंतर एका लाकडाच्या पाटीवर रत्नांची धूळ पसरून वडीलांनी " ॐ नमः सिद्धेभ्य: " हा शिक्षणाचा पहिला पाठ दिला.

नंतर शहरांतून त्या बाल–मूर्तीची मिरवणूक काढण्यात आली. एखादा बाल–सूर्यच स्वतेजाने चमकत आहे असें लोकांस वाटले. गावांतील मंडळींनी बालकास हार–तुरे आर्पण करून त्याचा सन्मान केला. स्त्रियांनी पुष्पवृष्टी करून आपली सदिच्छा प्रकट केली.

वृषभाचं बाल्य असं दिव्य होतं· त्याच्या वागणुकीत माधुर्याची पाखर असे. बोलण्यांत सज्जनांचा सन्मान असे. कृतींत निष्ठा असे

आपल्या विविध गुणांनी शहरवासियांची हृदयें त्यानें काबीज केली होती. अनेक मित्रांचा परिवार त्याच्या भोवती नित्य रेंगाळत असे. त्याच्या मार्गदर्शनाखाली अनेक जीवनें घडत होती, फुलत होती, विकसत होतीं.

० ० ०

तारुण्याच्या आगमनाने सारे अवयव अधिकच सुंदर झाले. मित्र-परिवाराला वृषभाच्या या शरीराचा एका अर्थानें हेवा वाटे. कसल्याहि आभरणाशिवाय, अलंकाराशिवाय, प्रसाधनाशिवाय वृषभाच शरीर एकाद्या राजहंसाप्रमाणं शोभून दिसे,

वडिलांच्या कामात ते आता मदत करु लागले. नाथाचे विचार नवीन जगरचनेस मदत करू लागले मित्राना जंगलात नेऊन जाऊन त्यांनी कृषि-विद्येचा पाया घातला. शेती करण्यासंबंधी अनेक कुटुंबाना माहिति दिली. इतकेच नव्हे तर जो शेती करील तोच भूमीचा मालक होईल. तोच देशहित, धर्महित, व समाजहित साधू शकेल असा उपदेश केला. काही कुटुंबानी नाथांच्या सहाय्यानें शेती-उपकरणाची निर्मिति केली. बी-बियाणे, नांगरणे, खुरपणें, पेरणी करणे, तण काढने, कापणी करणे, धान्य साफ करणें, मळ-णिणें, इत्यादि विविध प्रकारांची नाथानी त्या कुटुंबाना माहिति करून दिली.

नाभिराजानं त्या शेताना भेट दिली. एकीकडे उसाचे शेत मानताठ करून ऊभें होतें. अनेक कुटुंब इक्षुरसपान करून सुखी होते नाभि राजानें त्या इक्षुरसाची चव घेतली स्वतःच्या मनानेही जगाच्या धारणेत, पर्डी वसविण्यांत हिरीरीने भाग घ्यावा याचे त्यास नवल वाटले.

ते म्हणाले ' वृषभ, तू विश्वकल्याणाचा पाठीराखा आहेस. विश्वाची धारणा करून समस्त सृष्टीला एक वेगळेंच वळण लावून शाश्वत तत्वाना विश्वतोभिमुख करण्याचा तुझा प्रयत्न स्तुत्य आहे या शेतकरी वर्गाला आज-पासून राजमान्यता मी देत आहे यानी जगाच्या कल्याणासाठी आमरण झगडावे अशी माझी इच्छा आहे ”

शेतकऱ्यानी त्या प्रतिज्ञेचा अंगीकार केला. नाथाना त्या गोष्टीच मोठं कौतुक वाटल. पृथ्वीतील गुप्त रसाला बाहेर काढून उपजीविकेला सहाय्य करणाऱ्या त्या शेतकरी वर्गाची त्यानेही प्रशंसा केली

• • •

त्या दिवशी नाभिराजाने मरुदेवीला ही गोष्ट सांगितली. मरुदेवी म्हणाली, " नाहीतरी वृषभाच्या अंगी तुमचे सारे कर्तृत्व उतरले आहे. अद्याप लहान आहे तर जगाची काळजी त्याला पडलेली असते. परवा कसल्या-तरी झाडांची बोंडे घेऊन आला होता आणि त्या बोंडातील पदार्थापासून सूत काढण्याचा उद्योग आपल्या मित्र मंडळींना शिकवित होता कापड तयार करुन सर्वांना उपयोगात आणता यावें म्हणून तो हा सारा प्रयत्न करीत होता. शेंकडो उद्योगात तो गुतलेला असतो. सर्व प्रकारे लोकाना कल्पवृक्षाचा आसरा सोडून स्वत च्या शारीरिक व बौद्धिक सामर्थ्यावर उभे करण्याची सारखी धडपड चालू आहे "

नाभि म्हणाले, " आता आपला वृषभ मोठा झाला. त्याच लग्न कराव अस नाही का तुला वाटत ? "

" न वाटायला काय झाल ? पण त्याच हे अप्रतीम रुप, लावण्य याना शोभून दिसणारी मुलगी तर मिळाली पाहिजेना !

" मुलगी मिळेल, पण " नाथ " तयार झाला पाहिजेना. इंद्राने सांगि-तल्या प्रमाणें हा ससार सोडून महामुनी होणार हें खरें ठरणार आहे. "

" ससार सोडेल तेव्हा सोडेल. पण सुखाच्या ससारात तो रमणार नाही असें थोडेंच आहे. माझ्या मुलाला जगासाठी, घरासाठी, कुल वृद्धीसाठी काही तरी लोकाचार पाळवेत असे मला वाटेल "

इतक्यांत इंद्र भेटायल आला आहे अशी वार्ता दूतांने आणली. नाभीने इंद्राला आत पाठवून देण्यास आज्ञा केली

इंद्र व इंद्रपत्नीचं आगमन राजवाड्यात झाल्याबरोबर फारच वेगळ्या वातावरणानं सारा राजमहाल भारन गेला

उठून दोघांनी त्याचा समान केला. इंद्राचं तेज सर्वत्र पसरत होतं. त्याच्या दिव्य दतपक्तीतून किरणें बाहेर पडत होती.

तो म्हणाला, " तुमचे कल्याण इच्छितों, नाभिराजा. "

नाभिराज म्हणाला " मी तुमचीच आठवण करीत होतो. "

इंद्र म्हणाला, ' तुमचा मुलगा आता कर्तबगार झाला आहे. तुम्हाला या मित्राची काय आठवण होणार. माझ्या पत्नीला वाटलं, बऱ्याच दिवसात वृषभाला पाहिलं नाही तर आज मुद्दाम तिच्यासाठी मला यावें लागलं. '

. नाभिराज म्हणाले, " मित्राला विसरण्याच स्वप्नात देखील इक्ष्वाकु कुलातील माणसांना जमणार नाही श्रीवृषभाला आता लग्न करण्याची प्रेरणा करावी असा मनोदय ' मरु ' नं प्रगट केला. मी म्हणालो, ' मुलगा तयार झाला तरच या गोष्टी केल्या पाहिजेत शिवाय दुसरी अडचण म्हणजे त्याला अनुरूप वधू नको का मिळायला. "

इन्द्र म्हणाला, ' पित्याची आज्ञा मोडण्याच शील इक्ष्वाकु कुलांत आहे का ? वृषभानारख्या विश्वबंधुकडून असें घडेल का ? तुम्ही त्याच्याकडे आजच गोष्ट काढा. '

इंद्राने सर्व कुशल विचारले नाभीने वृषभाची स्तुति केली त्याने चालविलेल्या अनेक जनकल्याणकारी उद्योगाची इन्द्राला परीचय करून दिला.

इन्द्र म्हणाला. " तुम्ही कर्मभूमीचा पाया घातला आहे. त्या कर्म— भूमीला शाश्वत मूल्याची महान देणगी तुमचा स्वयप्रबुद्ध मुलगा देत आहे. स्वभावानेंच त्याचं कार्य दीपाप्रमाणे प्रकाशदेण्याच ठरून गेल आहे. निसर्ग— त:च ज्योतिर्मान, प्रज्ञावान् तुमचा मुलगा असा स्वस्थ का बसेल ? "

मुलाच्या स्तुतीनं बापाच्या वृत्ती वहरून जाण्या यात नवल ते काय?

इतक्यात वृषभराज तेथें येऊन दाखल झाले इन्द्राने त्या यौवनोत्फुल्ल तरुणाकडे क्षणभर पाहिले प्रत्यक्ष कामदेवाच रूप साकार झालेलेच जणु तो पहात होता. रुचिर स्मिताची आभा त्याच्या चेहऱ्यावर पसरली होती. बोलताना माधुर्य आणि अन्वर्थ असेच शब्द त्याच्या तोंडावाटे बाहेर पडत होते. इन्द्राला स्वतःच रूप ओवाळून टाकाव असं वाटलं. इन्द्रपत्नी तर मुग्धच झाली. ती म्हणाली,

" पाहिल्यात पृथ्वीवरील चमत्कार ! मानवीरूपाचं अगद दिव्य स्वरूप स्वर्गांत तरी पहायला मिळेल का ? "

वृषभदेव शांतपणे म्हणाले, " देहावर असं मुग्ध होण्यापेक्षां ज्यांच्या उदरीं जन्म घेऊन हें शरीर प्राप्त झालं त्यांच्यावर तुम्ही मुग्ध झालं पाहिजे देहावरील श्रद्धा ही कागदाच्या नावेसारखी क्षणिक असते. हें मी आपणास सांगावें असे थोडेंच आहे."

त्यानंतर बराच वेळ विनोदांत गेल्यावर इंद्र स्वर्गलोकी परतला. दोघेहि नाथांच्या गुणांचं व रूपाचं वर्णन करीत होते. दोघांना शब्द व कल्पना अपुऱ्या वाटत होत्या.

वृषभराजकुमारानें वडिलांची भेट घेतली. वडिलांना नमस्कार करून जवळ आसनावर तो बसला होता. कसा विषय काढावा या चिंतेत वडील होते. ते म्हणाले," मुला, आम्ही असा विचार केला आहे की, तुझा विवाह करावा. सुनेचं मुख पाहाण्याची कोणत्या आईची ईच्छा नसते? आईची इच्छा तुझ्या यौवनाला वाट करुन द्यावयाची आहे."

वृषभ शांतपणें ऐकत होता. तारुण्यांतील विकारसुलभता त्यांच्या ठिकाणी नव्हती असे नाहीं. उपभोगाची वासनाही तेथें वास करीत होतीच. पण संयमित मनाचं नियंत्रण होतं. उपभोगाच्या प्रचंड सामर्थ्याबरोबरच निरोधाचा अंकुशहि त्यांच्या जवळ होता. आई-वडिलांची इच्छा व वंश–परंपरेसाठी त्यांनी वडिलांना होकार दिला.

शहरांतील प्रत्येकाला ही बातमी कळाली. परंतु नाभिराजाचा पुत्र इतका गुणसंपन्न होता की आपली मुलगी त्याला शोभून दिसेल की नाही या भ्रांतीमुळे कुणी गोष्ट काढीत नसे. शहरांतील तरुणी वृषभनाथांचा ध्यास घेऊन कृश होत होत्या. त्यांच्या रूपावर भाळल्या होत्या. परंतु आपली

इच्छा आपल्या वडिलाजवळ बोलून दाखविण्यास त्याना लाज वाटत होती. वृषभाला आपण पसंत पडू कां ? आपण त्याच्या रूपादि गुणाशी अंशत: तरी स्पर्धा करू शकू का ? या चित्त चाचल्यामुळ त्या युवति मनात झुरत होत्या. मंत्रिणीच्या मनातहि तेच असेल ही भीति त्याना वाटत होती.

वृषभनाथांनी लग्नाला सम्मती दिली. हें ऐकून आईला फारच आनंद झाला. तिला माहित होतें की तिचा मुलगा अनेक गुणांनी व डिळांपेक्षां श्रेष्ठ असला तरी वडिलांची आज्ञा तो शिरोधार्य करील. पहिला प्रजापति म्हणून त्याला " ब्रम्ह " हें नांव सार्थक होओल असा माझा पुत्र कुळ-मर्यादा मुळीच मोडणार नाही अशी तिची समजूत होती.

नाभीनें इंद्राला हि गोष्ट कळविली. इंद्रालाहि परमानद झाला. आदर्श गृहस्थधर्मांचा पाया यामुळच घातला जाणार होता. जीवनाचा महत्वाचा भाग गृहस्थ म्हणून घालवावयाचा असतो. इद्राने व इंद्र-पत्नीने मुली शोधायला सुरवात केली. अनेक मुली या भाग्यविभात्याच्या स्पर्शास उत्सुक होत्या त्या पुण्यसारथीशी केवळ दृष्टि-भेट व्हावी, त्याचे मधुर शब्द कानी पडावेंत, मरू-देवीनें सून म्हणून सम्मानानें घरी बोलवावें. सासऱ्याने " मुली " म्हणून हांक मारावी अशी सुखस्वप्नें पाहाणाऱ्या कितीतरी मुली नगरांत होत्या.

शवटी इद्रपत्नीनें कच्छ आणि महाकच्छ या बंधूच्या दोन बहिणी पसंत केल्या. एकीच नाव यशस्वती व दुसरीच नांव सुनंदा. या दोन मुलीत अधिक सुन्दर कोण हें ओळखण कठिण होंत. सौंदर्य, गुण,रूप, आणि आदर्श गृहिणी होण्याची पात्रता या गुणांच्या त्या पुतळयाच होत्या.

इंद्रपत्नीनें त्या दोन मुलीची स्वत: तयार केलेली चित्रें मरूदेवीस दाख-विली. त्या चित्रांत दर्शविलेलं रूप पाहून मरुदेवीस फार आनद झाला. तिनें आपली पसती दर्शविली.

लग्नाचा उत्सव फारच मोठया प्रमाणात पार पडला. एकवीस दिवस हा उत्सव चालू होता. वधूपक्षाला मोठया आदरानें गांवांत आणून एकीकडे जागा दिली होती. वस्त्रें, रत्न, अलंकार, यांची देवाण-घेवाण, उत्कृष्ट खाद्य-पदार्थांच्या मेजवान्या, तोरणे, मंडप, यांची सजावट ! सारेंच भव्य आणि

आकर्षक ! सारेच दिव्य आणि सुन्दर !

अग्नीच्या साक्षीनें वृषभनाथांचें लग्न त्या दोन मुलींशी झालें. जणु चंद्र-सूर्यांची गांठभेट झाली. असला वैभवसंपन्न उत्सव न भूतो न भविष्यति असा पार पडला. स्वर्गीय देवदेतांनी स्वत: भाग घेतला होता. त्या जोडप्यापुढें इंद्र व इंद्रपत्नीचें जोडपें फिक्कें वाटत होते.

नाभिराज हेच स्वत: पिता आणि पुरोहित. पुरोहिताचे कार्य त्यांनी पार पाडले. सुनेला व मुलाला धर्म अर्थ, काम आणि मोक्ष या चारहि पुरुषार्थांचा त्यांनी उपदेश केला. विषयोपभोगांतून गृहस्थधर्मांचा मार्ग जातो. धर्माकडे लक्ष दिलें तर मानव अर्थ व कामतत्वांना जिंकून बाहेर पडतो नाभीला हें ठाउक होतें की आपण प्रत्यक्ष धर्मसम्राटाला, धर्माध्यक्षाला, हा उपदेश करीत आहोत. परंतु कर्तव्य पार पाडतांना ' हा सान हा थोर ' असा भेद करूं नये हेच तत्त्व जणु ते जगाला सांगत होते.

यशस्वती व सुनंदा मात्र आदिनाथांच तें रूप, तें अभिजात सौंदर्य पाहून स्वत:ला कृतार्थ समजत होत्या. कोणत्या पुण्याईमुळ हे दिव्य शरीर धारण करणारा पुरुष आपला पति होत आहे याचा विचार त्या करीत होत्या. सरस्वति आणि कल्पांत टिकणारी कीर्ति या दोन कन्यकाच जणु वृषभराजाला प्राप्त झाल्या होत्या.

• • •

विवाहानन्तर एकादा गृहस्थ संसारांत जसा रममाण होतो तसें वृषभहि त्यांत गढून गेले. दोन्ही स्त्रियांना न दुखवितां प्रितिवचनांच्या

पर्यायानें ते सुखी करीत होते. विविध कामक्रीडेंतहि ते इतके तरबेज आहेत याची कल्पना प्रत्यक्ष कामदेवालाहि यापूर्वी आली नव्हती. स्त्री ही संसार वृक्षाची सावली आहे. तिच्या चित्तवृत्ति प्रफुल्लित करून, तिच्या भावनांना पुलकित करून, तिला रोमांचित करून स्वतः सुखी होणे यातच गृहस्थाचे पौरुषत्व असतें.

दोन्ही स्त्रियांबरोबर जगत्पति वृषभ जलक्रीडा करीत. त्या क्रीडेंतहि ते आत्मरसानुकूल त्यांना बनवीत. वाहात जाणाऱ्या पाण्याकडे बोट दाखवून ते म्हणत, "माझ्या लाडक्यांनो, हें पाणी जसें समुद्राकडे तीव्र वेगाने निघून जात आहे तसेच आपलें जीवनहि वेगानें मृत्यूकडे जात आहे."

अज्ञान्याचा उपभोग आणि ज्ञान्याचा उपभोग यांतील फरक जणु स्पष्ट होत होता. जागृति हाच जीवनातील अखंड तेवत राहाणारा नंदादीप असतो.

वृषभ म्हणाले, " म्हणजे माझा तर्कच ठीक आहे तर. चक्रवर्ति मुलगा होईल तुला. ज्याच्या नांवाचें लक्षावधि लोक स्मरण करतील असा पुत्र !

यशस्वती या बोलण्यानें सुखावत होती. ही प्रियकारिता, ही चाटुकारिता तिला नवीन होती असें नाही. पुराणपुरुष पति एकीकडे तर दुसरीकडे जगज्जेता पुत्र ! हें भाग्य केवळ पतीमुळं आपणाला मिळू शकलें ही कल्पना तिच्या मनांत डोकावतांच तिनें पतिकडे पाहिलें.

तिच्या मनांतील भाव जाणून आदिनाथ म्हणाले, " तसं नाहीं, लाडके, कुणाच्याहि जन्मास कुणीहि कारण नाही. आपण केवळ निमित्त आहोत. जन्म-मृत्यूचा विधिलेख ज्याचा त्याचा स्वत:चा असतो तो आपण वाचावयाचा एवढेंच आपलें काम ! "

○ ○ ○

यशस्वतीचा मुलगा म्हणजे नाभीचा नातू होता तो. त्याच्या जन्मोत्सवाचा सोहाळा फारच बहारीचा झाला. आदिपुरुषाने जन्मोत्सवाचा विधि स्वनाच्या देखरेखी खाली पार पाडला. नाभि स्वत: आदिनाथांच्या सेवेला होते. मंत्रोच्चार पूर्वक स्नान, स्नपन, वस्त्राभरण इ. कार्यक्रम झाले. स्वातिनक्षत्रावरील बिंदूनाच मोती होण्याचा मान मिळतो. त्याप्रमाणें योग्य वेळीं केलेले संस्कारच चिरस्थायी होतात. मुलाचं नाव 'भरत' ठेवण्यांत आलं. स्वत: आदिनाथांनी मुलाच्या हस्तरेषाचे अवलोकन केलें. त्याच्या अंगोपांगावरील चिन्हांचे अर्थ तिच्याला समजावून दिले. स्वत: ज्या शुभमुहूर्तावर आदिनाथ जन्मले होते त्याच मुहूर्तावर 'भरत' जन्माला आला होता.

इंद्रानें येऊन आदिनाथांचें अभिनंदन केलें. " चक्रवर्तीत्व प्राप्त करणाऱ्या

भारत देशाला ललामभूत ठरणाऱ्या पुत्राला जन्म देणाऱ्या मातापित्यें अनेक वस्त्राअलंकार अर्पण करून इंद्रानें नमस्कार केला. तो म्हणाला,

"श्री नाभि, श्री वृषभ आणि त्यांचा पुत्र भरत हें तिघे भारतीय संस्कृतीचे निर्माते आहेत. जग असंख्यात वर्षे पर्यंत त्यांच्या नांवाचें स्मरण ठेवील." आदिनाथांना उद्देशून इन्द्र म्हणाला—

"श्री वृषभा, तुम्ही विश्वलोचन आहांत. जग तुमच्या डोळ्यांनी पाहील अशी सृष्टि तुम्ही निर्माण करावी. तुम्ही विश्वव्यापी आहांत. अशा नैतिक आणि धार्मिक मूल्यांचा तुम्ही उपदेश लोकांना करा की ज्यामुळें विश्वव्यापी मानवता—कारुण्य—दया इ. गुणांची उपासना जनतेने अखंड करावी."

इत्यादि प्रकारें संबोधन करून इन्द्र आणि इन्द्रपत्नी स्वधामीं परत गेले.

• • •

भरतानंतर वृषभांना नव्याणव मुलें झालीं. सुनंदेपासून बाहुबली नांवाचा अत्यंत रूपवान व शक्तिसंपन्न असा मुलगा झाला. कामदेवाचं रूप, त्याचं लावण्य, लास्य, हास्य, वैभव सारसारं जणुं पुंजीभूत होऊन एकत्र आलं होतं. त्याच्या पाठीवर 'सुंदरी' नावाची मुलगी झाली. याच वेळी यशस्वती पासून 'ब्राम्ही' नांवाची त्रैलोक्यसुंदरी जन्मास आली. मुले आणि मुली यांच्या विविध क्रीडेंत पिता वृषभ स्वतः भाग घेत. ही शंभर मुलें भावी जगाचा पाया घालण्यासाठीच जणुं जन्माला आली होतीं. वृषभाचे पवित्र मंगल कार्य जणुं दोनशे हातांनी सुरू व्हावयाचें होतें.

ब्राम्ही व सुंदरी नृत्यांत अत्यंत तरबेज झाल्या. हातापायांची मधुर व भावदर्शी हालचाल, बोटांच्या विविध आकृति, चेहऱ्यावरील भावनांचे विशिष्ट मुद्रां-द्वारे प्रदर्शन यांत त्या तरबेज झाल्या. द्रुतगतीनें त्या नाचू लागल्या म्हणजे विद्युल्लताहि फिक्की वाटे.

एके दिवशीं वृषभनाथांनी त्या दोन्हीं मुलींना जवळ बसविलें. त्या मुली आता बाल्याचं वस्त्र टाकून युवती झाल्या होत्या. कटाक्ष, भ्रूलता, दंत-पंक्ती या तीन आयुधांनी जगु त्या मदनाला जिंकणाऱ्या ' रति ' दिसत होत्या.

श्री वृषभांनी त्यांच्या डोक्यावर मंगल हस्त ठेवून म्हटलें, " मुलींनो, तुम्ही यौवनाला प्राप्त झालात. तुम्हाला मुलांपेक्षा मी अधिक चतुर आणि विद्वान का बनविलें, माहिती आहे तुम्हाला ? "

ब्राम्ही म्हणाली, " पिताजी, तुम्ही मला साहित्य, अलंकार, व्याकरण हें शिकवून जगु सरस्वती बनविण्याचा प्रयत्न केला पण याचा स्त्रियांनी उपयोग तरी केव्हां करावा. संततीला जन्म देणं, गृहकार्य सांभाळणं, पतीच्या कामांत मदत करणं, यांतच तिचा सारा वेळ निघून नाही का जाणार ?

" म्हणूनच तीं शास्त्रें मी तुम्हाला शिकविलीं मातेच्या दुधातून ती शास्त्रें अनंत कालपर्यंत मुलाला मिळत रहावीत हीच माझी योजना आहे. मुलांनो, तुम्ही प्रत्यही बघता आहांत की परिवर्तन किती वेगानें चालू आहे. यापुढें कष्टांशिवाय उपजीविका करणें अशक्य होऊन बसेल. आणि कष्ट करण्याची संवय नसणारे, पूर्वींचा शांत स्वभाव विसरून चोरी करायला लागतील. भांडणे होतील. मत्सर, द्वेष, ईर्षा, असूया, दंभ माजेल. सात्विक प्रवृत्तींचा ऱ्हास म्हणजे राक्षसी प्रवृत्तींचा उदय !

इतक्यांत बाहुबली तेथें आला. पिताजींना नमस्कार करून सांगितलेल्या जागी तो येऊन बसला. बाहुबलीचें शरीर एखाद्या शिळागार शिसवाच्या लाकडांप्रमाणें मजबूत दिसत होतें. मदनाचा पराभव करूनच जगु हा जन्माला आला होता. त्याच्या सौन्दर्यावरच खूष होऊन आदिनाथांनी त्याला काम-शास्त्र, आयुर्वेदशास्त्र, धनुर्वेदशास्त्र, रत्नपरीक्षा, धातुपरीक्षा, यांची सवि-स्तर माहिती सांगितली होती. त्या सर्व विषेत तो इतका पारंगत झाला

होता की त्याच्या बरोबरीने भरत हा श्रेष्ठ पुत्रहि फिक्का वाटावा.

" काय बाहुबली, मल्लविद्येचा अभ्यास कसा काय चालू आहे ? " आदिपुरुषाने विचारले.

" तें त्याच्या शरीरावरूनच दिसून येतें. तांबड्या मातीत सारखा लोळून व इतराना लोळवून नुसता 'सुभ' झाला आहे " ब्राम्हीने चेष्टा केली

" ह, ब्राम्ही, तोंड फार सुटलंय. प्रभूंच अमर्याद प्रेम तुला मिळाल.मान्या विद्या स्त्रियाना देऊन जणू स्त्रियांचं राज्यच या पृथ्वीवर येणार आहे असं प्रभूना वाटत. "

" बाळ, " प्रभू म्हणाले, " मी तेंच सागत होतो माणसामाणसातील सात्विक प्रवृत्तीचा हळूहळू लोप होईल अशीच स्थिती येऊन ठेपत आहे. "

इतक्यांत सर्वश्रेष्ठ पुत्र भरताने त्या ठिकाणी प्रवेश केला. सर्वच मुले व मुली उभ्या राहिल्या. सर्वांनी आपल्या मोठ्या भावाला नमस्कार केला बाहुबली उठला नाहीं. तो अद्याप आपल्याच विचारात होता. भरताच्या ते लक्षांत येताच तो बाहुबलीकडे गेला. त्यानं बाहुबलीच्या कपाळाचें चुंबन घेतले. त्याला आनंदित केलं. नतर वडिलांच्या उजव्या बाजून त्याना नमस्कार करून बसला. त्याने अत्यंत विनयाने पिताजीस म्हटले,–

" पिताजी, हे सर्व बंधू आणि या दोन बहिणी याच्या समवेत तुम्ही बसला म्हणजे अगदी मौज वाटते. संसारांत यापेक्षा अधिक सुखकर काही आहे का ? "

पिताजींच्या चित्तवृत्ती अधिकच प्रफुल्लित झाल्या.

ब्रम्हा म्हणाली, " पिताजी म्हणजे मेरु पर्वत आणि आपण त्याच्या भोवती फिरणारे तारे. "

सुंदरी म्हणाली, " पिताजी म्हणजे मोठे कमल आणि आपण सारे भृंगे. गुंजारव करणारे. त्यांच्या गुणाचा मध चाखणारे. "

भरत म्हणाले, " पिताजी म्हणजे एक महाकाव्य आणि आम्ही सारे त्यातील शब्द "

बाहुबलीनें देखील या विनोदांत भाग घेतला. बाहुबली म्हणाला,

" छे ! छे ! पिताजींचें वर्णन एवढ्यानें पूर्ण होणार नाही. तुम्ही तुमची रुपे पहा. तुम्हापैकी प्रत्येकाला वाटेल मी सुंदर आहे. मलाहि वाटतं मी प्रत्यक्ष कामदेव आहे. परंतु पिताजींच्या चेहेऱ्यावरील सौन्दर्य आपणांपैकी एका जवळहि नाही. त्याचं तेज, त्यांचं यश, धैर्य, सात्विकता, पराक्रम, बळ याना सीमा नाही. याचा केवळ अंश आम्हाला मिळाला आहे तर आम्ही एवढे मानी झालो आहोत. पिताजी, तुमची तुलनाच होऊं शकत नाही. "

" पुरे, पुरे, बाहुबली, पिताजींची स्तुति करुं नये असें शास्त्र आहे. "

नंतर आदिवृषभांनी सर्व पुत्रांच्या कपोलाचे चुंबन घेतले त्याना वेग-वेगळ्या रीतीनें शिक्षण देऊन प्रत्यक्ष आपल्या घरीच त्यानी ज्ञानसरीतेचा उद्गम करविला.

भरताला नाट्यशास्त्राची शिकवण देऊन त्याच्याकडून उत्कृष्ट नैपथ्य, रंगशाला, रंगभूमी, वेषभूषा, विचक्षणपात्रांची निवड, कथावस्तु, नृत्य, विनोद इत्यादिकाची पूर्ण माहिती सांगितली.

भरताला नृत्याची व नाटकाची मूळतःच आवड होती. विविध नाट्यांमधून त्यानी आदिपुरुषाचें महत्कार्य गोवून दाखविले. विविध रसाचा उत्कर्ष कसा केला जातो याचेहि ज्ञान त्यानें स्वतः करुन घेतलें

आदिनाथांचें तारुण्य अशा रीतीनें पुत्राना शिक्षण देऊन सुयोग्य बनविण्यांत, आपल्या प्रिय पत्नीशी क्रीडा, विनोद करण्यात गेले.

नाभिराजानें एकदा प्रभूला विनती केली-

" तुम्हाला माझी अशी नम्र विनंती आहे की युगाची दिशा बदलत आहे, नव्या युगाची रचना तुम्ही करावी. पित्याचें कर्तव्य या दृष्टीने माझें कार्य संपलें आहे. अनेक विद्यांचे आदिगुरु म्हणून जग तुमच्याकडे आदर-बुद्धीने पाहात आहे. धर्म-अर्थ-काम आणि मोक्ष या चतुर्विध जीवना-कमलाला सूर्य बनून तुम्ही विकसित करावे. भोगभूमीतील आम्ही माणसें आहोत. उपभोगाच्या पलीकडे आम्हास कांही ठाऊक नाही. उपजीविकेची पंचाईत आम्हास कधी पडली नाही पण ते दिवस पार मावळले आहेत

सर्व लोकांना आपल्या प्रेमाने जिंकून सर्वलोकजित व्हा. इंद्राची देखील हीच इच्छा आहे की अयोध्येचा रथ तुम्हीच आता चालवावा. जे जे राजे तुमचे मित्र आहेत. त्यानाहि वश करून नव्या राजवटीचा धर्मध्वज तुम्ही उभारावा तुमच्या श्रेष्ठ गुणानी नवीन तीर्थ निर्माण तुम्ही करावे "

" पिताजी, " वृषभ म्हणाले, " आपल्या इच्छेला मी जीवनाचा मार्ग समजतो तुमच्या मंगल इच्छेत माझ्याच कल्याणाचा मार्ग मला दिसतो असे नव्हे तर संपूर्ण ईक्ष्वाकु कुलाच्या परमोच्च कल्याणाचा मार्ग आहे असे मला वाटते '

एका शुभ मुहूर्तावर आदिपुरुषाला राज्याभिषेक करण्याचे ठरविण्यात आले. देशादेशीच्या यक्ष, राक्षस, किन्नर, किंपुरुष, गंधर्व, विद्याधर इत्यादींना आमंत्रणे गेली. अनेक मुकुटबद्ध राजांना निमंत्रित केले. भरत, बाहुबली आदि सर्व पुत्रांना फारच आनंद झाला राज्याभिषेकाचा सोहळा त्याना प्रथमच पहावयास मिळणार होता.

भरताने एक मोठे नाटक करावयाचे ठरविले. ब्राम्ही आणि सुंदरी यानी एक सुंदर नृत्याची तयारी केली बाहुबलीला अनेक वनस्पतींचा परिचय होता त्याने विविध वृक्षांचे चूर्ण, रंग, तयार केले. पित्याच्या आनंदात जणु सारे घर भाग घेणार होते. संपूर्ण शहरातच उत्साहाची अपूर्व भरती आली होती लोक–वत्सल, लोक-पाल असा लोकोत्तर राजा त्याना लाभणार होता लोकांना नेमके काय हवे-नको हे ओळखणारा तो लोकचक्षूचा होता. वृषभराजाइतका सूक्ष्मदर्शी, कृपाळू, पुण्यशील राजा मिळणार असल्यावर कुणास आनंद होणार नाही !

• • •

## रा ज र्षि ऋ ष भ

तो मंगल दिवस उजाडला. जणुं सूर्य तो उत्सव पाहण्यासाठीच आला होता. घरोंघरी आदिनाथाच्या गुणाचें संकीर्तन चालू होते. सडा-सम्मर्जनानीं अंगण व रस्ते सुशोभित होते. तोरणें, पताका, शिलीमुख इत्यादिमुळें, रस्त्यांना शोभा आली होती. मंगल वाद्याचे सुस्वर वातावरणांत उमटत, व विरत होते.

गंगा, सिंधु, रोहित, रोहितास्या, हरित, हरिकांता, सुवर्ण, रुप्यकूला, रक्ता, रक्तोदा, सीता, सीतोदा, नारी, नरकांता या जागतिक चौदा नद्यांतील पाणी आणून वेगवेगळया सुवर्णपात्रात ठेवले होते.

काशी, कोशल, पुण्ड्र, उड्र, अश्मक, रम्यक, कुरु, कलिंग, अंग, वंग, सुम्ह, समुद्रक, काश्मिर, उशिनर, आनर्त, वत्स, पंचाल, मालव, दशार्ण कच्छ, मगध, विदर्भ, करहाट, महाराष्ट्र, सुराष्ट्र, आभीर, कोंकण, [illegible], आंध्र, कर्णाट, चोल, केरल, इत्यादि, उत्तर-दक्षिण देशांतील

सर्व राजे, महाराजे, सामंत आपआपल्या देशांहून आले होते. त्यानी आपआपल्या योग्यतेनुसार आपआपला लवाजमा आणला होता.

अयोध्येभोंवती जणुं वेढा पडला आहे असा भास होत होता. या सर्वांची व्यवस्था नाभिराजानें आपला नातु 'भरत' याकडे सोपविली होती. भरतानें आपल्या जन्मजात कौशल्यानें सर्व राजाना अशा रीतीनें जागा दिली, व त्याची सर्वप्रकारची व्यवस्था ठेविली की कुणाचाहि रोष त्यावर झाला नाही.

सुप्रभाती ऐरावत हत्तीवर प्रभूला बसवून गांवातून मिरविण्यात आलें. सुंदर वस्त्राभूषणानी मूळचेंच सुंदर असलेलें रूप अधिकच खुलून दिसू लागलें. गळ्यांतील रत्नहारातील किरणें परावर्तित होऊन वक्ष:स्थलावर पडत होती. कुंडलाना कानामुळे शोभा आली होती की कुंडलामुळे कानाना हें समजत नव्हते. दिव्यरूपाची ती मिरवणूक पाहून देवदेवतानीं पांच प्रकारच्या सुवासिक पुष्पांची वृष्टि केली. ग्राम्हीने रचलेली गीतें सुरेल आवाजात म्हटली जात होतीं लक्षावधि मानवसमुहानें वेढलेले आदिनाथ खरोखरच पृथ्वीनाथ वाटत होते.

गांवाबाहेर उभारण्यांत आलेल्या महामंडपातील सिंहासनावर नाभिराजानें मुलाला बसविले. दिव्यासनावर विराजित आदिपुरुषाची महामंगलमूर्ति पाहाताच मनातील कुवासना हरली जात होती. हेंच ते रूप ! हेंच तें वैभव ! हाच तो साक्षात् धैर्य मेरू ! पृथ्वीवरील मानवता साकळून जणु दिव्यरूपात उभी होती ! प्रत्यक्ष अग्नीच जणु प्रभचें रूप घेऊन उभा होता.

तें रूप पाहून स्वर्गीय अप्सरा वेडावल्या देहभान हरपून जाऊन त्या जणु नाचू लागल्या. गंधर्वांच्या कंठातून मधुर स्वराच्या लहरी निघू लागल्या. इंद्रानें नृत्य करायला सुरवात केली. दिव्य तालावरील तें नृत्य पाहून सारी सभा स्तब्ध झाली. नुपूर, तबला, सनई, जणू जिवंत होऊन प्रभु गुण गाऊं लागले इंद्र तल्लीन झाला होता क्षणांत तो विविध रूपें धारण करी. एकावेळी अनेक इंद्रनाचत आहेत असा आभास पाहाणाऱ्यांना वाटे.

लय–ताल–ध्वनि यांना अनुसरून होणारे हस्त-पाद विक्षेप म्हणजे थय थय नाचणाऱ्या विद्युल्लताच !

कार्यक्रम रंगला होता. आदिनाथ धीर, गंभीर होऊन हा देखावा पहात होते. भरतादि मुलेंहि तें नृत्य पाहून प्रसन्न झाले होते.

० ० ०

त्यानंतर विविध रसांनी प्रभूंचा अभिषेक करण्यांत आला. प्रथम इन्द्राने मंत्रांनी व नंतर पाण्याने अभिषेक केला. तो म्हणाला, " हे महेश्वरा, या जलधारांनी आमचे दैन्य, दुःख व पापें यांचे क्षालन होवो. हा अभिषेक नव्या दिव्य जगाच्या निर्मात्या श्रीवृषभ देवाचा आहे त्यांच्या सेवेत मी माझ्या परिवारासहित केव्हाहि हजर राहीन. "

त्यानतर नाभीराजानें पवित्र जलाने मुलाचा अभिषेक केला. नंतर शेंकडों राजानी प्रभूला स्नान घातले. बाहुबलीने स्वतः तयार केलेल्या वन–स्पतींचें उटणें प्रभूच्या अंगास लावलें. त्या सुवासाने प्रत्यक्ष इंद्रहि आनंदित झाला.

प्रभूचें स्नान झाल्यावर नवी दिव्य वस्त्रें व अलंकार त्यांनी अंगा–वर घातले.

महा आसनावर श्री वृषभांची दिव्य–मंगल मूर्ति विराजमान झाली. नाभिराजाने आपल्या डोक्यावरील मुकुट काढून श्रीवृषभांच्या डोक्यावर ठेवतांच टाळ्यावाजवून सर्वांनी " श्री वृषभ आमचा सम्राट् आहे. आम्ही त्यांचे अनुयायी आहोत. त्यांचा विजय असो, " अशी घोषणा केली.

देवादिकांनी पुष्पांची वृष्टि केली. अनेक वाद्ये निनादू लागली. नंतर गंभीरपणे श्री नाभि म्हणाले, " सर्वजनहो, आजपासून श्रीवृषभ हे तुमचे राजे त्यांच्या बुद्धिवैभवाचा, त्यांच्या प्रीतिसुधेचा, त्यांच्या अगाध ज्ञानरत्नाचा तुम्हास लाभ व्हावा या हेतूने माझें सर्वस्व मी माझ्या पुत्रास अर्पण करीत आहे. हीच प्रथा अनंतकाळापर्यंत चालू राहील अशी माझी खात्री आहे. श्रीवृषभ हे युगनिर्माते आहेत. या नव्या मनूचा जयघोष करून तुम्ही खरो-खरच आपली गुणप्रीति व सद्धर्मनिष्ठा दर्शविली आहे. "

त्यानंतर श्री आदिवृषभ अत्यंत गंभीरवाणीने परन्तु अतिहळुवार-पणे बोलू लागले—

" सुजन हो, हा सर्व सन्मान मी तुमच्या प्रेमातिरेकाने सुसह्य मानला आहे. पूज्य पिताजींच्या कार्याची धुरा त्यांनी कुतूहलाने माझ्या माथ्यावर ठेवली आहे. सर्वजनविलोभनीय ही राज्यधुरा मी केवळ जनहितासाठीच धारण करीत आहे."

o o o

## विश्वचि माझें घर

स्वयंभू सम्राट आदिनाथांच्या राज्याभिषेकाचा सोहळा संपला. भारतीय इतिहासाचे नवें पान लिहिले जाऊं लागलें. विश्वव्यवस्थेचा प्रचंड रथ जणु गतिमान होत होता. त्यांत श्री वृषभांची मुलें व मुली उत्साहानें अग्रेसर होत होती.

एका अनामिक सकाळी अनेक सभासद राजसभेंत उपस्थित होते. सम्राट् आपल्या इष्ट परिवारासह उपस्थित होते राजसभेच्या बाहेरहि गावातील अन्य नागरिक उत्सुकतेनें उभे होते. आदिसम्राटाची राज्यकल्पना हळूहळू मूळ धरत होती. सभेचे लक्ष वेधून घेण्यासाठी नृत्याचे प्रात्यक्षिक केलें जात होतें खास भरताच्या तालमीतील नर्तक व नर्तिका आपल्या नृत्यानें जणुं सर्व सभेला मोहिनी घालत होते. नृत्य संपलें. सर्वांची मनें प्रफुल्लित झालीं. तेव्हां श्री वृषभ म्हणाले-

" आज तुम्हाला मी काही सागावें असा आग्रह कांही सभासदाचा आहे. तेव्हां त्यांच्या इच्छेसाठी व राज्यसुव्यवस्थेसाठी सर्व लोकाची तीन विभागात वाटणी करावी असा माझा इरादा आहे. त्यातील पहिला विभाग क्षत्रिय असावा. जगांत सुष्ट आणि दुष्ट या प्रवृत्ति नेहमीच असणार. तेव्हा क्षत्रियानं केवळ कर्तव्य म्हणून शस्त्र धारण कराव त्या शस्त्राचं प्रात्यक्षिक चिरजीव भरत आणि बाहुबली तुम्हाला करून दाखवतील. "

सर्व लोकाचे लक्ष त्या दोन सुपुत्रावडे वळले अत्यंत बलवान व सुडौल आकाराचे त्याचे बाहु, दगडाच्या विशाल शिळेप्रमाणे भासणारी त्याची छाती पाहून भिम्यालाहि ' अभय ' मिळत असे. धीर येत असे.

थोड्याच वेळात राजसभासद लोक मुद्दाम तयार केलेल्या कृत्रिम रणमैदानावर येऊन बसले. युद्ध व शस्त्र याची कल्पना केवळ सुखोपभोगात रमलेल्याना कशी येणार ? साऱ्याचे लक्ष भरत व बाहुबली या दोन कुमाराकडे वेधलेले होते. सम्राट् आदिनाथाच्या पायाना वदन करून कुमार भरत व कुमार बाहुबली मैदानावर अवतीर्ण झाले.

भरताने आनदानें स्वत जवळील शखाचा घोर आवाज केला. त्या आवाजाने दाहीदिशा जणु कांपू लागल्या त्या शखाचा आवाज लोपतो न लोपतो तोच बाहुबलीने त्याहून मोठ्याने शखनाद केला. जणु दोन मदोन्मत्त हती गर्जना करून युद्ध करण्याच्या तयारीत असावेत.

भरताने स्वत तयार केलेल्या धनुष्याला नमस्कार करून त्याला चाप चढविला भात्यातून बाण काढला. व मत्रस्मरणपूर्वक त्याने तो आकाशात सोडला त्या बरोबर एकादी वीज आकाशात गडगडाट करीत जावी असे दृश्य दिसू लागले

कुमार बाहुबलीने दुसऱ्या बाणाने त्याहून प्रचड आवाज निर्माण केला कानठळ्या बसून जातील इतका तीव्र आवाज झाल्यामुळे काहीं सभासद निघून जाऊ लागले

त्यानतर भरताने असख्य बाणांचा वर्षाव करून सरदिवसा अन्धाराचा भास निर्माण केला. ते असंख्य बाण बाहुबलीने एका अग्निबाणाने जाळून

नष्ट केले. पृथ्वीवर असंख्य वर्षांनंतर असा देखावा पाहाण्याचा योग आला होता. आदिसम्राट् व मनाने शूर असणारे समासद निर्भयपणें तो देखावा पाहून आनंदित होत होते. " शाबास, वाहवा " या शब्दांनी वातावरण ऊजळून निघत होतें. इतक्यात बाहुबली कुमारानें भरताच्या रोखाने बाण सोडला. कुमार भरतानें आपल्या बाणानें त्या बाणाची दिशा परतवून तोच बाण बाहुबलीवर सोडला. सारे घाबरून गेले ' हा सर्व जीवाशी खेळ आहे, " असे म्हणत काही लोक निघून गेले निघून जाणाऱ्या लोकांकडे मिस्किलपणें पहात काहीं लोक हसत होते. ' भित्रे रे भित्रे ' असच जणु ते सुचवित होते.

त्यानंतर भरताने प्रचंड तरवार हातात घेतली. तिची चकाकी—झळाळी पाहूनच थरकाप उडावा. भरताचे विशाल बाहु मोठया कौशल्याने तिला पेलत होते. एकाद्या विजेने नृत्य करावं तशी ती तरवार फिरत होती. तरवारीला लीलेनें फिरवीत भरतानें बाहुबलीवर चाल केली. आता बाहुबली कसा प्रतिकार करतो इकडे सर्वांचे लक्ष होतें. बाहुबलीने त्या तरवारीचा घाव फारच कौशल्याने जवळच्या ढालीवर झेलला. परंतु आघात इतका जोरांत होता की ढाल नुसती चेपून गेली.

(अशी अनेक द्वंद्वे पाहाण्यांत किती काळ लोटला हे कळलेच नाही जणु प्रत्यक्ष सूर्य देखील कौतुकाने ही शस्त्र-क्रीडा पाहाण्यास थांबला होता जे लोक शेवटपर्यंत ही क्रीडा पाहाण्यास थांबू शकले त्यातील काही कुटुंब प्रमुखांना आदिवृषभानें " तुम्ही क्षत्रिय आहात. तुम्ही शस्त्रास्त्राचा अभ्यास करावा. राज्यें निर्माण करुन दुष्टाचे निर्दालन करावें. सज्जनाची उपजीविका सुखकर करावी. साधुजनाना मानानें जगता यावे असे राज्य निर्माण करावे, " असा उपदेश केला.

एक नवीन वर्गच त्या दिवशी उदयास आला. भरताने त्याना शस्त्रे अर्पण करून त्याचा बहुमान केला. श्री वृषभाना त्यांनी लवून नमस्कार केला व ते म्हणाले, " हे पुराणपुरुषा, आम्ही सर्व तुमच्या कृपेस पात्र राहू असे वागू. आमच्या कुलपरंपरेत पृथ्वीपालक निर्माण होतील व ते सर्वलोकाभिमुख असें कल्याणकारी राज्य स्थापन करतील याची दक्षता घेऊ. "

हें सारें ऐकत असता श्रेणिकाला प्रश्न पडला तो अहिंसा धर्माचा. क्षात्रधर्म व अहिंसा याचा कसा मेळ घालावा ?

श्रेणिकाची प्रश्नांकित मुद्रा पाहून मुनिश्रेष्ठ गौतम म्हणाले,

" मानवी जीवनाचे विविध थर आहेत या स्तरातून विकाराचेच प्राबल्य जास्त असतें. विचाराचं मनावरील नियंत्रण हा मानवी जीवन-सागरात प्रवास करणाऱ्या नौकेचा जणु सुकाणू आहे. गृहस्थधर्म पाळन करताना केवळ व्यक्तीचे जीवन हाच एकटा निकष नसतो. कुटुंब, समाज, धर्म, राष्ट्र, आणि विश्व अशा वेगवेगळ्या कसोट्या गृहस्थधर्माशी निगडित असतात. अशा जीवनात सद्‌हेतु प्रेरित हिंसा केवळ कर्तव्य म्हणून निष्कर्म भावनेने, फलाशाविरहित भावनेनें करावी लागते. क्षत्रियोचित हिंसेची उचितता व उपयोगिता कोणताहि मानवीधर्म उपेक्षणार नाही. "

श्री गौतमाच्या या खुलाशामुळ मन शांत झालें. तो म्हणाला, " श्री गौतमांच्या वाणीतील अमृताला तोड नाही. हे ऋषिश्रेष्ठा, श्री वृषभांच्या चरित्राचा ओघ पुनः चालू ठेवावा. "

हिमालयाप्रमाणें स्थिर असणारे जगत्साक्षी गौतमऋषींनी गभीर-वाणीने कथा सांगायला सुरवात केली.

ते म्हणाले " श्रेणिकराजा, श्री वृषभाच्या जीवनातील आश्चर्य हेंच आहे. मानवाला स्वत:च जीवन फार प्यार असतं. त्या जीवनवृक्षाला लागलेला मरणाचा काळा भुंगा त्याला दिसत नाही. परंतु जी संस्कृति केवळ भोगावरच पोसली गेली , जिची जीवनाची निष्ठा म्हणजे भोगनिष्ठा ! अशा जीवनाचा महान ओघ हळुहळू कर्मप्रवण बनवावयाचा, भोगातून भोगविमुक्तिकडं त्याला वळवावयाचा, हे अवघड कार्य श्री आदिपुरुषाला करावयाचें होतें.

० ० ०

क्षात्रधर्मांच्या स्थापनेनंतर श्रीआदीनी वैश्यवर्गाची स्थापना केली. वैलाचा उपयोग करून या देशातील वस्तू दुसऱ्या देशात विकून स्वदेश संपन्न कसा करायचाचा याचे उपायही त्यांनी सांगितले. स्वत: बाहुबलीनें श्री वृषभांच्या आज्ञेवरून नौका तयार केल्या. त्या नौकेचें पहिले संचालन श्री आदीनी केले. सुरवातीला समुद्रावरील वाऱ्याने व लाटांनी प्रवाशाना व व्यापाऱ्याना त्रास होई. परंतु हळुहळू भारतील वैश्यानी दक्षिण समुद्रावर, पूर्वसमुद्रावर, व पश्चिम समुद्रावर व्यापारी विजय मिळवायला सुरवात केली. प्रत्येक नौकेवर शुभ्रवृषभध्वजा फडकत असे. अशा रीतीने व्यापारी वृत्तीची जोपासना करण्यासाठी पहिला प्रयत्न करण्यात आला. प्रत्येक नगरात एक एक प्रमुख व्यापारी निवडून सर्व व्यापारांचें संचालन, नियंत्रण त्यानें करावे लोभवृत्तीवर नियंत्रण ठेऊन अनीतीनें होणारी भेसळ, कर चूकवून आणलेला माल, जनोपयोगी दैनंदिन आवश्यक वस्तूंचा गुप्तपणे संग्रह इत्यादि गोष्टीवर नियंत्रण राखण्याची त्याने प्रभूच्या चरणाला स्पर्शून प्रतिज्ञा घेतली.

अशा रीतीने राज्याच्या दोन अंगांची —संरक्षण व अर्थ—व्यवस्था केल्यावर विविध अनेक क्षुल्लक पण उपयोगी गोष्टी करणाऱ्या व्यावसा—यिकांची व्यवस्था व त्यांची स्थापना करण्यात आली. शेतकी, कारकुनी शिल्पोद्योग, गृहोद्योग, व्यापार, दागिने तयार करण्याचा उद्योग इत्यादि जनकल्याणकारी व्यवसाय श्री वृषभांनी अमलात आणले. उद्योगाना त्या त्या परीने कमी अधिक महत्व कालानुरूप व उत्तेजनेनुरूप येत गेले.

देशाच्या पूर्व, पश्चिम, दक्षिण, उत्तर भागात राज्यें स्थापून वयात येणाऱ्या मुलाना त्यांच्या कर्तृत्वास वाव मिळावा म्हणून तेथील राज्य त्याना सोपविली. विविध देशांतील नानाविध जमातीना संस्कारोन्मुख बनविण्याचें कार्यच त्यानी साधावे असा श्रीवृषभांचा त्यांना आदेश होता.

भरत नावाच्या वडील मुलास त्यांनी स्वतः जवळच ठेऊन घेतले होते. वडील मुलास सर्वकार्यात निपुण करून पिढ्यानुपिढ्या लोक-व्यवस्थेच कार्य निरंतर चालत रहावे हाच त्यात हेतु होता.

एके दिवशी बाहुबली या नावाच्या मुलास बोलावून त्यांनी म्हटले,

" हे कुलश्रेष्ठ पुत्रा, दक्षिण देशाच्या पोदनपुर नगरीत जाऊन तू राज्य स्थापन कर त्या राज्याने आर्यखंडाच्या पश्चिमद्वारी सर्वत्र शांतता निर्माण होईल असे कर. राजा म्हणजे प्रजेचा बंधु, हितकर्ता. प्रजेकडून करभार घेऊन ती प्रजेच्यच सुखसोईत खर्च होईल याची तू काळजी घे "

बाहुबलीला पिताजींचा वियोग सहन होणार नव्हता तो म्हणाला, " पिताजी, आपल्या सहवासाची गोडी मी राजा होऊन का मिळणार आहे ? तुमच्या सेवेपलीकडे मला काही नको. "

बाहुबलीचं पिताजींवरील प्रेम जसं निर्व्याज तसच पिताजींची आज्ञा त्याला शिरसावंद्य असे.

त्या उत्तराने पिताजींचं हृदय भरून आलं. सर्वच मुला-मुलींच प्रेम त्याच तीव्रतेने प्राप्त होणे पित्याला शक्य नसतं. परंतु श्री वृषभाची आंतरिक मोहिनीच अशी होती की कोणत्याहि मुलाला पिताजींचं कार्य स्वत चच वाटे. बाहुबलीने साश्रू नयनांनी वडीलांचा निरोप घेतला व तो दक्षिणेकडे निघाला केवळ ' आज्ञा ' म्हणूनच तो असे करण्यास तयार झाला होता. श्रीवृषभाच्या विविध गुणाचे मर्म बाहुबलीनी ओळखले होते. संसारातील विविध सुखाचा, ऐश्वर्याचा, वैभवाचा व प्रभुत्वाचा मनमुराद आनंद लुटताना देखील " इदं न मम ( हें माझें नाही ) " अशी श्रीवृष-भाची जागृत प्रज्ञा बाहुबलीने अवलोकली होती. त्याच गोष्टीचा फार मोठा परिणाम बाहुबलीवर झाला होता.

दक्षिण देशाकडे येऊन श्रीवृषभाच्या कल्पनेप्रमाणे केवळ प्रजेचा मार्ग-दर्शक म्हणून बाहुबलीने अतिबलाढ्य राज्य स्थापन केले. शेती, आरोग्य,

शिक्षण व संरक्षण या चतुर्विधी गोष्टीची स्थापना सुरुवातीला त्याने प्रत्येक शहरातून केली. वनावनातून पसरलेल्या वन्य जमातींना आदराने शहरातून वसविण्यात आले. अशी शेकडो लहान मोठी शहरें निर्माण करुन तेथील योग्य पुरुषांना मित्र बनवून त्यांच्याकडून राज्यसंचालनाचें कार्य त्यानें कर-वून घेतलें. चोराचा उपद्रव, रोगांचा प्रसार व दुर्भिक्ष या तीन राज्य नष्ट करणाऱ्या गोष्टींचा सुरवातीला त्याने योग्य बंदोबस्त केला. दक्षिणेत अत्यंत बलाढ्य अशी राज्यसंघटना निर्माण करण्यात बाहुबलीनें फार मोठें यश मिळविलें.

० ० ०

श्रीवृषभांच्या अयोध्या नगरीत औदासिन्य पसरले होतें. नगरीतील लोकांच्या चेहऱ्यावर पहिल्यादा दु:ख इतक्या तीव्रतेनें चित्रित झालें होतें. पताका उडत नव्हत्या. रस्ते सम्मार्जिले नव्हते. पक्षी देखील कुठें तरी लपून बसले होते. जणु उडण्याचे सामर्थ्यच त्यांच्यात राहिले नव्हते.

श्रीवृषभाचे वडील श्री नाभि मृत्युशय्येवर पडून होते. राजकुलातील सर्व मंडळी अधोवदन होऊन जवळच बसली होती. प्रमुख व्यापारी, क्षत्रिय सामंत, मांडलिक, राजे, महाराजे, सेनापति, मंत्री, उपमंत्री—सारे सारे हजर होते. एका गंभीर शांततेत जणु ते खोल खोल बुडून गेले होते.

एका सुवर्णाच्या पीठावर श्री नाभी पद्मासन घालून बसून होते. त्यांच्या चेहऱ्यावर मात्र मृत्यूवर विजय मिळविल्याची आभा पसरली होती. मृत्यूची वेळच त्याना जणु आगाऊ कळली होती. श्री नाभी आतापर्यंत डोळे बंद करुन बसले होते. हळूच त्यांनी डोळें उघडले. श्री नाभि म्हणाले,

' हे भाग्यवंतानो, तुम्ही धन्य आहात कारण श्री वृषभाच्या सहवासा

राहण्याची दीर्घ संधी तुम्हास मिळत आहे. या नश्वर देहाचा त्याग करताना मला असा त्रैलोक्यदीपक पुत्र प्राप्त झाल्याचा आनंद होतो. माझं कार्य संपलं. श्री वृषभांची थोरवी मी सांगावी असे नाही त्याच्यारूपाने भूतला-वर सत्यच जन्माला आले आहे. रत्नोदयाचें मंगल कंकणच बांधून तो जणु जन्माला आहे. त्याच्या जन्माने माझें कौतुक तुम्ही केलें. त्याचा सहवास सोडावा असं स्वप्नातहि वाटत नाही. केवळ या प्रेमरज्जूमुळेच माझं जीवन पुलकितझा आहे."

नाभी बोलत होते. जणु आज वाक्‌गंगाच त्याच्या मुखातून वाहात होती. सर्वांचा निरोप ते घेत होते मधुर व अति हळुवारपणे सर्वांची विचा-रपूस ते करीत होते. अनेकांचे डोळे ओलावत होते. पण श्री नाभी मृत्यूला जणु आमंत्रणच देऊन आले होते. त्याचेंहि स्वागत ते करणार होते. सुना-लेकींच्या नेत्रांतून अश्रुधारा वहात होता. प्रत्यक्ष श्री वृषभांच्याही चित्तवृत्ती हेलावून गेल्या होत्या. केवळ सुख आणि उपभोग याचाच त्याना अनुभव होता. मरणाला कवटाळणारा पिता त्याना लाभला होता. ते अतुलनीय धैर्य, शांति आणि निग्रह ! सारच अद्वितीय ! दु:खपूर्ण असूनहि अभिनंदनीय !

थोड्याच वेळात नाभींची जीवन ज्योति सर्वांना सोडून निघून गेली. त्यांच्या ओठांत शेवटी अडखळलेला शब्द होता– श्रीवृषभ !

सारं शहर शोक मग्न झालं होतं. इक्ष्वाकु कुलात हा पहिलाच मृत्यु ! अविचल धैर्यमेरु श्री वृषभही कांही काळ शोकमग्न झाले. देहाची नश्वरता त्याना ठाऊक नव्हती असे नाही. असारभूत संसारात चित्तवृत्ति हेलावून टाकतील असे प्रसंग येतात हेहि त्याना ज्ञात होतेच. परंतु प्रियव्यक्तींच्या वियोगाची लाट ही कसल्याहि महासात्विकाची, कसल्याहि महाप्रज्ञा-वानाची आत्मनिष्ठ चिरशांति भंग करून टाकते. हा वियोग म्हणजे मेरुमणिवर झालेला वज्रपात असतो. तूलराशीवर झालेला विद्युत्पात असतो. ज्यास पित्यानं तळहाताच्या फोडासारखा जपून जीवनप्रवाहाची देणगी दिलेली असते, व आत्मोत्कर्षाच्या महान आदर्शाच्या वाटेवर ज्याने आत्तापर्यंत सारथ्य केले असतें त्याचा वियोग

म्हणजे काय क्षुद्र गोष्ट असणार ? आपल्या पुत्राच्या ठिकाणी अनार्यांचें नायपण—नेतृत्व, सिद्धिप्रसादाचे प्रभुत्व, सुमेरुसारखी उत्तुंग कीर्ति ज्याने निर्माण केली त्या महान पित्याच्या पूर्ण—विश्रामाचा तो दिवस होता पित्याची छाया पुत्राला कल्पतरु सारखी वाटावी हाच जणु गृहस्थाश्रमाचा परमोच्च बिंदू होता.

० ० ०

विविध रंगांच्या पुष्पानी एकादें वन सुशोभित व्हावे, भ्रमर—पंक्तीच्या गुंजारवाने कमळाला महत्व प्राप्त व्हावें तसें श्री वृषभांचे जीवन होते. वृषभांकित वृषभध्वज मोठ्या डौलानें सर्व भारतांत फडकत होता. अनेक सद्विचार व सदाचाराचा पायंडा घालून त्या पुराणपुरुषाने मानवाला प्रतिष्ठा प्राप्त करून दिली होती. नदी-ज्याप्रमाणें आपण एकटीच सागराला मिळत नाही. स्वतःबरोबर असंख्य ओढयाना घेऊन जाऊन त्यानाहि नदीची संज्ञा प्राप्त करून देते, त्याप्रमाणे श्री वृषभजीवनाचा महानद असंख्य जीवने स्वतांत सामील करून घेऊन गतिमान झाला होता,

नाभिराजाचा वियोग सर्वांना जाणवत होता. त्यामुळें श्रीवृष-भांचें मूळचेच गंभीर दमलेलें जीवन अधिकच गंभीर बनलें मांत्रिक ज्याप्रमाणें आपल्या मन्त्रांनी सर्पांना वश करून घेतो त्या-प्रमाणे या मन्त्रविदानें मोहादिक .महासर्पांना वशीभूत करावयास सुरू-वात केली.

आज श्रीवृषभांनी अगदीच सकाळी उठून महालावरील गच्ची-वर ध्यानस्थ होते. इतक्यांत त्यांची सर्वांत प्रिय पत्नी, यशस्वती

तेथें आली. तिच्या हातात फुलांची माला होती. ती तिनें स्वत:च गुफून तयार केली होती. नुकतंच स्नान केल्यामुळे तिच्या चेहऱ्यावर दिव्य तेज पसरलेलं होतं अनेक वर्षे ती पतीच्या सहवासात होती प्रभूला काय हवं, काय नको हे तिला माहित होते. संसारातील सर्व प्रकारची सुखे तिला मिळाली होती.

फार वेळ ती हातात पुष्पहार घेऊन उभी होती फुलांचा सुगंध दरवळत होता.

श्री वृषभानी आपले नेत्र उघडले समोर यशस्वती उभी होती. तिने गळ्यात घातलेल्या हाराचा त्यानी स्वीकार केला. त्याच्या चेहऱ्यावर स्मित झळाळलं भगवताचं स्मित अद्वितीय होतं. स्वभाव–मधुर ते स्मित पाहाण्याची संधि यशस्विना कधीच दवडत नव्हती.

" हे स्मित असंच पहात रहावं असं वाटत माझ्या हारानं तुमचं शरीर अधिकच विलोभनीय दिसते असं मला वाटत होतं. पण छे, तुमच्यामुळंच माझ्या या पुष्पहाराला शोभा आली आहे. फुलाचा ताजेपणा तुमच्या प्रसन्नमुद्रेने फिका वाटू लागतो. "

" पुरे, यशस्वती, तुझी ही स्तुति आजची नाही. अशा स्तुती- मागे स्त्रियांची कामना दडलेली असते स्पष्टच मागावं मा । न काय हवंय तें ? "

यशस्वती प्रभुजवळील आसनावर बसून होती पतीच्या स्पर्श तें नव्हाळी इतक्या वर्षानंतर तशीच कायम होती सुगंधहास्यात तिच्या चेहऱ्यावरील दीप्ति उजळून निघाली. श्री प्रभूच्या चेहऱ्यावरील परागमृदु वात्सल्याने तिला बोलायला धीर आला. ती म्हणाली,

" सर्व भारतवर्षात आपली मुलं राज्य करीत आहेत. तेथें प्रत्यक्ष जाऊन त्यांच्या कार्याची पाहाणी करावी, त्याना भेटावं असं वाटत आहे. शिवाय श्री नाभीच्या निघून जाण्यानं हे घर अगदीं शून्य वाटत आहे आपलेहि चित्त मुलांचा कारभार पाहून अधिक प्रसन्न होईल. "

— या प्रवासकल्पनेचें श्री प्रभूनी स्वागत केले. एका शुभ मुहूर्तावर परिवारासह श्री वृषभांनी विजयार्ध पर्वतावरील हजारो विद्याधरांच्या नगराना भेटी दिल्या. सर्वांनी प्रभूचें स्वागत केले. मोठमोठे रंगी-बेरंगी वाडे, पोहण्यास योग्य अशा विस्तृत विहिरी, दोन्ही कडेला विविध वृक्षलतानी सुशोभित रस्ते पाहून यशस्वतीसह सर्व परिवार आनंदित झाला. श्री वृषभ प्रवासांत निरनिराळ्या पशु-पक्षाची माहिती सांगत, त्यांच्या हालचालींतील अभिप्राय व्यक्त करीत. गंगा व सिंधु नदीतीरावरील शेंकडों शहरांतून पसरलेल्या विविध प्रकारच्या मानव जमातीच्या आदराचा स्वीकार करीत, त्याच्याकडून मिळालेल्या देणगीत आणखी भर घालून प्रभू ती देणगी त्यांना अर्पण करीत रात्रीं विविध नृत्योत्सवांत प्रभचा सर्वपरिवार उत्साहाने भाग घेई. श्री वृषभानी दिलेल्या उपहाराचा नर्तक व नर्तिका फारच विनयाने स्वीकार करीत. अद्यापि ज्या ठिकाणी मनुष्यांना उपजीविकेची तरतूद करतांना अडचण पडत असे त्याठिकाणी स्वतःच्या मुलांकरवी वेग-वेगळे उद्योग कसे करावेत याचे प्रात्यक्षिक केले जाई. कर्मभूमीच्या महान रचनेंत ते एकरूप झाले होते. जगाचे बोट धरून त्यास एक एक पायरी चढावयास शिकविताना तो जगद्गुरू मागेच कंटाळत नसे. प्रत्यक्ष प्रकाशमान कर्मनिष्ठ जीवन कसे जगावे हेंच तो जगाला दाखवित होता.

या प्रवासात जीवनोपयोगी विविध व्यवसाय व त्यांची साधने यांची निर्मिति झाल्याने कल्याणकारी यात्रेचे दिव्य व रुचिर स्वरूप सर्वांच्या दृष्टोत्पत्तीस आले. शरीररक्षण हा जीवनांतील महत्वाचा भाग असला तरी त्यातून हिंसक प्रवृत्ती वाढू नये, पिळवणूक होऊ नये. संग्रह करू नये, चौर्यकर्मास उत्तेजन मिळू नये, या गोष्टीकडे श्री वृषभांनी कटाक्षाने भर दिला. जीवनाचा संपूर्ण आधार अहिंस-

वरील अप्रतिहत निष्ठा ! त्यानिष्ठेचा उद्घोषच केवळ उपयोगी नसून विविध क्रिया-कार्याचें अधिष्ठाण म्हणून अहिंसाधर्माचा स्वीकार करण्यांत आला.

या साऱ्या देशपर्यटनाने श्री वृषभाची कीर्ति चोहीकडे पसरली. अनेक ठिकाणीं तर उत्साही लोकानी 'ब्रम्हा' म्हणून त्याची पूजा केली. चारहि दिशेकडे आपल्या कल्याणमय दृष्टीनें बघणारा म्हणून चतुर्दिक मूर्ति निर्माण करण्यात आली सुखशातीचा निर्माता म्हणून श्री शंकर या नावाने त्याची कीर्ति अमर झाली. सर्व प्रकारच्या विद्यांचा जनक म्हणून विश्वविद्यामहेश्वर म्हणूनहि त्याचा लौकिक सर्वत्र झाला.

हिंडत हिंडत जेव्हा ते पोदनपुरास आले तेव्हा त्याच्या पुत्राने त्यांचा अपूर्व सम्मान केला. श्री प्रभूचे आगमन कळताच चतुरंग सैन्य घेऊन, स्वत: अनवाणी सामोरे जाऊन त्याचे पादप्रक्षालन केले. श्री वृषभानें त्यास छातीशी धरले. पुत्रप्रेमाने त्याचा उमाळा कंठी दाटला. मोठ्या प्रेमानें त्याच्या कपाळाचें चुंबन त्यानी घेतले.

पोदनपुरी नवयुवतीप्रमाणे सजली होती. श्री बाहुबलीने सर्वच कुटुंबियाना अत्यंत आदरानें व प्रेमाने वागविले. श्री वृषभाने जेव्हा राजसभेंत प्रवेश केला तेव्हा त्याना आढळून आल की– बाहुबलीने पिताजीच्या रत्नखचित पादुका राजसिंहासनावर ठेवलेल्या होत्या त्याकडे पाहूनच श्री वृषभांनी विचारले—

" हे प्रियपुत्रा या रत्नखचित पादुका कुणाच्या ? "

" पिताजी, हें राज्य तुमचेंच नव्हे का ? तुमच्या आशिर्वादाने सर्व प्रजेचं क्षेम करणारं राज्य मी तुमच्याच पादुकाची स्थापना करून चालविलं आहे. "

श्री वृषभांना गहिवरून आलें. पुत्राची ममता असावी तर अशी ! पण असलें भाग्य नशीबी असणें किती पित्याच्या लेखी असते ?

बाहुबलीच्या वर्तनानें पित्याला फारच संतोष झाला. सर्व संसार अशारीतीनें वेगवेगळ्या तऱ्हेने फळत–फुलत असलेले पाहून त्याच्या आनन्दाला पारावार राहिला नाही.

श्री वृषभ जेव्हां यात्रेवरून परत आले तेव्हां त्याच्या चित्त–वृत्ति पूर्वी सारख्याच प्रफुल्लित, प्रमुदित व प्रसन्न होत्या. प्रभूंनी स्वतःच्या डोळ्यानी सर्व जनाचे क्षेम पाहिलें होतें. समृद्धि पाहिली होती. निर्विघ्नपणें उपभोगिलेले जीवनच खरें जीवन होय. तेथे भीति नव्हती, विघ्ने नव्हती. अटथळा नव्हता, संरक्षणाची चिंता करण्याचें कारण नव्हतें. ते पाहून प्रभू यशस्वतीला म्हणाले, " जिथ सर्व प्रजा जनाचें क्षेम आहे, बलिष्ठ लोक दुर्बलाची सेवा करीत आहेत, राजा धार्मिक आहे, मेघाचा योग्यवेळी वर्षाव होतो, रोगराई नाही. धानाची कोणी याचना करीत नाही तें राज्य चिरकाल टिकतें. "

० ० ०

## विवर्ताच्या बाहेर

सुखाच्या दिवसांना पंख असतात असें म्हणतात तें खोटें नाही. सुख आणि दुःख हे मानवी जीवनाचे दोन आवर्त. एकांत जीवनाचा विसर पडतो तर दुसऱ्यांत जीवनाचा प्रत्यय येतो. श्री वृषभाच्या तारूण्यांतील अनेक वर्षे कशी गेली हें कळाले नाही. यौवनातून प्रौढ यौवनात त्यांनी प्रवेश केला. सुखाची सामुग्री उपलब्ध आहे तोंवर सुखाची मजा.

पौणिमेची रात्र होती. सर्वत्र शांतता पसरली होती. चंद्राचं शीतल, उन्मादक चांदणें घरादारांवर सुखाचा वर्षाव करीत होते आपल्या स्पर्शानें त्या चांदण्यान सर्व पृथ्वी चंदेरी करून सोडली होती. निसर्गाचा हिरवा रंग त्यानं चंदेरी केला होता. झाडावरील कागपक्षिणीला स्वत:चा काळा रंगही चंदेरी वाटून ती आनंदित झाली होती.

श्री वृषभाच्या राजमहालांसही तें शारदीय चांदणें बंधनहीन झालेल्या धरणाच्या पाण्याप्रमाणे सर्व पसरलें होते श्री वृषभांच्या गळयांतील कौस्तु-

भाचीं किरणें आणि चंद्राचीं किरणे यांत कांही तरी गुपितें चाललेली होती

यशस्वती जागी होती. उन्मत्त करणारा केवडयाचा वास त्या शयन-कक्षांत मावत नव्हता. तिच्या हालचालीने पायातील नूपुराचा आवाज झाला. तिला भीति वाटली. जणु त्या आवाजाने प्रभूच्या निद्रेत कांही व्यत्यय येईल असे तिला वाटत होते.

इतक्यात श्रीप्रभूनी विचारलें, " का, झोप आली नाही कां ? "

या प्रश्नाला तिच्या जवळ उत्तर नव्हते तेव्हा उत्तर देण्याचे टाळून तिने अत्यंत लाडिकपणे विचारलें- " आज चांदणे जरा जास्तच मादक वाटते, नाही ? "

श्रीप्रभू शय्या सोडून उजवीकडील दाराने गच्चीवर आले. रत्नजडित गच्चीवर रंगबेरंगी प्रकाशाची क्रीडा चालू होती कोणत्या मण्याचा कोणता प्रकाश आहे हे ओळखणे कठीण झालें होते

मागोमाग यशस्वती ही आली तिला पाहून श्रीवृषभानीं प्रश्न केला-

" किती वर्षे झाली असतील आपल्या लग्नाला ?"

" फारच थोडीं वर्षे "

" नाही. हे खरं वाटत नाही भोगाचं असच असत. आपणास वाटतें की आपण भोगाना भोगतो पण खऱ्या अर्थाने भोगानेच आपण जीर्ण होतो. तेच आपल्या ग्रास करतात. म्हणके, जीवनातील असंख्य वर्षे याच प्रकारें व्यतीत होतात शरीरे भिन्न, पण भोग्यपदार्थांचे आकार, रंग, रूप, वजन तेवढेच काय कमी जास्त झालेले असतात ! "

" पण उपभोगाच सामर्थ्य नित्य-नूतन असते, " यशस्वतीनं म्हटलं

' तेंही खर नाही. अनेक जन्माच्या संस्कारानी भोगाकडे प्रवृत्ती होते. भोग सामर्थ्य अग्नीसारखें असते. अग्नि क्षीण असला तरी जाळण्याचे सामर्थ्य कमी होत नसते. "

" तुमच्या तर्कापुढे, " यशस्वती म्हणाली, " माझी श्रेष्ठता ती काय? परंतु यौवनानं मुसमुसलेला तुमचा देह, त्याच्यावर पसरलेलं दिव्य तेज, तुमच्या मधुर वचनांचा वर्षाव आणि हें स्वर्गीय चांदणे ! हें सारे फुकटचे म्हणजे ... "

तिच अपूर्ण वाक्य पूर्ण करीत सदातृप्त असलेले श्री वृषभ म्हणाले—

" म्हणजे संयमहीनांचा तोल सुटतो हेच ना ! प्रिये, संयम म्हणजे निवृत्ति नव्हे. संयम म्हणजे तृप्ति — तुष्टि ! "

श्री वृषभाची वाणी कल्याणवर्णांनी युक्त असे. कुणाच्या हृदयाला दुखवेल असा वर्णांचा संयोग त्याच्या शब्दात नसायचा दुसऱ्याच्या कल्याणाची भावना ही अंगभूत असावी लागते त्याशिवाय ती वर्णातून व ध्वनीतून कशी प्रगट होणार ?

० ० ०

दिवस—रात्रीचे रहाट फिरत होतें. सूर्याचें आगमन व निर्गमनहि चालू होते. त्याच्यात होणाऱ्या परिवर्तनाने पृथ्वीवरील वस्तूंच परिवर्तन होत असल्याचा भास होत होता

राजदरबार नित्याप्रमाणें भरलेला होता. सामंत, मांडलिक, राजदूत, थोर व वृद्ध सत्पुरुष, निमंत्रित, गावातील प्रतिष्ठित आपआपल्या जागी बसले होते. गेली अनेक वर्षे ती जागा त्यांनी भूषविली होती. जीवनक्रम अगदी ठरून जाण्यात काहींना सौख्य वाटत असत जीवनात अस्थिरता आहे हें मानूनहि त्यांना पटण्यासारखं नव्हतं इतकं त्याचं जीवन एका विशिष्ट आवर्त विवर्तात गुंतलं होतं. गुंतागुंतीच्या जीवनक्रमाची जणु माणसाला सवय होऊन जाते. इंद्रियें तदनुकूल होऊन जातात मनाची ठेवण ही तशीच बनते. त्याच्या विरुद्ध काहीं घडल्यास जणु गतानुगतिक मन बंड करून उठतें.

बंदीजनांच्या स्तुतीने राजाधिराज श्रीमत् वृषभांची निद्रा केव्हाच भंगली होती. स्नानादिकांनी शुचिर्भूत झालेली, अलंकारांनी अत्यंत प्रभाव—शाली वाटणारी श्रीप्रभूंची मूर्ति सभेंत आली. साऱ्यांनी उठून प्रभूंना उत्था—

पन दिलें. प्रभूनी हंसत हंसत त्या सर्वांच्या आदराचा स्वीकार केला. राजसभेतील छत्र, चामर धारकांनी श्रीप्रभूच्या नावाचा जयजयकार केला. पीतवस्त्रालकृत प्रभूची मनोहर आकृति नुकत्याच उगवलेल्या बालसूर्या- सारखी वाटत होती.

काही राजगायकाचे संगीतस्वर सर्वत्र घुमू लागले. त्या सुस्वर- लयींच्या आवर्तात सभाची गुंगी होती. यशस्वती महाराणी श्रीवृषभांच्या जवळच गंभीरपणे बसली होती. जीवनसाथी म्हणून त्रैलोक्यदीपक महापुरुष तिला पति म्हणून मिळाला होता. स्त्री–जीवनाला याहून काय अधिक हवं असतं ? पराक्रम आणि पौरुष यांचा केवळ मुकुटमणि म्हणजे श्रीवृषभ ! उपभोगात सामान्य जनाची शारीरिक हानी होते, गात्रें शिथिल होतात परंतु उत्कृष्ट आकार व वर्धिष्णु पौरुष यामुळें श्रीवृषभांचें जीवन म्हणजे नित्य–नूतन विकसित होणारे कमळच !

श्रीवृषभाचे संपूर्ण लक्ष त्या गायकाच्या आवाजाकडे होतें. त्याचे पहिले कडवे संपले होतें. दुसरे कडवे सुरू झाले होते. त्यातील भावार्थ होता —

" हे पांखरा, सर्व चराचर सृष्टीस गवसणी घालण्याची तुझी अमर्याद शक्ति ! पण तू इथें या सोनेरी पिंजऱ्यांत कां अडकला आहेस ? "

ते कडवे पूर्ण होऊन गाणें थांबलें. श्रीवृषभानी त्यास अलंकार देऊन संतुष्ट केले. इतक्यात इंद्र तेथें आला.

त्याच्या वैभवाची शोभा काय वर्णावी ? आज त्याच्या हृदयातील विचार चेहऱ्यावर प्रगट होत होते. त्याने श्री प्रभूना वंदन करून म्हटले–

" देवाधिदेव पुरुश्रेष्ठा, आजचा दिवस महन्मंगल आहे. आपल्या मनांत दिव्यविचाराचे तरंग सकाळपासून उठत आहेत. स्वभावत:च वैराग्य- प्रवण असलेलें आपले मन संसार–शरीर–भोग–निर्विण्ण होऊं पहात आहे. आज श्री मुद्दाम एका स्वर्गीय नर्तिकेचें नृत्य आपण अवलोकावें अशी विनंती करण्यासाठी मी आलो आहे. "

इतक्यात एक नीलांजना नांवाची नर्तिका राजदरबारांत प्रविष्ट झाली

तिच्या गौरवर्णाच्या कांतीने दरबार एकाएकी धवलित झाला. साऱ्यांचें लक्ष तिनें वेधून घेतलें. तरुण धुक्याने वेढलेल्या उषेसारखी, चांदण्याचें रेशमी वस्त्र पांघरलेली रजनीच ! डोळे नुसते चमचमणाऱ्या विजा ! प्रत्यक्ष यशस्वतीलाही हेवा वाटावा असे यौवन.

श्री प्रभूची नम्मती मिळताच नीलांजनेची गात्रे हलू लागली. डोळ्याचीं दोन ज्योती या नृत्यमंदिरावेला धरायला जणु सारख्या शस्त होती तिच्या कटाक्षाने असयंमी बेचैन व्हावेत, तिच्या नुपुरखांनी हृदयात थैमान घालावे, तिच्या हावभावाने आतुरतेचे बांध फुटावेत, असे ते नृत्य होते. सौन्दर्याची एक प्रखर ज्योतच जणू लवलव करीत त्या सभेत विहरत होती

मृदुग, भेरी, तबला, आणि वीणा या वाद्यांच्या विविध तालध्वनीवर आपल्या अवयवांच्या हालचालीचे सूक्ष्म प्रदर्शन ती करीत होती. गोऱ्या गोऱ्या हातांनी ती वेगवेगळे हृदयभाव प्रगट करीत होती. इतक्यात दीर्घकालपर्यंत जळणारी ज्योत जळून भस्म व्हावी त्याप्रमाणें ती अन्तर्धान पावली.

देवनर्तकी नीलांजनेच आयुष्य संपले ती मृत झाली. हे इंद्राच्या लक्षात आल्याबरोबर त्याने दुसऱ्या एका नर्तिकेची तत्काळ नियुक्ति केली. रसभंग होऊ नये हा इंद्राचा हेतु इतर सभासदांपुरता तडीस गेला खरा. परंतु श्री वृषभांच्या नजरेंतून ते सुटणें शक्य नव्हतें. सर्व सभा जणू काहीच घडले नाही या प्रकारें पुनः नर्तन पाहाण्यात गर्क झाले होते. पण श्रीवृषभांच्या मनात एक लाट उत्पन्न झाली हा संसार एक विवर्त आहे. मृत्यूच्याधाने जणू आपले क्रीडाक्षेत्र म्हणून त्याची निवड केली आहे. आपण सारे त्याच्या अपेक्षेने अ यन्त तुच्छ वरतु केव्हाहि त्यानें सुखदु खाचे बाण सोडून आम्हांस विवश करावें. कधीहि, समल्याहि हिताहिताचा विचार न करता स्वमर्जीने जीवन यात्रेला पूर्ण विराम द्यावा ! ही भावना तीव्रतेने एखाद्या वावटळीसारखी अचानक निर्माण झाली. श्री वृषभांच्या मनावरील विकार-संमोह, मालिन्य दूर व्हायला एवढी क्षुद्र फुंकर

पुरेशी होती. सुखदु:खांच्या केवळ पुनरावृत्तीशिवाय जीवनाला अर्थ तरी काय होता ?

नृत्य विलयाला गेलें. श्री वृषभ जणुं पूर्ण जागृत होऊन इंद्रास म्हणाले– " तुमच्या या अचानक आगमनानें तुम्ही माझ्या या जीवन–नाटकाच्या दुसऱ्या अंकास सुरवात केली आहे. नीलाजनेचें जीवन-चांचल्य आम्ही पाहिलें. असलें जीवन चांचल्य पाहूनहि भौतिकतेंत आम्ही रमून गेलों, असेंच तुम्हास सूचित करावयाचे होतें ना ! "

इंद्र हात जोडून प्रभू समोर उभा होता. तो म्हणाला, " तुम्ही लोकोत्तर आहात, लोकचक्षु आहात. अपार प्रज्ञेचे स्वामी आहात. मी पामर आपणास काय बोध करणार ? आपणांकडून लोक-प्रकाशक असें तत्वज्ञान जगाला मिळावें असा विधिसंकेतच आहे. त्रिलोकशिरोमणि होऊन, सत्यशासनाचें अंतरंग आपणांकडून उजेडांत आणलें जाणार आहे, हें मी ओळखतो. त्या गोष्टीस आता उशीर होणार नाही असे आजच्या प्रसंगावरून सूचित होतें. "

त्या नन्तर श्री वृषभांनी सर्व सभासदास विदित केलें, ' हे लोकाध्यक्षांनों, तुम्ही शिष्टजन आहांत, सुधी आहांत. आजच्या प्रसंगी हें राज्य श्रीभरताला देऊन मी सर्वकामभोगांतून निवृत्त व्हावें हा विधिलेख आहे. श्री भरताचें शासन प्रजाक्लेशाकुशकारी व्हावें, सर्वोदयकारी व्हावें, क्षेमकृत् व्हावें अशी माझी मनीषा आहे. राजाला सहस्त्र पाय व हात असतात या आर्षोक्तीचें स्मरण मी करून द्यावें असें नाही. तुम्ही त्याच्या राज्याचे डोळे आहांत. त्याच्या यशात तुमचें यश व अपयशात अखिल मानव जातीचे अपयश तुम्ही समजा. "

आजच्या प्रसंगी असा काहीं चमत्कार घडेल असें यशस्वितेला वाटलें नव्हतें. काय होत आहे, होणार आहे याची कल्पनाही महाराणीला नव्हती. श्री वृषभांचा निर्णय आज–नाही उद्यां असा होईल याची किंचित कल्पना असली तरी तो दिवस आजच भविष्या-वारखा उगवेल हें कसे कळणार ?

श्री भरतालाहि अचानक धक्का बसला पित्याकडे पाहाण्याची त्याची दृष्टि वेगळी होती जीवनाचा आधारमेरु म्हणून त्याच्या गुणसहितेचा तो परमभक्त होता. पिताजीचा मानसपिंड अत्यन्त प्रखर अणुरेणूचा बनला असून कसल्याहि फेरविचाराचा विकल्प त्यांच्या दृढसंकल्पापुढें चालत नसे तरीहि त्यानें सभा सपल्यावर प्रभूंची गाठ घेतली. त्याचा कंठ दाटून आला होता. काय बोलावे, कसें बोलावे, हेच त्याला सुचत नव्हते

' भरता, ' श्री प्रभू म्हणाले, " ससार दु:खमय आहे असे माहित असूनहि या मोहामुळेच तो हवासा वाटतो. तुझ्यासारख्या दिव्यरत्नाची देणगी पाहली की ससार दु:खमय असूनहि तो हवासा आहे, श्रेय नसला तरी प्रेय आहे असे वाटू लागते "

भरताला काही ऐकू येत नव्हते त्याच्या अश्रूंनी श्री प्रभूंची माडी ओली होत होती. क्षात्रधर्मप्रतिपालक भरताच्या डोळ्यात कमालीचें कारुण्य विलसत होतें तो रडत रडत सागू लागला–

" पिताजी, वियोगाच्या दु:खात लोटायाचे होतें तर अमर्याद सुखाचा वर्षाव का केला ? माझ्या जीवनाची चेतना बनून मला व्यापून का राहिलात ? माझ्या अणुरेणूत व्यापून बसून आज व—"

त्याला बोलवत नव्हते. आवेगाला आमरायला जणु शब्द प्रतिकार करीत होते.

त्यावर श्री वृषभांनी म्हटलें–

" भरता, क्षात्रकुलाची ही रीत आहे. मुलें मोठी झाली की पित्यानें सर्ववस्तुजाताचा त्याग करुन वनाचा आश्रय घ्यावा. माझ्या इच्छेचें तू नेहमीच आदरानें स्वागत केलें आहेस. "

भरताला काही सुचत नव्हते उमजत नव्हतें. कसलें तरी परिवर्तन तीव्र गतीनें घडत आहे, याची अधुकशी कल्पना त्याला झाली परंतु पिताजींच्या वनगमनानतर त्या अयोध्येत स्वत: एकाकी

केवळकर्तव्य म्हणुन त्या दोघीजणी दोन्ही कामांत लक्ष घालीत होत्या. ज्या पालखीत बसून श्रीप्रभू वनात जाणार होते. ती पालखी तयार करण्यांत, सजविण्यात दोघींचा सहयोग होता.

श्री वृषभाचा चेहरा आंतरिक आनन्दानें अधिकच उजळला होता. पितृकर्तव्याच्या कोणत्याहि बाबतीत अपूर्णता राहू नये यासाठी ते जातीनें सर्व व्यवस्था पाहात होते. राज्याभिषेकाचा मोहळा निर्विघ्नपणें पार पडावा. आलेल्या सर्वांचा यथायोग्य सन्मान व्हावा, कुणीहि कसल्याहि प्रकारचा विकल्प निर्माण करूं नये याकरितां त्यांची उपस्थिती सर्वत्र असे. श्री भरतासाठीं मुद्दाम तयार केलेले कपडे, अलंकार, आभूषणे यांची श्री प्रभूनें व यशस्वितेने पाहणी केली. रत्न, हिरे, माणकें, यांनी मढविलेले सुवर्णसिंहासन पाहून सर्वांनाच प्रसन्नता वाटली. त्या सिंहासनाचा नमूना इंद्राच्या शिल्पकारानें मुद्दाम तयार करून दिला होता. उत्सवाचा मुहुर्त स्वत. युगादिकृत् श्री वृषभांनीच काढला होता.

चैत्रमासांतील कृष्णपक्षांत अष्टमीच्या दिवशी भरताला महाराजपद देण्यात आले. प्रत्यक्ष श्री वृषभांनी त्याच्या डोक्यावर मुकुट ठेवला. जणु पित्याने सर्व जबाबदारी त्याच्या डोक्यावरच ठेविली. मंगलवाद्यें व जयजयकाराच्या निनादानें आकाश व्यापून राहिलें

दिवस कोणता व रात्र कोणती असा भास निर्माण व्हावा अशी रचना इंद्राने निर्माण केली होती. असंख्य दीपशिखांच्या प्रकाशात अयोध्या नगरी एकाद्या स्वर्गीय स्वप्नासारखी वाटत होती. आमोद-प्रमोद, भोजन, नृत्य, व नाटकें, यानीं उत्साहाचें वातावरण निर्माण झालें होतें. खाण्यापिण्याची केन्द्रें सर्वांसाठीं खुली होती. जणुं सर्व अयोध्या नगरी श्री प्रभूंचा वियोग विसरण्यासाठी धडपड करीत होती. श्री बाहुबली व श्री भरत यांची शहरांतून मिरवणूक काढली. चन्द्र-सूर्यासारखे ते राजकुमार नगरीचे धन्यवाद घेत होते. पुष्पांच्या वर्षावानें सारे रस्ते चित्रविचित्र रंगाचे झाले होते. गुलालाच्या वर्षावाने नवोदित सूर्याची लालिमाच जणुं सर्वत्र पसरली होती.

गावभर मिरवणूक फिरून आल्यावर ते दोघे ज्येष्ठ वडीलांना व आईला भेटायला गेले. दोघाना श्री वृषभांनी छातीशी लावले. हृदय ममतेनें भरून आले. लहानपणीं त्या दोघांवर प्रभूची फार प्रीति. दोघांना समज ही फार!

प्रभु म्हणाले, " बाहुबली, तुझ्याकडे पाहिले की तूं भरत आहेस असें वाटतें. आणि भरताकडे पाहिले तर तो बाहुबली आहे असें वाटतें. तुमच्या दोघांच्या ताब्यात ही पृथ्वी आहे. नवीन आदर्श निर्माण करण्याची जबाबदारी तुमची आहे. माझ्या गैरहजेरीत तुमच्या गुणाचा विकास थांबता उपयोगी नाही. या सर्व जीवनकार्याच्या मागे तुम्ही तुमच्या आत्म-चेतनेची प्रतारणा करूं नये. जें जें दिव्य असेल मग तें दाहक असले, त्याची कांस धरा. जनाभिमुख होणें म्हणजे आत्म-विन्मुख होणे नव्हे "

दोघानी त्याना त्रिवार वंदन केले. नन्तर त्यांनी मातेश्वरी यशस्वती व सुनन्दा याना प्रणाम केला. मलाचें रूपगुणसौष्ठव पाहून आईंना भरतें आले. जीवनातील हाच परम भाग्याचा क्षण त्याना वाटावा यात नवल तें कसलें!

• • •

दुसरें दिवशी श्री वृषभांनी सर्वांना बोलाविलें. नानाप्रकारच्या वस्त्राभूषणानी संतुष्ट केलें सर्व नातलग या प्रसंगानें एकत्र झाले होते. त्या सर्व समूहात श्रीवृषभ एकाद्या राजहंसाप्रमाणे शोभत होते. सर्व थोर नातलगानां उद्देशून ते म्हणाले—

" माझ्या घर सोडून जाण्याने तुमच्याबद्दची आस्था व प्रेम मुळीच कमी होणार नाही. तुम्ही दिलेल्या सहकार्याने व प्रेमानेच मी या साधनेसाठी तयार झालो आहे. श्री भरताने माझी सर्व जबाबदारी स्वीकारली आहे सर्व आप्तेष्टाचें मंगल व्हावें, त्याची चिंता त्यान वहावी अशी माझी इच्छा आहे "

सायंकाळी चार वाजण्याच्या सुमारास रत्नखचित पालखीत श्री वृषभ बसले. सर्वांना यथायोग्य प्रेम प्रदर्शित करून ते शांत झाले आतापर्यंत आवरलेला यशस्वतीचा शोक जणु बाहेर पडण्याच्या बेतांत होता. पण प्रभूची अनाकूल, शांत मुद्रा पाहून तिला धैर्य मिळे प्रभू सोडून जातील आणि पतिविरहाचें अपार दुःख सहन करावे लागेल अशी स्वप्नातहि तिला वाटले नव्हते. प्रभूच्या जीवनांतील विविध आठवणी तिच्या नेत्री उभ्या राहिल्या. प्रभूंशी विवाह घडला तेव्हां पासूनचे सुखदुःखाचे प्रसंग ती आठवू लागली भरत पोटांत होता तेव्हाची एक गोष्ट तिला तीव्रतेने जाणवली गर्भवेदनेने तिला झोप येत नव्हती. श्री .वृषभांनी रात्रभर वेगवेगळ्या गोष्टी सागून ती रात्र सुसह्य केली. भरताला अनेक विद्या शिकविताना जणु त्याला पहिला सम्राट तयार करावयाचा होता. पुराणपुरुषाने भरताला घडविले होते त्याच्या हालचालीत, बोलण्याच्या लकबेंत श्री वृषभांची झाक होती त्या भरताच्या हट्टाची गोष्ट तिला आठवली कसली तरी गोष्ट सांगत असता हत्तीचे नाव आले तो एकच शब्द घेऊन आत्ताच हत्ती पाहिजे म्हणून त्याने हट्ट घेतला. अयोध्येंत हत्ती कसा व कोठें सापडणार ? 'हत्ती—हत्ती' म्हणून भरतान सारं घर डोक्यावर घेतल. तेव्हा प्रभूने इंद्राला पाचारण करून त्याचा हट्ट पूर्ण केला. मुलाच्या हट्टाने पित्याच्या हृदयाची होणारी कालवाकालव तिने पाहिली होती. पण तेच "प्रभू आज सर्वांना सोडून जात होते" असल्याहि हट्ट घेण्याचे आज जणु कुणाला भान नव्हते. भरतानं लहान होऊन हट्ट घ्यावा व प्रभूंचे वनगमन थांबावे असा बालिश

विचारही क्षणभर माता यशस्वतीच्या मनांत चमकून गेला.

श्रीवृषभाचा जयजयकार करून पालखी उचलण्यांत आली. पुढें भरत आणि बाहुबली, मागे गावातील दोन सुप्रतिष्ठित लोक. पिताजींच्या वनगमनाचें दृश्यही सुंदर होतें. हजारो नागरिक पालखीच्या मागोमाग येत होते. पुष्पवर्षावानें रस्तोरस्तीं बाग फुललेली दिसत होती. पण फुलांत नेहमीचा प्रफुल्लितपणा नव्हता. वियोगाची दुःखी छटा त्यांच्यावरहि पसरली होती.

गांवाबाहेर सिद्धार्थक नावाचं घनदाट अरण्य होतं. त्या अरण्यांतील अर्धाभाग मानवाच्या नित्याच्या येण्याजाण्यानें सुपरिचित होता. पण अर्धाभाग अपरिचित होता. विविध वन्यपशूंनीं त्या भागांत आपलें निवासस्थान केले होते. तेथील श्वापदाना " शिकारी " हा शब्द माहित नव्हता. कसल्याही भीती पासून ते अलिप्त होते. त्या वनातील अशोकवृक्षाखाली एक आसन तयार करण्यात आलें होतें. आसन साधें होतें—मातीचें. त्या उच्च आसनावर एक भला मोठा चौरस दगड होता. वनवासी फुलाना प्रभूच्या दर्शनाचा लाभ झाला होता पर्णाचेंच छत्र व त्याचेच चामर. चवऱ्या ढाळण्याचें कार्यहि पवनराजानें वृक्षाना सोपविलें होते. आपल्या सहस्त्रावधि पल्लवांनी जणु ते प्रभूला आमन्त्रित करीत होते.

यशस्वती व सुनंदा दीप-धूप-अगरु घेऊन आल्या होत्या. फुलांची ताटे भरून त्यांनी आणली होती. पतिराज म्हणून त्या. शेवटची पूजा श्री वृषभांच्या चरणी अर्पण करणार होत्या.

सूर्यास्ताला दोन घटका अवधि होता. श्री वृषभांची पालखी वनाजवळ आली. श्रीभरतानी हाताचा आधार देवून पिताजीना उतरवून घेतले. श्रीवृषभ एखाद्या प्रशांत सरोवरासारखें दिसत होते द्वंद्व संपलें होतें.

श्री प्रभूंनी पुनः सर्वांच्या गाठीभेटी घेतल्या.- भरताला धीर दिला बाहुबलीच्या पाठीवर हात फिरवीत ते यशस्विनेकडे गेले. यशस्व-

तीच्या नेत्रांत अपूर्व प्रभा फाकली होती. यौवनाचा त्याग तिने केला होता. ती अनलंकृत होती. शुभ्रवस्त्रांकित यशस्विता प्रभूंच्या धवल यशासारखी दिसत होती. प्रभू तिला म्हणाले, 'तू वीरपत्नी आहेस. वीरमाता आहेस. श्री भरताकडे लक्ष ठेव. इक्ष्वाकु कुलाची प्रथम जननी म्हणून सारं जग तू घालून दिलेल्या मार्गाने जाईल.'

त्यानंतर श्रीप्रभू झाडाखालील शिलाखडावर जाऊन बसले त्यानी सर्व अलकाराचा, सर्व वस्त्राचा त्याग केला डोक्यावरील कुरळ्या केसाना स्पर्श करून तेहि त्यानी आपल्या हातानीच काढून दूर केलें. एखादा विशाल वटवृक्ष फुला-पानानी विरहित व्हावा तसे श्री प्रभू दिसू लागले. त्यांनी ॐ या शब्दाचा तीनदा उच्चार केला. आणि त्यानी शिलेवर उभे राहून डोळे बद करून घेतले.

इंद्रपत्नीने व अनेक देवीनी प्रसंगोचित गीतें म्हटली. पुष्पें उधळली गेलीं. यशस्वितेनें श्री वृषभांची साश्रू लोचनानी दीप-गध-अगरु यांनी पूजा केली. असंख्य दीपानी तें वन उजळून गेले. धूपाच्या वासाने वातावरण सुरभित झाले.

इंद्र सर्वांना उद्देशून म्हणाले, " श्री प्रभूचें हें प्रस्थान मंगल आहे. जगत्कल्याणकारी धर्माचा उपदेश हेंच त्याच्या जीविताचें मंगल कार्य आहे. हे माननीय नागरिकांनो, असल्या त्रैलोक्य-दीपक वैभवाचा त्याग करणाऱ्या श्रेष्ठ विभूतीचा जन्म तुमच्या नगरीत झाला. त्यांचें मार्गदर्शन सतत तुम्हास मिळालें, म्हणून तुम्ही भाग्यवान आहात. त्या थोर विभूतीच्या तपःसिद्धीत तुम्हीही मदत करावी. "

त्यानंतर इंद्र आपल्या परिवारासह निघून गेला. काय करावे हें अनेक राजाना कळेना. प्रभूनी ऐश्वर्याचा-वैभवाचा त्याग करावा आणि आपण पुन: जाऊन वैभव भोगत बसावें हें त्याना कसेसेच वाटलें. " काय करावे " हें न सुचून त्यांनी देखील प्रभूनी जसा संन्यासधर्म स्वीकारला तसा स्वीकारला.

जें श्री प्रभूला आवडतें तेंच आम्हालाही आवडो हीच त्यांची या संन्यासामार्गे भावना होती. हृदयांत विरक्ति नव्हती. किंवा तप:सिद्धीचा कठीण मार्गहि त्यांना ठाऊक नव्हता. भोगांतील आसक्ति कशी नष्ट करावी ? कोणत्या वस्तूचे चिंतन करावे ? दुर्लभ अशा आत्मतत्त्वसिद्धीच्या प्राप्तीचा उपाय कोणता ? हें त्यांना मुळीच ठाऊक नव्हतें. शेंकडों राजे, महाराजे अविचाराने, मोहानें किंवा भीतीनें संन्यासी बनले. त्या सर्व संन्यस्त वृत्तीने राहाणाऱ्यांनी प्रभूच्या मुखकमलाकडे पहावें, व ते ज्याप्रमाणें करतील तसे करावें असा क्रम जारी राहिला

• • •

नव्हती. मरीचि कुमारानें महायोगाची साधना केली. प्राणवायूचा निरोध करून यौगिक बळाचा संचय केला. विविध वस्तुजातांतील सूक्ष्म रहस्यें त्याला ज्ञात झाली. त्यानें मुख्यातोला श्रीवृषभाच्या धर्मोपदेशापूर्वी स्वतःचा योग-पंथ व सांख्यपंथ स्थापन केला. आदिपिता श्रीवृषभ हीच त्या पंथाची प्रमुख उपास्य देवता त्याने कल्पिली होती आत्मसाधनेचा मार्ग बंद झाला की भौतिक साधनेकडे माणूस वळतो. तसलाच प्रकार मरीचिऋषीच्या बाबतीत घडला. पळून गेलेल्या शेकडों ऋषींना त्याने पाचारण केले. हीनदर्जाची का होईना तपश्चर्याकरून त्याने अनेक भौतिक शास्त्राचा पाया घातला.

मरीचि हा स्वतः तेज पुंज शरीराचा, धिप्पाड शरीरयष्टी व दैदिप्य-मान डोळे असलेला तरुण युवक होता तपभ्रष्टतेबरोबरच एक प्रकारचा अभिमान त्याच्या मनात शिरला. देहविनाशक तपश्चर्येपेक्षा ऋद्धि आणि सिद्धि प्राप्त करून देणाऱ्या, वाटेल त्यावेळी भौतिक सुखाचे ताट समोर वाढून ठेव-णाऱ्या तपःसिद्धीत त्याला यश आलें होतें. कसल्याहि धातूचें सुवर्णात रूपांतर करणें, दिव्य औषधींची निर्मिती करून शरीरास मृत्यूपासून दूर ठेवणें, दिव्य-नेत्र सामर्थ्याने समोरील व्यक्तीची रासरागोळी करणे या गोष्टी त्याला साध्य झाल्या. याच चमत्कृतीच्या बळावर त्याने अनेक शिष्यांस मिळविले होते.

आणखीहि काही साधू याच उद्योगांत रमले होते त्यांनी जगलात पुनःसंसार मांडला होता. शेती करायला सुरुवात केली होती.

ध्यानस्थ बसलेल्या श्रीवृषभनाथांना या सर्व प्रकारची कल्पना नव्हती ते सर्व प्रकारच्या चित्तविकल्पाचा निरोध करून एखाद्या वज्र शिळेप्रमाणे अचल, अकंप होते.

एके दिवशीं कच्छ आणि महाकच्छ या महाराजाची दोन मुले तेथें आलीं. प्रभूंना असे दिगम्बर रूपात स्थिर उभे पाहून त्याना फारवाईट वाटलें. त्यांचा येण्याचा हेतु फार वेगळा होता. श्री प्रभूंनी संन्यास घेण्यापूर्वी या पृथ्वीवरील अनेक राज्यें आपल्या नातलगांस वाटून दिली होती. नमि आणि विनमि या दोघांना कांहीच मिळाले नाही. आपणही प्रभूची सेवा करून त्यांना प्रसन्न करून घ्यावें व इच्छित गोष्ट साध्य करावी अशी त्याची मनीषा होती.

श्री प्रभूच्या पायाजवळ बसून ते प्रार्थना करूं लागले, " हे प्रभू, तुम्हाला हें काय झालें आहे ? सर्व वस्त्रांचा त्याग करून ऊन, पाऊस, थंडी यां पासून होणारा त्रास तुम्ही कां सहन करीत आहात ? सर्व राज्याची वाटणी करतांना केवळ आम्हालाच का विसरला ? " अशा प्रकारे कधी ते प्रभूच्याकडे विनयाने, तर कधी कारूण्य भावनेनें विनवणी करीत होते रडत होते. प्रार्थना करीत होते. परतु महाक्षमाशील, महाध्यानी, महामौनी, आत्मसम्राट श्री वृषभ समुद्राप्रमाणें शांत आणि गभीर होते.

नमि आणि विनमि याचा तोल सुटू लागला होता. मुद्दामच श्रीप्रभू आपल्या विनतीकडे दुर्लक्ष करीत आहेत. श्री भरताकडे सर्व राज्याचा भार सोपवून आपला उपमर्दच झाल्यासारखें त्यांना वाटत होते.

श्री प्रभूच्या त्या साधनेंत नमि आणि विनमि याच्या येण्याने विघ्न उपस्थित होण्याची शक्यता निर्माण झाली होती.

इतक्यात धरणेंद्र नांवाचा देव तेथें आला त्या दोन राजकुमारांना तो म्हणाला—

" तुम्ही अगदीच बालिश दिसता. श्रीप्रभू ध्यानात असतांना तुमच्या तुच्छ विनंतीचा ते स्वीकार तरी कसे करतील ? त्या श्रेष्ठ पुरुषाने सर्वस्वाचा त्याग केला, ते तुम्हास आता काय देणार आहेत ? तुम्हाला भौतिक साधने हवी आहेत. राज्य हवें आहे. पण प्रभूपाशी आता केवळ आत्मसाम्राज्यच शिल्लक आहे खरं पाहिलं तर तुम्ही भरताकडे गेलं पाहिजे. "

" मध्येंच येऊन असा न विचारतां सल्ला देणारे आपण कोण ? याचा आम्हास बोध होईल काय ? वृद्धत्वामुळें आपण हें विसरल्यात कीं न विचारतां कुणाला आपला बहुमोल उपदेश आपण व्यर्थ कां देत आहोत ? दुसऱ्याच्या कार्यांत विघ्न उपस्थित करून त्याचं बरं न होऊं देणं हेंच जीवितकार्य आपण हातीं घेतलेलें दिसतें. भरताकडे जाऊन राज्याची भीक मागण्याचा उपदेशही त्याच मनोवृत्तीतून संभवतो. राज्यें भीक मागून मिळत नाहीत. याचा आम्हा क्षत्रियांना विसर पडला नाही. "

त्यावर धरणेंद्र पुन. म्हणाला,

' आपल्या क्षत्रित्वाचे तेज स्पष्टच दिसत आहे प्रभूच्या ध्यानांत विघ्न उपस्थित करून स्वार्थ साधण्याचा कमकुवत डावच त्यातून दिसून येतो. प्रभूची भक्ति हें केवळ ढोंग दिसते तुमचे. "

हें कटवचन ऐकून विनमि म्हणाला, " आपण वृद्ध दिसतां म्हणूनच आपली ही कटुवचनें आम्ही ऐकून घेतलीं. अन्यथा असली वचने तोंडातून निघण्यापूर्वीच तुमची जीभ जागेवर राहिली नसती. "

नमि त्यास म्हणाला, " भाऊ, तुम्ही असें रागाऊ नका. हा कुणी तरी पुरुष केवळ आपली परीक्षा पाहाण्यासाठीं आला आहे. याचा इथे येण्याचा हेतु वाईट असावा असे वाटत नाही. "

नतर नमि त्या वृद्ध पुरुषाला म्हणाला, " आपण आपला परीचय करून दिल्याशिवाय आपल्याशी कांही संभाषण करणें उचित नव्हे. कदाचित अविनयाने आमच्याकडून काही कमीउणे बोलले जाईल. आपण आपला परीचय द्यावा हें उचित आहे. "

त्यानंतर धरणेंद्र देवाने त्या दोघांनाहि आपलें दैवी रुप प्रगट करून दाखविले. त्या दिव्य तेजाने दोघांचेही डोळे दिपले. दोघांनी त्या देवास नमस्कार केला.

त्यावर तो देव म्हणाला, " मी धरणेंद्र नांवाचा देव असून

श्री प्रभूच्या सेवेत निरंतर असतो. आपल्या इथे येण्याने प्रभूंच्या अंगीकृत कार्यात विघ्न येऊं लागलें म्हणून मला येथें यावें लागलें. आपली श्री प्रभूच्या चरणी परमभक्ति आहे हे मलाही ठाऊक आहे. परंतु आपणास प्रभूकडून राज्य मिळणार नाही. इंद्राच्या आज्ञेवरून आपणास यक्षकिन्नर विद्याधराच्या प्रदेशात दिव्य राज्य मिळूशकेल. आपण मज-बरोबर चलावे."

हा आपणास फसविणार नाही, याची खात्री झाल्यावर ते दोघे राजकुमार त्या देवाबरोबर हिमालयाच्या उतरणीवरील अनेक राज्यें पहात निघाले.

गंगातीरावरील सेंकडो खेडी व शहरे धनधान्यानी सपन्न होती. उंच उंच हवेल्या, त्याच्या शिखरावरील पताका आणि ध्वज सूर्य-प्रकाशात चकाकत होते. त्या कुमारांना सर्व प्रदेशाची माहिती देत देत त्या धरणेंद्र देवाने त्याना दक्षिण श्रेणीतील एका भूभागाचें स्वामित्व नमीला व दुसऱ्या भूभागाचें स्वामित्व विनमीला देऊन त्याचा सत्कार केला. अनेक विद्याधरांनी त्या दोघांना आपले स्वामी मानले अशारीतीनें नमिविनमींना राज्य दिल्यावर देव तेथून निघून गेला.

## १ दानशील श्रेयान्सकुमार

श्रीवृषभांची तपश्चर्या सहा महिन्यांनी पूर्ण झाली. "ॐ नमः सिद्धेभ्यः" अशा मंत्रोच्चारानी त्यांनी समाधीचा परित्याग केला.

आपल्या सहा महिन्याच्या समाधींत घडलेल्या अनेक गोष्टींचें ज्ञान व्हावयास त्या परब्रम्हस्वरूप श्रीवृषभांना कितीसा वेळ लागणार ?

भ्रष्ट झालेल्या साधूंची स्थिति त्यांना कळाली. संयमाचा मार्ग हा तरवारीच्या धारेसारखा असतो. आपणास न झेपणाऱ्या गोष्टीचा स्वीकार केला की पदरी अपयश येतें. उपवासाचें कठीण व्रत करतांना चित्तवृत्ती प्रफुल्लित राहील, शरीर फार क्षीण होणार नाहीं, इकडे दुर्लक्ष करून कसें चालेल ? असा विचार श्री प्रभूंच्या मनांत आला. केवळ तपःश्चरण म्हणजे धर्म साधना नव्हे. शरीरानें

सहाय्य असल्याशिवाय तप होणार नाही. म्हणून उत्कृष्ट ऋषि-मुनींनी धर्माचरणपूर्वक शरीर साधनेसाठी कोणता आहार घ्यावा ? कसा घ्यावा ? कुणाच्या हातून तो घ्यावा ? हे जणु समजावून सांगण्याच्या इच्छेने श्रीप्रभू आहारासाठी बाहेर पडले.

सहा महिन्याच्या उपवासाने प्रभूच्या दिव्य रूपात आणखीनच भर पडली होती. त्यांचा धिप्पाड देह, एखाद्या सिंहासारखी निभिड पाऊले टाकीत वनाचा मार्ग आक्रमित होता. श्रीवृषभाची दृष्टि जमिनीकडे स्थिर असे कुणाहि जीवाला माझ्या चालण्यामुळें त्रास होऊं नये असा जणु त्यांचा संकल्प होता.

त्या घनदाट अरण्यांतून जातांना श्री प्रभूच्या हृदयात अनेक तरंग उठत होते सर्वस्वाचा त्याग करून आज ते एकटेच आणि निःसंग होऊन हिंडत होते. हवा, ऊन, पाऊस हेंच त्यांचे परम मित्र ! पृथ्वी हेच घर ! आकाश हेच त्यांचे पांघरूण ! सुख-दुःखाच्या सीमारेषा त्यांनी ओलांडल्या होत्या.

अनेक पर्वत, नद्या, जंगलें ओलांडून जात असता एका प्रचंड सिंहाची आरोळी त्यांना ऐकू आली गुहेंतून निघून त्या सिंहानें श्री प्रभूच्या रोखानें चाल केली. स्वतःच्या सत्तेतील क्षेत्रात महा-मंगल श्री प्रभूचें आगमन झालेले जणुं त्याला कळालें होतें. सामोरें जाऊन जणु त्यानें आपला सेवाभाव प्रदर्शित केला.

त्या सिंहाने पुढील पाय वाकवून श्री प्रभूकडे पाहिलें. कारुण्यमूर्ति प्रभूंनी त्याला आशिर्वाद दिला. ' रे सिंहा, तुला अभय असो. तुझ्याहि जीवनात असा मंगल दिवस उजाडेल की जेंव्हा तूं पशु म्हणून राहाणार नाहीस अखिल मानवाचा हितकर्ता म्हणून या पृथ्वीतलावर संचार करशील. "

सिंहाला काय कळाले ते सांगता येणार नाही. पण श्री प्रभूंच्या सौम्य, प्रशांत मुद्रेवर तो लुब्ध होता. अशी 'व्योममूर्ति, सौम्यमूर्ति त्यानं आपल्या आयुष्यांत पहिल्यादाच पाहिली होती.

श्री प्रभूचें पहिलें स्वागत एका पशूकडून व्हावें हाहि एक योगायोगच ! दिव्यत्वाची मांगल्यमूर्ति असलेले श्री वृषभ पुढे निघाले. सिंहाच्या दर्शनाने त्याना एका प्रसंगाची तीव्रतेने आठवण झाली.

एका मागच्या जन्मीं याच जंगलांत ते सिंह होऊन जन्मले होते. त्या जन्मात त्याना एक साधु भेटले होते. त्या साधूने सांगितलें " ' तुझें जीवन जसें तुला प्रिय तसेच सान्याना आपले जीवन प्रिय असतें. ' "

त्या संबोधनाने सिंहरूप असलेल्या श्री वृषभाचा आत्मा जागृत झाला होता.

एके दिवशी त्या जंगलांत हिंडत असतांना एका वनगाईला त्या सिंहानें पाहिले. सिंहाला भूकहि लागली होती. काल देखील त्याला उपवास घडला होता. त्या गाईच्या रुधिरमांसावर आज तो उपजीविका करणार होता. सिंहाने प्रचंड आरोळी ठोकली. सारें रान दणाणून गेले. परंतु ती वनगाय स्तब्ध होती.

सिंहाला आश्चर्य वाटलें. ही वनगाय आहे की नाही याची शंका आली. त्याला कारण प्रचंड आरोळीनें ती घाबरली नव्हती. तेव्हा सिंहाने जवळ जाऊन पाहिले. ती वनगाय फारच घाबरली होती. पण ती सिंहाला घाबरली नव्हती. तिची झुबकेदार पांढरी शुभ्र शेपटी एका काटेरी वृक्षाला अडकली होती. प्राणाच्या पलीकडे मोल देऊन वनगाय आपल्या केसांना जपत असते. हे सिंहाच्या लक्षात आले. सिंहाच्या मनांत फारच कारुण्य आले पोटांत भूक आणि हृदयांत कारुण्य ! त्या वनराने भूक आवरली. दयेच्या प्रवाहाला वाट करून दिली. आपल्या तीक्ष्ण पंजांनी तिचं शरीर फाडण्यापेक्षा तिच्या अडकलेल्या शेपटीला त्या सिंहाने हळूच काटेरी झुडूपातून मुक्त केले.

त्यासरशी ती वनगाय स्वतःचा जीव घेऊन पळून सुटली

या आठवणीने श्री प्रभूना अलौकिक आनंद झाला विविध

रूपें घेऊन आत्मा कधी पशु, कधी नारकी, कधी देव तर कधी मनुष्य या रुपानें पृथ्वीतलावर वावरतो. पण अमर आत्मा शेवटीं ही सर्व रूपें टाकून जीवनमुक्त होतो. आत्मोन्नतीसाठी करावी लागणारी धडपड किती प्रचंड असतें !

ज्या ज्या खेडयात, शहरांत प्रभू गेले तेथे त्याचे स्वागत झालें. परंतु प्रभू स्वतः मौन होते ते कुणाला काहीच मागत नव्हते—मागत नव्हते.

श्री प्रभूंनी राज्यवैभवाचा त्यागकरून असे हिंडावे याचे आश्चर्य अने–कांना वाटावे यात नवल तें कसले ! ज्यांनी पूर्वाश्रमीचे श्रीवृषभ पाहिले होते त्यांना वाईट वाटलें, प्रभूना कांही तरी हवें आहे या कल्पनेने ते त्यांच्या-साठी कपडे घेऊन येत आणि म्हणत—

" हे राजर्षि, आपणास काय कमी आहे ? आपण आमच्या या देण–गीचा स्वीकार करा. स्नान करून उत्तमोत्तम वस्त्रे परिधान करा. "

कुणी पालखी, घोडे, हत्ती घेऊन येत व त्यात बसून स्वतःच्या घरी चलण्याची विनती करीत. परंतु श्री प्रभूची पदयात्रा चालूच होती. नेमके प्रभूजींना काय हवे याचें कोडें कुणालाहि उलगडत नव्हतें. या गूढ–चर्येचा अर्थबोध कुणालाहि होत नव्हता. गावोगावी हीच चर्चा. प्रभूनी आमच्याशी बोलून काय हवे ते सांगावे. आम्ही त्याच्यासाठी राज्यत्याग करूं पण त्यांनी आपली इच्छा बोलून दाखवावी. "

निरिच्छांनी इच्छा काय बोलून दाखवावी ! श्री प्रभूनी त्या पामर मानवाकडे पाहावे, आणि करुणेने पुढे निघून जावें, असा क्रम चालू होता. ज्या ज्या गांवी ते जात त्या ठिकाणी हाच प्रकार दृष्टीस पडे.

अशा रीतीने योग्य माणसाकडून योग्य आहार घेण्यासाठी प्रभू फिरत असतां आणखी सहा महिन्याचा अवधि निघून गेला. एक वर्ष लोटले. प्रभूच्या पोटात अन्न–पाण्याचा कण नाही. दिव्य मानसिक विचार व सर्वां–भूतीं समत्व या दोन गोष्टींनी जणुं त्यांना बळप्राप्त झालें होतें.

ग्रीष्म ऋतूला सुरुवात झाली होती. सूर्याची किरणें तापूं लागलीं.

होती. श्री प्रभूंचा विहार तसाच चालू होता. दिव्य प्रवासानें सारी गांवें जणु जागृत झाली होती. विरक्त जीवनाची एक जीवत–जागृत ज्योत जणु जगानें पाहिली होती. सर्व वैभवाकडे प्रेमाने पाठ फिरवून ती दिव्य–भव्य मूर्ति सर्वत्र विहार करीत हस्तिनापुरी आली.

श्री प्रभूच्या आगमनाची वार्ता वनपालाने राजा सोमप्रभाला दिली. ज्या वनांत रात्रीं प्रभू विसाव्याला थांबले होते तें वन फुलाफळांनी बहरून गेलें. दिव्य–सुवासिक मधुगधाने सारें रान सुपरिमलयुक्त झालें. तें दृश्यपाहून वनमाळी आनंदित झाला. शोध घेता घेता एका प्रचंड वटवृक्षाखाली एका विस्तीर्ण शिळेवर प्रभू ध्यानस्थ होते. त्यानें प्रभूला वंदन केलें व ही बातमी राजाला कळविली.

ती वार्ता गांवभर पसरायला वेळ लागला नाही. झुंडीच्याझुंडी श्रीवृषभांच्या दर्शनाला निघाल्या. राज्याने श्रीवृषभाचें भव्य स्वागत केलें.

सोमप्रभ हा कुरूवंशांतील पहिला राजा. श्रीवृषभांच्याच आशीर्वादानें त्याने त्या वंशाची स्थापना केली होती. त्या राजाला एक भाऊ होता. तो अनेक गुणांनी युक्त होता. त्याचे नाव श्रेयान्सकुमार

तो वर्णानें तापविलेल्या सोन्यासारखा ! रूपाने कामदेवासारखा, पराक्रमाने सूर्यासारखा, विद्वत्तेंत बृहस्पतिसारखा ! अनेक कलागुणाचा ज्ञाता आणि भोक्ता ! श्रीवृषभानी घालून दिलेल्या आज्ञेप्रमाणें राज्याचा अधिशासक !

श्रीवृषभांच्या आगमनानें एकप्रकारची दिव्यानुभूति त्यांच्या मनांत उत्पन्न झाली. श्री प्रभूंच्या उपवासाची त्याला कल्पना होतीच. सामोरे जाण्यासाठी म्हणून दोघां बंधूनी आपले सर्व अलकार बाजूस ठेवले व एका शुभ्र–वस्त्रानिशी ते प्रभूंना शहरांत आणण्यासाठी निघाले.

सोमप्रभ म्हणाला, " श्री प्रभूंच्या मनांतील हेतू काय आहे हें अद्याप कुणास कळाले नाही. सहा महिने घोर तपश्चर्याकरून त्यांनी निबिड अरण्यें पार केली, नद्या ओलांडल्या. त्याच्यामनातील भावना न कळाल्याने त्यांची कशी सेवा करावी हेंच कळत नाही. आपल्या सद्भाग्यानें श्री वृषभाचें आग-

मन झाले. परंतु त्यांना आहार कसा द्यावा हे कांही सुचत नाही."

यावर श्रेयान्स कांही बोलणार इतक्यात श्रीवृषभाना दुरून येताना त्यानें पाहिले. दोन पिळदार मांड्या, दिव्य, तेजस्वी शरीराचा भार धारण करून तिकडेच निघाल्या होत्या होय ! हेच श्रीवृषभ ! आदिपुरूष ! जगाच्या उपजीविकेचा महामार्ग सांगणारा आदि ब्रम्हा !

श्रेयान्सकुमाराच्या मनांत खोलवर दडलेली एक भावना दिव्य रूपांत साक्षात् उभी झाली. श्रेयान्सला वाटले या दिव्य आत्म्याचा आणि माझा काही तरी संबंध आहे

कसला संबंध ? केव्हाचा संबंध ? या प्रश्नाची उत्तरे हुडकण्यात थोडा वेळ गेला. कसली तरी जन्मजन्मांतरीची प्रेमळभावना पुन आज नव्याने अंकुरली होती. हेच ते दिव्यरूप ! हेच ते महापुरूष ज्याच्या सह- वासांत त्या श्रेयांसाने एका जन्मी " श्रीमती " या नावाने पत्नीत्व स्वीका- रले होतें. आजचे वृषभ त्यावेळीं केवळ वज्रजंघ होते. भोग उपभोगात घालविलेल्या असंख्य स्वप्न मालिकांची रांगच तरंगत जाऊ लागली. होय तो श्रेयान्स नव्हता ! तो श्रीमती होता– वज्रजंघाची पत्नी !

एका प्रसंगी त्याने आकाश विहारी दोन मुनींना आहार दिला होता. अशा दिव्य मुनीच्या आहाराची एक रीत असते. ती रीत—ती तऱ्हा त्या श्रेयांसाला आठवली त्याने नोकराला सांगितले—

" राजवाड्यात जा. सडासम्मार्जन करा. रांगोळ्या काढा. चांगल्या उसांचा रस काढून सुवर्ण पात्रात झाकून ठेवा जा लवकर जा. सारे कर्म शुचिर्भूतपणे करा. "

श्रेयान्साच्या उत्साहाला जणु पूर आला होता. आपल्या सर्व सज्जनांना आवाहन करून श्री प्रभूच्या चरणी मिठी मारण्यास तो तयार झाला होता. जन्मोंजन्मी हेंच चरण लाभावे हीच मनीषा त्याने नव्हती का बाळगली ? आत्म्यांतीच सर्वस्वाचें महाद्वार त्याने नव्हते का केलें ? त्याचे सर्वस्व जणु त्याच्या दृष्टिपथांत आले होते चुकलेल्या वासराला आई भेटावी, पाण्या- बाहेर तडफडणारा मासा पुनः पाण्यात जाऊन पडावा तसें श्री श्रेयांसानें

झाले. त्याचें सारें लक्ष प्रभूचा आदर कसा करावा, त्याना रसाचें दान देऊन सतुष्ट कसें करावें, इकडे होतें.

इतकी अधीरता त्याच्या जीवनांत केव्हाच निर्माण झाली नव्हती. हे विश्व त्याच्या आनंदाला अपुरे होतें.

प्रभू जवळ येताच श्रेयान्साने त्याच्या पायांना मिठी घातली. याच पायासाठी त्याचे डोळे प्रतीक्षा करीत होते. जन्मोजन्मीचा सहवास याच पायांचा त्याला हवा होता. ते प्रभुचरण त्याच्या भक्तिमुळेंच जणु त्याच्या घराकडे वळले होते. आपल्या आनंदाश्रूंनी प्रभूचे चरणकमल श्री श्रेयासानें धुवून काढले.

आणि तो अत्यंत गंभीर आवाजात म्हणाला—

" हे जगद्बंधु, आमच्या पूर्व पुण्याईने तुम्ही या नगरीत आलांत त्याबद्दल हस्तिनापुरवासीयाकडून तुमचे स्वागत असो. तुमच्या चरणस्पर्शानें ही भूमि आज पुलकित झाली आहे. प्रसन्न झाली आहे. हे यज्ञपति, आमच्या जीवन यज्ञातही तुम्ही पुरोहित म्हणून आलांत त्याबद्दल कशी कृतज्ञता व्यक्त करावी हें न कळाल्यामुळें सारे लोक हतबुद्ध झाले आहेत. "

अशी प्रार्थना करून श्रेयांसकुमारानें श्री प्रभूला तीन प्रदक्षिणा घालून वारंवार विनविले, " हे महापुरुषा, आमच्या घरी चलावें. शुद्ध व दोषरहित आहाराचा स्वीकार करावा. "

त्यानतर विमल जलाने त्याने श्रीचे चरण प्रक्षालित करून ते आपल्या उपरण्याने पुसले श्रीप्रभूच्या पायावरील धूळ निघून गेल्यामुळें स्वच्छ स्फटि-काप्रमाणे ते चकाकू लागले.

जमीनीतून एखादें कमल एकाकी वर यावे तशी श्री प्रभूची मूर्ति उभी होती. हजारो नगरवासी पुष्पवर्षाव करीत होते. कुणालाहि न पावलेले श्रीवृषभ श्रेयान्साच्या भक्तीला शरण आले होते. महामांत्रिकाला महासर्प वश व्हावा त्याप्रमाणें श्री श्रेयान्साच्या भक्ती–माधुर्याने ते वश झाले.

नम्रतेने पण गंभीरपणें पडणारी पाऊलें जणु प्रत्येकाच्या हृद-यात मागल्याचे ठसे उमटवीत होती. जनतेच्या हृदयांत उत्साहाची कमळें

उमलत होती. पुढे पुढे श्रेयांस आणि मागोमाग श्रीवृषभ असा देखावा पाहून सारे लोक आनंदाने बेहोश झाले. सहा महिनेपर्यंत अनेकांनी श्रीप्रभूला आमंत्रित केलें होते. परंतु आदि ब्रम्हाच्या मनाला खेंचून घेईल अशी गोष्ट घडली नव्हती. श्रेयांसाच्या मनातहि साशंकता होती. आपल्या कडून एखादी चूक घडली आणि श्री आदि परत गेले तर .... ! या क्रूर आणि विषारी विचाराने तो अधिकच सावधगिरीने मार्गावर सुगंधित जलाचा वर्षाव करीत प्रभूना त्या शुद्धभूमीवरून येण्याची सारखी विनवणी करीत होता.

थोड्याच वेळांत राजवाड्याच्या अंगणात ते दोघे आले. पुनः श्रेयांसाने प्रभूना आहारपाणी शुद्धतेपूर्वक तयार असून प्रभूनी अनुग्रह करावा अशी विनंती केली. त्यांचे पाय पुन. निर्मळ पण सुगंधित जलानी धुतले. केशराच्या गंधाने ते विलेपित केले. त्यावर फुले वाहिली. सहस्त्र दीपानी त्यांना प्रसन्न केले.

समोरच दोन सुवर्णपात्रें ठेवली होती. दोन रत्नखचित पाट मांडले होते. श्री प्रभूची मूर्ति त्या पाटावर उभी राहिली. जणुं मागल्याचे दैवतच उभें होते. श्रेयांसाचें इप्सितच जणुं त्या पीठावर साकार उभें होतें. रत्नांचे तेज व प्रभूच्या नखांचे तेज एकमेकांशी स्पर्धा करीत होते.

श्रेयांस सुधौत वस्त्रें नेसला होता त्याने सुरवातीला प्रभूचे हात धुतले. धुतलेले हात स्वच्छ वस्त्राने पुसल्यावर श्रीप्रभूनी हाताची ओंजळ तयार केली. त्या ओंजळीत उत्कृष्ट उसाचा सुस्वादु रस श्रेयांसाने ओतला श्रद्धा, भक्ति, आदर, पावित्र्य, मांगल्य या गुणांची झांक प्रत्यक्ष श्रेयांसाच्या चेहऱ्यावर विलसत होती. खरा दिव्य आनंद त्याच्या मनात उद्‌भवला होता

तृप्त झालेले, संतुष्ट झालेले, प्रसन्न झालेले श्री वृषभ श्रेयांस व सोमप्रभ बधूंना आशीर्वाद देऊन वनाकडे जावयास निघाले. जाताना त्यांनी श्रेयांसाकडे अत्यंत प्रेमाने पाहिले. त्याच्या दृष्टीतून असा अभिप्राय प्रगट होत होता— ' हे दातृत्वशील राजा, तुझें इहपरलोकी परम कल्याण होवो. '

प्रभू झपाझप पाऊलें टाकीत वनाकडे जाऊ लागले. वनापर्यंत दोघां बंधूनी साथ दिली. अनेक नागरिकही पोंचवावयास आले होते.

प्रभू वनातरी अंतर्धान होईपर्यंत श्रेयांस त्याच्याकडे पहात होता. श्री वृषभांच्या सहवासातील कांही घटका त्याच्या जीवनात चिरस्मरणीय होऊन राहिल्या होत्या.

त्याच वेळी इंद्रराजानें येऊन श्रेयांसाची स्तुति केली. तो म्हणाला— " तुम्ही प्रभूंच्या मनांतील अभिप्राय ओळखून त्याना आहारदान दिले यांतच तुमचें कौशल्य आहे. पृथ्वीवरील दातृत्व तुमच्या रूपानें अक्षय राहील. त्रैलोक्याधिपतीस तुम्ही तृप्त करावें याहून तुमचें महत्‌भाग्य कोणतें ? या बाबतीत प्रत्यक्ष तुम्ही आम्हासहि लाजविलें आहे. " असें म्हणून इंद्रानें दैवी वस्त्रें व अलंकार देऊन त्याचें अभिष्ट चिंतिले. आकाशांतून देवानी पुष्पांचा वर्षाव केला.

साऱ्या नागरिकांनी श्रेयासाच्या भक्तीची, दातृत्वाची व समय-सूचकतेची खूप प्रशंसा केली हस्तिनापुरातील हा श्रेयांसाचा कीर्तिहंस सर्वत्र फिरत होता. सर्वांना हेच तो सांगत होता की— श्रेयान्सानें श्री प्रभूंना संतुष्ट केलें. परमभाग्याचा हा क्षण त्याच्या आयुष्यांत त्याला प्राप्त झाला.

श्रेयांसाची ही कीर्ति ऐकून श्री भरत त्याच्या भेटीस आले भरत सम्राट भेटीस आलेले पाहून श्रेयांसाने त्याचा फार सन्मान केला. त्याच्याबरोबर आलेल्या सरदारास मोठ्या इमानेंइतबारें ठेऊन घेतलें.

एकेदिवशी भरत महाराजानी श्रेयांसाला विचारले, " आपण परम ब्रम्हस्वरूप श्रीवृषभांच्या मनातील गूढ हेतू कसा जाणला ? "

त्यावर श्रेयांस म्हणाला " महाराज, यांत लपविण्यासारखें असें कांही नाही. प्रभू आहाराशिवाय सहा महिने हिंडत होते. त्यांच्या आहारादिकांचा एक नियमित क्रम असतो. ते आपली इच्छा कुणास कधीच बोलून दाखवित नसतात. सुयोग्य व्यक्तीकडून शुद्ध आहार घेण्याविषयी आदरपूर्वक विनंती केली जाणें आवश्यक असतें. ते आमच्या देशाकडे विहार करतील अशी अंधुकशी कल्पना होतीच. शिवाय प्रभूचें मुख पाहिल्याबरोबर मला मागील जन्माचें स्मरण झालें. "

भरताला आश्चर्य वाटलें त्यानें विचारले, " मागील जन्माचें स्मरण कसलें ? "

त्यावर श्रेयांस म्हणाला, " हे राजपुरुषा, फार फार वर्षा-पूर्वीची गोष्ट. त्यावेळीं, त्या जन्मी, मी एक स्त्री होतें. त्या वज्र-जघाचा आत्मा म्हणजेच तुमचे पिताजी, श्री वृषभ होत आणि त्यावेळची त्याची पत्नी म्हणजे आज तुमच्या समोर उभा असलेला हा श्रेयांसकुमार होय. तुम्हाला या सर्वांचे आश्चर्य वाटेल. पण आत्म्यालाच उद्देशून असे म्हटले आहे की—' हा कधीच नष्ट होत नाही, जन्मत नाही, मरत नाही, तो स्त्री नाही पुरुषहि नाही. तो तरूण नाही, तो म्हातारांहि नाही. "

भरत म्हणाले, " अद्यापि आमच्या प्रश्नाचें उत्तर आपणा-कडून दिले गेलें नाही. "

" उत्तर हेंच की त्यावेळी आम्ही दोघांनी मिळून आकाशविहारी मुनींना आहार दिला होता. वज्रजघ आहार-विधीत निपूण होते. त्यांनी योग्य आहाराचा विधि मला शिकविला होता. त्यांना पाहाताच मला तो विधि आठवला. श्री प्रभूंनी शिकविलेली गोष्ट त्याच्याचसाठी उपयोगास आली हा योगायोगच समजला पाहिजे. "

या खुलाशामुळे श्रेयांसासंबंधी फार मोठी आदराची व श्रद्धेची भावना श्री भरताच्या मनात निर्माण झाली. श्री भरतानें मनात कसलीहि खत न बाळगता त्या वयानें लहान असणाऱ्या श्रेयांस-कुमाराला श्रद्धेने नमस्कार केला.

त्यावर श्रेयांस म्हणाला, " आपण मला व्यर्थच एवढा आदर अर्पण करीत आहात. आपणा सर्वांच्या भाग्यानें श्री प्रभूंना आहार देतां आला हें काय कमी झाले ? केवळ आहाराचा विधि माहित नसल्यानें शेंकडों राजे साधु होऊन भ्रष्ट झालेले तुम्ही पाहाताच. तप आणि उदरनिर्वाह या दोन गोष्टींची सांगड मुनी

लोकानी कशी घालावी हेंच जणु श्री प्रभूना शिकवावयाचें होतें. "

भरत म्हणाले, " तुम्ही दानाचा महिमा जाणला. दानाची मंगल परंपरा तुम्ही निर्माण केली. मानवजातीचें हित दानाची परंपरा अखंड रीतीने चालावी यातच आहे. खरोखरच तुम्ही धन्य आहांत. "

श्रेयांस म्हणाला— श्रीवृषभ हे सर्वोत्कृष्ट पात्र आहेत. त्यांना दिलेलें दान देवपूज्य आहे. मग ते मानवपूज्य असेल यांत संशय तो कसला ? मानवानें सर्वजनाच्या हितासाठी आहारदान, औषधदान, ज्ञानदान आणि अभयदान अशी चार दानें द्यावीत. यातील हेतू सर्वजण सुखी व्हावेत, निरामय व्हावेत, ज्ञानी व्हावेत व निर्भय व्हावेत असा आहे. "

अशा प्रकारें श्रेयांसाकडे काही दिवस घालविल्यावर श्री भरत अयोध्येस परत आला. श्री आदिप्रभूची एक दिव्यमूर्ति त्यानें निर्माण करून आपल्या राजदरबारांत उभी केली. तिच्या दर्शनानें राज्यकारभार सुखकर होईल व आपण आपल्या कर्तव्यात कसूर करणार नाही अशी त्याची कल्पना होती.

• • •

# राजर्षि भरत

पिताजींनी दिलेलें राज्य भरतानें अत्यंत न्यायबुद्धीने चालविलें. दिवसेंदिवस मानवातील कर्तव्यबुद्धि लोप पावत होती. नीति मार्गाचा अवलंब न करता काही लोक पाप मार्गाचा अवलंब करून धनधान्य संचय, सज्जनपीडा आणि हिंसा या मार्गांनी आपला जीवनक्रम आखूं लागले.

श्रीभरताला या गोष्टीचा उच्छेद करावयाचा होता. समाजात अनीति पसरूं नये, दंभाची वाढ होऊं नये यासाठी काही नवीन सामाजिक रचनाच त्याला करणे आवश्यक वाटत होतें. परंतु भारतीय जीवनाला पोषक होईल अशी चिरकाल टिकणारी राज्यव्यवस्था, अर्थव्यवस्था व समाजव्यवस्था त्याला निर्माण करावयाची होती.

राजसभेंत श्रीभरत याच प्रश्नावर सर्व मन्त्रिगणाशी चर्चा करीत असतां एका मंत्र्यानें त्यांना सुचविलें की जो पर्यंत आपणाला सम्राट्पद

मिळत नाहीं तोंपर्यंत तुम्ही निर्माण केलेली कोणतीहि व्यवस्था अखिल भारतांत दृढमूल कशी होईल ?

दुसरा मंत्री म्हणाला, " महाराज, सध्यां शहरांशहरांतून जी राज्य-व्यवस्था व समाजव्यवस्था आहे ती लक्षात घेता नवीन बदल पडून यायला फारच उशीर होईल. तुमच्या अंकित असणारे राजे जर मनात आणतील तर तुम्ही निर्माण कराल ती व्यवस्था रूढ होऊं शकेल. "

भरत म्हणाले, " माझा उद्देश तुम्ही विसरलात असं मला वाटतें. श्री वृषभाची समाजव्यवस्था नीट कशी राबवून घ्यावी हाच माझा उद्देश आहे. जनकल्याणकारी राज्य मला निर्माण करतां आले नाही तर मी अयशस्वी ठरेन. सार्वत्रिकाच हित तेंच राजहित इकडे मला दुर्लक्ष करुन चालणार नाहीं. "

प्रसेनजित महामंत्री म्हणाले, " केवळ शहराशहरातून ही व्यवस्था टिकून राहिली आणि खेडोपाडी, वन्यजमाती, दुर्ग—जमाती या जर वेग-वेगळ्या व असंस्कृत राहिल्या तर ही व्यवस्था कोलमडून पडेल. "

त्यानंतर भरताने म्हटले, " सामाजिक संघर्ष टळेल व सर्वांना आपल्या उन्नतीचा मार्ग उघडा राहील अशी व्यवस्था करता येणें अशक्य नाही. मला वाटतें, धर्ममहामंत्रीनी तसे प्रचारक नेमले तर हवी असलेली व्यवस्था आपणांस निर्माण करतां येईल. "

त्यावर प्रसेनजित मंत्री म्हणाले, " तुमची आज्ञा राजे, महाराजे यांनी ऐकावी असे नेहमीच घडणार नाही. त्याचसाठी उत्तर-दक्षिण विजययात्रा करुन सर्वांना अंकित करावे. त्याच्याकडून तुमच्या आज्ञा अम-लांत आणल्या जाव्या. राजे भरतानी राजाधिराज सम्राट भरत व्हावे हाच पहिला उपाय आहे "

इतक्यात शस्त्रास्त्र निर्माण शाळेतील एका दूताने येऊन सांगितलें " हे राजेश्वर, आपल्या पुण्योदयाने सर्व शत्रुविनाशक असें ' चक्र ' आपल्या आयुधशाळेंत निर्माण झालें आहे. त्या चक्राच्या प्रकाशानें सारी प्रयोग शाळा प्रकाशित झाली आहे. त्याच्या फिरण्याच्या आवाजानें कानठळ्या बसत

आहेत. आपण त्याठिकाणी चलावे आणि त्या चक्राचा स्वीकार करावा. "

ही बातमी आणणाऱ्या नोकरास भरताने गळ्यांतील रत्नांचा हार बक्षिस दिला. महामंत्री म्हणाले, " हे राजश्रेष्ठा, आपण धन्य आहांत. आता आपला प्रश्न अगदीच सोपा झाला. आपण चक्राच्या साहाय्याने अखिल भरतखंड आपल्या अंकित करावा. सर्व शत्रूंना ताब्यात आणून मग सर्व कल्याणप्रद असे महाबलिष्ट भरतराज्य स्थापावे "

इतक्यांत दुसऱ्या दूताने येऊन श्री भरताच्या नांवाचा जयजयकार करुन सभेत प्रवेश केला. तो म्हणाला,--

" महाराजाना पितृपद प्राप्त झालें आहे त्यांच्या कुलाला विभूषित करणारा पुत्र जन्मास आलेला आहे ."

या वार्तेने भरताला फारच आनंद झाला. मुलाचे मुख पाहण्यास त्याचं मन उत्कंठित झालें. परंतु एका महाराजास इतका उतावळेपणा शोभणार नाही या कल्पनेने तो आनंद त्यांनी तसा व्यक्त केला नाही. महाराजाच्या आज्ञेने गावांत फार मोठा उत्सव साजरा करण्यांत आला. ऊसाच्या रसांची दुकानें मनुष्यांच्या घोळक्यानी भरुन गेली. रस्त्यावर नृत्य, संगीत यांच्या दृश्यांनी येणाऱ्या जाणाऱ्याचा मार्ग अवरुद्ध झाला. श्री भरतेश्वरावर घरांघरातून पुष्पवृष्टि होऊ लागली.

घरोघरीं वाद्यें वाजू लागलीं. हत्तीवरून साखर वाटण्यांत आली. सुवर्णमुद्रांचे दान मुक्त हस्तानी करण्यात आले. सारे शहर या दोन प्रसंगांनी बेहोप झाले.

महाराज भरतानी मंत्र्याबरोबर जाऊन चक्राची पूजा केली. दिव्य-शक्तीचें प्रतीक म्हणून केवळ चक्रवर्तीलाच प्राप्त होणारे ते चक्र भरताला पाहातांच त्यांच्या भोवती एकाद्या भ्रमरासारखें तीनदा फिरले व मग उजव्याबाजूने येऊन स्थिर झालें.

असले दिव्य शस्त्र कुणाच्याहि पाहण्यांत नव्हतें. प्रत्यक्ष भरतानें मोठ्या कौतुकाने त्याच्याकडे पाहिलें. रत्नमंडित असलेलें ते चक्र स्वत:च्या

तेजानें चकाकत होतें. त्याच्या आवाजानेच शत्रुला कांपरें भरत असे.

भरताच्या आज्ञेनें त्या चक्राने फिरणें थांबविलें. आवाज बंद झाला. एकादा प्रचंड झंझावात थांबल्यानंतर जी शांतता पसरते तशी शांतता पसरली.

० ० ०

त्यानंतर श्री भरत मुलाला पाहण्यास गेले. एका शुभ्र वसनांत गुंडाळून ठेवलेल्या गोंडस मुलाला पाहून भरताला आनंद झाला. जणुं एक लहान राजहंसच जन्माला आला होता. दाईनें तें मूल उचलून भरताच्या हातात दिलें. भरताला आनंद झाला. इवलासे चकचकीत डोळे, काळीभोर जावळ गुबगुबीत गाल, बांधलेल्या मुठी, नवीन जीवनच जणूं भरताच्या हातांत होतें.

श्री वृषभांनी आपणासहि असेंच हृदयाशी धरलें असेल, या भावनेनें त्यांचे डोळे आनंदाश्रूंनी पाणावले. श्री वृषभाच्या आठवणी एवढें सौख्यदायक भरताला कांहीच नव्हतें. त्याच्या जीवनातील क्षण न् क्षण वृषभ महर्षींच्या देखरेखीखाली फुलला होता, बहरला होता.

भरताने त्या बालकाच्या कपोलाचें चुंबन घेतले. तें पाहून पत्नीला फार आनंद झाला. आपल्या स्त्री जन्माचे सार्थक झालें असें तिला वाटलें. पुत्र—जन्म आणि पतीचें प्रेम या दोन गोष्टी म्हणजेच स्त्रीचें सौभाग्य. या दोन्ही गोष्टी तिला मिळाल्या होत्या.

० ० ०

भरताच्या जगण्याची रीतच वेगळी. सामान्य माणसाप्रमाणें जगणं त्याला जणु माहितच नव्हते. दिव्य प्रज्ञेचा अंकुर त्याच्या हृदयांत फुलला होता. राज्यसंचलना व्यतिरिक्त त्याचे एक व्यक्तिगत होतें. त्या जीवनाशी तो अत्यंत प्रामाणिक होता

पित्याच्या कर्तृत्वानें ऐहिक अमाप ऐश्वर्य त्याच्या पायाशी लोळण घेत होतें. सहस्त्रावधि राजांनी आपआपली सत्ता श्री भरताच्या हातीं सोपविली होती. शेकडो घराण्यातील सुंदर सुंदर मुलींशी विवाह करून भरताने आपुलकीचे नाते जोडले होतें अहोरात्र सुखाचा वर्षाव होत असता चिखलांतून उगम पावणाऱ्या व पाण्यात राहून अलिप्त असणाऱ्या कमला-प्रमाणें भरताचें मन हें शांत होते. कसलीहि चिंता, द्वंद्व, काळजी त्याला शिवत नव्हती निर्लेप राहाणाऱ्या आकाशा प्रमाणे त्याचे मन निर्मल होतें. सुखात हुरळून न जाणारें, वैभवाने अहंकाराचा लेप न चढलेले, ऐश्वर्यानें उन्मत्त न होणारे अतिमानवी मन त्याला लाभले होते.

शारिरिक, मानसिक व बौद्धिक गुणाचा त्रिवेणी संगम त्यांच्या ठिकाणी झाला होता. त्याच्या संबधानें ऋषिलोक सांगत की,–भरत गाढ झोपेंत असला तरी आर्तरक्षणासाठी आलेल्या हाकेला त्याचा आत्मा जागृत होई. जीवनांतील असामान्य सौख्याची विपुल सामुग्री प्राप्त झाली असता 'हें माझें' असा विकल्पहि त्याच्या मनात निर्माण होत नसे.

अशा प्रकारचे परमसौख्यकारी राज्य संचालनांत दिवस जात असतां केवळ पुण्यानें मिळालेल्या चक्रासाठी त्याला विजयासाठी बाहेर पडावें लागले. त्याला हें माहित होतें की जियें जिंकण्याची भावना आहे तिथेंच 'जिता' ची भावना निर्माण होते जेते आणि जित, गुलाम आणि स्वामि या शब्दानीच अनेक राष्ट्रें उदयास आली आणि पृथ्वीच्या पोटात गडप झाली. सम्राट होण्याची मनीषा, चक्रवर्तित्व हे शब्द मुळी युद्धाला आमंत्रण देणारे आहेत.

या विचाराने क्षणभर युद्धाची कल्पना टाळावी, पुण्याईच्या बळावर प्राप्त झालेले 'चक्र' केवळ पूजेचेच साधन व्हावे, असे त्या पराक्रमी राजाला वाटलें. परंतु मानवी इच्छांचें नियंत्रण केवळ मानव स्वतःच करू

शकतो, असे नाहीं. कधीही न घडणारे प्रसंग इतिहासात घडतात.

सर्वांत वृद्ध असलेल्या प्रसेनजित नावाच्या मंत्र्याने भरताच्या मनांत निर्माण झालेला हा संभ्रम तोडला. तो म्हणाला,

" महाराज, मी जे बोलतो त्याची क्षमा करावी. या पृथ्वीवर क्षत्रियांनी शासन करावें असा जो सिद्धांत पितामह श्री वृषभांनी घालून दिला त्याच्या मुळाशी केवळ ' उपभोगा ' ची भावना नाहीं. व्यक्तिगत कर्तव्यापेक्षाही आयुष्याचा कांहीं भाग सामाजिक कर्तव्याकडे, ऐहिक लोके-पणा व सवंग लोकप्रियतेला न कवटाळता, खर्च करावा असा श्री प्रभूंचा आशय होता. मातेने मातृत्वाच्या जबाबदारीचें जसें काटेकोरपणें पालन करावे हे जितकें खरे तितकेंच राजाने राजकीय जबाबदारीचें पालन करावें हेही खरें. राज्यसुख हें दुय्यम आहे. श्री भरतांनी आता वेळ न दवडता षट्खंड पृथ्वी जिंकण्याचा मनोदय प्रकट करावा व आम्हांस त्या प्रमाणें आदेश करावा. "

# वि ज य — या त्रा

शरद् ऋतूच्या प्रारंभी विजययात्रेच्या प्रस्थानाचा मुहूर्त ठरला. वर्षाकालातील दुथडी भरून वाहाणाऱ्या नदीचा प्रवाह विरहिणी स्त्री प्रमाणें कृश झाला होता. विविध रंगांच्या फुलांचे ताटवे सर्वत्र फुललेले पाहून जणु पृथ्वी त्यांच्या तर्फे आपला आनंद प्रदर्शित करीत होती.

वनांत गाई स्वच्छंदपणें चरत होत्या उन्मत्त झालेले बैल मातीच्या उचवट्यालाच प्रतिस्पर्धी समजून त्याच्याशी टक्कर घेत होते. साळीचीं शेतें पिकत आल्यामुळें त्याचा वर्ण तापविलेल्या सुवर्णाप्रमाणे दिसत होता. सहस्त्रावधि पक्षी त्या साळीच्या शेतांतून धान्याच्या लोंबी चोचीत धरून इतस्ततः फिरत होते.

अशाच एका शारदीय सुप्रभातीं नगाऱ्याचा आवाज सुरू झाला. त्या आवाजाने अयोध्यापुरी जागृत झाली. राजप्रासादा समोरील प्रशस्त मैदानावर सैनिकाच्या झुंडी जमा होऊं लागल्या. तांबडे–पिवळे पट्टे असलेले

त्यांचे कपडे फारच सुशोभित दिसत होते. शिरस्त्राणानी त्यांची डोकी झांकलेली होती. भाला, ढाल, आणि तरवार यांनी पायदळांतील प्रत्येक शिपाई एखाद्या कर्दनकाळासारखा दिसत होता त्यांच्या खांद्यावर बैलाचें चिन्ह चित्रित केलें होतें शिरस्त्राणाच्या समोरील भागावरही तेंच चिन्ह कोरलेलें होतें.

डाव्या बाजूस रथाचा प्रचंड जथ्या उभा होता. घोडयाच्या खुरानी उडालेली धूळ सर्वत्र पसरली होती. त्याचें खिकाळणे ऐकूनहि शत्रूला भीति वाटावी !

त्यांच्या मागे हत्तींचा प्रचड मेळावा होता. तांबडया वस्त्रांनी त्यांची पाठ सुशोभित केली होती. हत्तीच्या गडस्थळावर बैलाचें चित्र असलेलें वस्त्र झांकण्यांत आले होते. आपले प्रचंड कान हलवून ते जणु कुणास तरी आवाहन करीत होते. एकाहून एक शूर राजे, महाराजे अंबारीत बसून होते. त्यांच्याकडे पाहिलें असता ते सर्व यमाचे वडील बधूच या ठिकाणी गोळा झालेले आहेत असें वाटे.

सर्व सैन्य आपआपल्या वेगवेगळया अधिपतीच्या आज्ञेत उभें होतें इतक्यांत महासेनापतीचे आगमन झाले. त्यांच्या आगमनाबरोबर हत्तीनी सहस्त्र सोंडा वर उचलून त्याचें अभिनदन केलें. घोडयानी समोरील दोन पाय उचलून त्यांना अभिवादन केले

प्रचंड शारिरिक बळाचा तो सेनापति एखाद्या महाकाय हत्तीसारखा दिसत होता. त्याचे डोळे विशाल असून मर्मस्पर्शी होते. वृक्षाच्या शाखेप्रमाणे त्याचे बाहु प्रचड होते.

त्यानंतर पुन: नगाऱ्यांचा आवाज सुरू झाला. राजवाडयाच्या शोभि-वंत प्रवेशदारावर श्री भरताचें आगमन झाले. किंचित पीत वस्त्रानी त्याचे शरीर आवृत होतें. मंदस्मिताने त्याच्या दातांची कांति त्याच्या चेहऱ्यावर पसरली होती. कमरेस घातलेला रत्नजडित पट्टा आणि त्यास लटकावलेली अजस्त्र तरवार पाहून चांगल्या चांगल्या महारथीच्या हृदयानहि थर-कांप झाला.

मार्गाच्या दोन्ही बाजूस अनेक अर्धनग्न युवती मेघाडंबरी घेऊन उभ्या होत्या. कोणी पंख्यांनी हवा करीत होत्या. काही पुष्प व अक्षतांचा वर्षाव करीत होत्या.

श्री भरतांची दिव्य मूर्ति प्रवेशद्वारावर येतांच मान्यांनी त्यांचा जय-जयकार केला त्यांनी त्या अभिवादनाचा केवळ स्मित करून स्वीकार केला.

सर्वत्र शांतता पसरली. श्री भरत म्हणाले, " थोड्याच वेळात प्रस्थान होईल. सर्व सैनिकांनी हे लक्षात ठेवावे की क्षत्रिय धर्माला कलंक लागेल असे कोणतेही कृत्य त्यांच्याकडून घडू नये. युद्धात जय आणि पराजय केवळ याच गोष्टींना महत्व नाही. क्षत्रियाचे शील राखून देह अर्पण करणे व प्रसंगी पराभव पत्करणे हे श्रेयस्कर आहे परन्तु धर्मबाह्य वागून विजय मिळविणे हें तुमच्या स्वामीला पसंत नाही. कलंकित यशापेक्षा निष्कलंक व धर्मा-धिष्ठित अपयश देखील मला चालेल सर्वांनी हात वर करून स्वामिनिष्ठेची व खऱ्या क्षत्रिय धर्मनिष्ठेची शपथ घ्यावी. "

क्षणात लक्षावधि हात वर झाले. जणु विजयश्रीच्या पताकाच उंच झाल्या होत्या. जणु महा-मंगल यशाच अंकुरित झाले होते.

त्यानंतर चक्ररत्नांकित रथावर श्री भरत आरूढ झाले. त्यांचा सारथी विवेक बैलाचे चित्र काढलेला रेशमी. पीत ध्वज डौलाने फडकत होता. चक्राचा प्रकाश सर्वत्र पसरला होता ते सैनिक जणु यशोमार्गाचे वाटाड्ये आहेत असे दिसत होते.

माता यशस्वती निरोप द्यावयास बाहेर आली होती तिनें भरताला डोळे भरून पाहिले त्याच्या कपाळाचे चुंबन तिने घेतले जणु विजयाचे पहिले चिन्ह तिनेच त्याच्या कपाळावर अंकित केले. तेच तिचे चुंबन त्या पुत्राला दिगंत कीर्ति मिळवून देणारे ठरणार होते. पाठीची सावली होऊन सुख-दुःखात सहभागी होणार होते.

भरताने आईचा आशीर्वाद घेतला, तिच्या चरणाची धूळ मस्तकाला लावून तो आईला म्हणाला, " माझ्या गैरहजेरीत तूच आता या अयोध्येची संरक्षिका. मी येईपर्यंत कष्टी होऊं नकोस. माझ्याकडून धर्मदोचित पराक्रम होऊ दे, येवढाच आशीर्वाद मला दे ! "

आईच्या डोळ्यांतून आसवें गळतांना भरताने पाहिलें. त्या मंगल अश्रूजलाला स्पर्श करून त्यानें ते अश्रू आपल्या कपाळास लावले. आईच्या अश्रूतील मांगल्य ज्याला कळतें तोच खरा पुत्र असेंच जणु भरताला सुचवावयाचें होतें.

आईचा निरोप घेऊन भरताने सर्व सैन्यासह कूच केलं. सहस्रावधि घोड्यांच्या टापानी आकाशमंडळ दणाणून गेलें. भरताचा रथ वायूवेगाने पुढे पुढें धावू लागला. धुळीला पाय लागून ते घाण होऊं नयेत म्हणून जणुं घोड्यांनी त्या भूमीला स्पर्शच करूं नये असें ठरविलें हुतें की काय न कळे !

रात्री मुक्काम आणि दिवसा प्रवास अशी मजल मारीत तें सैन्य अनेक अरण्यें, नद्या ओलांडीत पुढें जात होतें. गंगेच्याकांठानें जाणारें तें सैन्य पाहून पाण्यातील मगर-मच्छानाहि भीति वाटे. त्या सैन्याच्या पडछाया पाण्यावर पडून मूळचें पांढरें पाणी यमुनेच्या पाण्यासारखें काळेशार झालें होतें.

मुक्कामाच्या वेळी सर्वत्र एकच गोंधळ उडे. जो तो आपआपली सोय पाहण्यात गर्क असे. रात्रीच्या वेळी मनोरंजनासाठीं मुद्दाम आणलेल्या नर्तिकांचे नृत्य पाहण्यांत, विविध कलाकारांच्या कलानर्तनांत रंगून जाण्यात

भरताच्या मनाला उत्साहाचे भरते येई. त्याच्या जीवनाला उजाळा मिळे. शहरी जीवनात उद्‌भवणारी कृत्रिमता तिथे नव्हती. आचारा–विचारात अत्यत सरलता व प्रामाणिकता दिसून येई श्री वृषभांनी निर्माण केलेल्या शेतकी उद्योगाचा सर्वत्र विकास झालेला पाहून भरताला उचंबळून येई. नागरातील काही दोष भरत त्या शेतकऱ्याच्या नजरेस आणून देई. नवीन कुटिर उद्यो–गाचे शिक्षण स्वत: भरत त्याना देई. अशा कार्यात वेळ कसा निघून जाई हें श्री भरताच्या लक्षातहि येत नसे.

० ० ०

अशारीतीने प्रवास करतां करता ते सैन्य पूर्व–समुद्र किनाऱ्याला आले. समुद्राचे दर्शन त्या सैनिकाना आयुष्यात पहिल्यादाच घडलें होतें. समुद्राकाठी सैन्याने तळ ठोकला. श्री भरताने प्रवासाचा शीण घालविण्या–साठी समुद्रस्नान करण्याचे योजिले. गर्जना करणाऱ्या त्या उन्मत्त समुद्रात श्री भरताने उडी ठोकली. सर्व सैनिक त्यांच्याकडे पहात होते. समुद्राच्या लाटावर पोहत पोहत भरतानी अनेक प्रकारें जलक्रीडा केली.

त्याच्या मागोमाग ज्या वीर, रथीमहारथींना पोहण्याचा सराव होता त्यानींहि उड्या ठोकल्या व भरताच्या उत्साहाला साथ दिली त्यातील काही लाटाच्या पाण्याने घाबरून गेले होते. त्याना श्री भरताने काठावर आणून सोडले. नाकातोंडात पाणी गेल्यामुळें जे घावरले होते त्याच्याकडे पाहून इतर सैनिक हसत होते.

श्री भरताची जलक्रीडा एखाद्या मदोन्मत्त हत्तीच्या जलक्रीडेप्रमाणे वाटत होती. दोन्ही बाहूनी लाटांना कवटाळीत ते योजनभर पोहत जात. उत्ताणें होऊन केवळ श्वासक्रियेनें तितक्याच वेगाने ते पोहत परत येत.

जलक्रीडेंत भरतबंधु बाहुबली अत्यंत निपुण होते. त्याची आठवण यावेळी तीव्रतेने होत होती. स्नान झाल्यावर वाळूवर सर्व राजेमहाराजे उन्हाचा आस्वाद घेत बसले होते.

श्री भरताबरोबर विनोदाचें बोलणे करणारे ही मित्र होते. सर्वांशी खेळीमेळीने वागतांनाही आपल्या वैशिष्ठ्यपूर्ण वाणीने ते ओळखू येत. त्यांच्या मिठ्ठास बोलण्यातील लाघवाने कुणास कितीहि राग आला, तरी तो पार निघून जाई.

दुपारी जेवण वगैरे झाले. भरताच्या आहारात सात्विकता होती. पण तो आहार पचविण्यास लागणारे सामर्थ्य केवळ भरतातच होतें. या विषयाची सहज चर्चा होत असें. तेव्हां एकजण म्हणाला, ' अस असतं तरी काय भर-ताच्या जेवणात की जें पचावयास साधारण माणसास जड जावे ? '

दुसरा म्हणाला, " प्रत्यक्ष परीक्षा घेतल्याशिवाय थोर पुरुषाचा आहार काय तोलाचा असेल हें सागणे कठीण ! "

या संबधींचं कुतुहल दूर व्हावं म्हणून जेवण्याच्या वेळी श्रीभरतांना हा प्रश्न कुणीतरी सुचविला.

भरत म्हणाले, " फरक काय आहे हें मलाही कळत नाही. पण तुम्ही लोक कुतुहलाने या प्रश्नाचा विचारच करीत आहांत तर माझ्या ताटातील काही जिन्नस तुम्ही खा ..... "

भरताने आपल्या दुधाच्या वाटीतील दूध एका शक्तिमान व महा-पराक्रमी सरदाराला वाढले, व विचारलें--

" आपणासर्वांत तुम्ही याना शक्तिमान समजता ना ? "

" होय ! " सर्वांनी होकार दिला.

जेवणास सुरूवात झाली. अर्ध्या मणाचा जेवणारा तो पराक्रमी पुरुष दुधाच्या एका घोटांतच पोट भरलें म्हणून थंड झाला.

" पुरे, पुरे... मला काही वाढूं नका, " तो म्हणाला, " पोट अगदी आकंठ जेवल्यासारखें भरलें आहे. "

सर्वांच्या थट्टेचा तो विषय होऊन बसला.दोन–तीन दिवस उपवास करूनहि त्याचें अपचन कमी झाले नाहीं. इतका मकस आहार प्रभूंचा होता. त्या आहाराचेच फळ म्हणून दिव्य देहाचें स्वामित्व त्याना प्राप्त झालें होतें.

तेव्हा याचें गुपित तरी काय हे श्रीभरताच्या आचाऱ्यालाच विचारावें असे सर्वांनी ठरविले.

एके दिवशी आचाऱ्याला गाठून त्यानी विचारले, " प्रभूच्या दुधाची गाय आणि आमच्या दुधाची गाय काय वेगवेगळी आहे ?

त्यावर आचारी म्हणाला, ' त्याच्या गाईचे दूध हे पृथ्वीतलावरील ' *अमृत* ' आहे. पण ते *पचविण्याचे सामर्थ्य मात्र हावे.* ज्या पन्नास गाई आपल्या वगोवर आहेत त्यातील पहिलीचे दूध दुसरीला, दुसरीचे तिसरीला, अशा रीतीने ४९ गाईचें पन्नासाव्या गाईला दूध पाजावे. ४९ गाईच्या केवळ दुधावर पोसल्या जाणाऱ्या कामधेनूचें दूधच श्रीभरताना देण्यांत येते तीच गोष्ट त्याच्या चपात्याची एक मण गहूना भिजत घालून त्याचे सत्य काढावयाचे व त्या सत्वाचेही महासत्व काढावयाचे व ते पीठ अमृतवल्लीच्या रसाने भिजवून चपात्या तयार केल्या जातात. "

श्रीभरतांच्या आहाराची कल्पना आपणांस इतक्या उशीरा का होईना आली याचा त्याना आनंद झाला.

श्री भरताच्या देहाचें अलौकित्व वर्णन करावयास शब्दकोशांतील शब्द अपुरे आहेत असे शब्दब्रम्हाच्या ईश्वरानेही नमूद करून ठेवलें आहे.

• • •

दुसरें दिवशी सकाळी सूर्योदयानंतर तीन घटकानी भरतांनी रथ तयार करण्याची आज्ञा केली. त्यावर यावेळी सारथी नव्हता. घकालाहि विराम देण्यात आला होता. त्यावर स्वत. एकटेच श्रीभरत आरूढ झाले. आकाशगने

वाकडा असलेला धनुष्य जणु वक्रलोकाच्या निर्दालना मुळेच वाकडा झाला होता. समुद्रावर सूर्याचें तेज विलसत होतें की भरताचें, हे सांगणाऱ्याच्या मनात क्षणभर विभ्रम निर्माण होई.

त्यानंतर ते सर्वांना उद्देशून म्हणाले, " माझ्या बहाद्दुरानों, या समुद्राच्या देवतेने येऊन आमचा सन्मान करावयास हवा होता परंतु असे घडलें नाही. या गोष्टीचा अर्थ केवळ उघड आहे माझ्या शत्रुघ्न नावाच्या दिव्य बाणास मी समुद्राच्या तळाशी निवास करणाऱ्या देवाकडे केवळ निरोप म्हणून धाडणार आहे मी परत येईपर्यंत आपण सर्वांनी इथेंच रहावे. "

असे म्हणून भरताधीशांनी रथाचा लगाम हाती घेतला. पुष्पमंडित धनुष्य सांभाळलें आणि मंत्रोच्चार केला.

क्षणांत प्रभुचा दिव्यरथ महासागरावरून धावूं लागला. सागरावरील लाटा थांबल्या. एकाएकी पाण्यावरील पातळपणा कमी झाला जणु शेकडों योजने बर्फच पसरला आहे असा भास निर्माण झाला रथांच्या चाकाने बर्फाचें कण दोहोंबाजूस उडत होते अशी भरतांच्या त्या दिव्यगमनाचे सर्वांना कौतुक वाटलें.

रथ दहा योजने गेल्यावर त्यांनी धनुष्याच्या दोरीला बाण लावला आणि पुनः मंत्रोच्चार करून त्यांनी तो बाण समुद्राच्या तळाकडे सोडला. प्रचंड आवाज करीत तो बाण पाण्याच्या धारेला कापीत खोल खोल जाऊ लागला. समुद्रांतील मोठमोठे मासे, मगरी, पाणघोडे धावरून इतस्ततः फिरूं लागले. त्यांच्या शांत जीवनात असा उल्कापात त्यांनी पाहिला नव्हता

समुद्रदेवाची सभा भरलेली होती अनेक मत्स्यकन्यका नृत्य करून त्याना संतुष्ट करीत होत्या. नृत्य रंगात आले होतें तो देव मदोन्मत्त होऊन रंगविलासात बेहोश झाला होता. शेकडों मत्स्यकन्यकांचे मोहक हावभाव व कटाक्ष यांनी त्याचें चित्त विद्ध झालें होतें.

अशा नेमक्यावेळी तो बाण त्याच्या समोर पायाशी येऊन पडला तो रागाने संतापला. रंगाचा भंग करणाऱ्या त्या उद्दट माणसाशी दोन हात

करावयास त्याचे बाहू फुरफुरू लागले. तो इतर देवाना म्हणाला, " त्या बाणाचे तुकडे तुकडे करा. माझ्या क्रोधाला तमलेंच जळण पुरे आहे. कोणी तरी उन्मत्त मनुष्य धनाच्या लोभाने मला जिंकू पाहतो तुम्ही सारे युद्धास तयार व्हा. "

त्याचा क्रोध पाहून सभेतील एका देवाने तो बाण हाती घेतला. त्यावर श्रीभरताचें नांव स्पष्टपणे कोरलें होतें

तो समुद्रदेवास म्हणाला, " आपण असा क्रोध करू नये. क्रोधाने अनेक राजे, महाराजे निखाऱ्याप्रमाणे स्वतःच जळून राख झाले आहेत. चक्रवर्तीची सेवा करून त्यांच्या कार्यांत मदत करण्याचें श्रेय आपण घ्यावे हेंच उचित होय. पराक्रम प्रदर्शनाची ही वेळ नाही ज्यावेळी शरण आणि मरण यातून निवड करावयाची असेल त्यावेळीं शरण जाणें हाच उपाय असतो.

हें ऐकल्यावर तो देव शांत झाला. कुलक्षयाचें पाप पदरी घेण्यापेक्षां चक्रवर्तीचें सेवकत्व स्वीकारणें चांगले असा मनाशी निर्णय करून त्यानें सर्व-देवासह श्रीभरताची भेट घेतली. विविध रत्नानी, आभूषणांनी त्याना संतुष्ट केले. श्रीभरताच्या इच्छेप्रमाणें दक्षिणलवणसमुद्रांतील सर्व द्वीपातील राजाना प्रभूचे अंकित व्हावयास भाग पाडले.

नंतर श्रीभरतांनी रथ वळविला व ते समुद्रकाठाशी आले. समुद्र-देवाने सर्व सैन्याला पुरेल अशी शस्त्रसामुग्री, खाद्यपेय, वस्त्रें व अलंकार भेटी दाखल दिले.

श्रीभरतराजाचा फार मोठा सत्कार करण्यात आला.

• • •

/ अशाप्रकारें भरतेश्वराच्या पराक्रमानें मद्र, कच्छ, चेदि, वत्स, सुह्म, पुण्ड्र, ओड्र आणि गौड या देशातील राजानी केवळ निरोप मिळताच आप-आपली राज्यें त्याच्या स्वाधीन केली. व निरोपाबरोबर फार मोठाल्या देणग्या पाठवून त्याना संतुष्ट केलें. त्यांचे हे मनाचें औदार्य पाहून भरताने आपलें माडलिक म्हणून नेमले व त्याचा सत्कार केला.

त्यानतर भरताने सेनेचे वेगवेगळे विभाग करून काही काही देशभाग जिंकून ते साम्राज्याला जोडून घेण्याची आज्ञा विभागीय सेनापतींना दिली.

त्याप्रमाणे महाकाल नावाचा सेनापती दक्षिण आर्यखंड जिंकण्यास निघाला; प्रसेन जिताने मध्य आर्यखड जिंकण्याचा विडा उचलला, महाग्रीव नांवाच्या सेनापतीचे हत्ती अग, वग, मगध, काशी, कोशल, ' कालिंद, काल-कूट व भिल्लाचे प्रदेश तुडवित निघाले

श्रीभरताने पूर्वेकडील सैरश्चिक, वैडूर्य, परियात्र, गदा, ऋक्षवान इत्यादि पर्वतवासीयाची राज्यें आपल्या छत्राखाली आणली एके दिवशी त्यांची सेना अगिरेयिक पर्वताच्या .पायथ्याशी आली. सैन्याने तबू ठोकले होते. इतक्यात तेथील वन्य जमातींनी येऊन श्रीभरताना नमस्कार केला. ते म्हणाले, " महाराज, आपल्या सैन्याचें येथें थाबणे ठीक नाही. आजराशी हा अंगिरेयिक पर्वत आपल्या पोटातील भयानक तप्तरस तुमच्या सैन्याच्या अगावर ओतील.

महाराज भरताला या गोष्टीचें मोठें कौतुक वाटलें. ते म्हणाले, " तुम्ही घाबरू नका. या पर्वताला जिंकण्याचे सामर्थ्य आमच्या अगी आहे."

त्यानतर त्या जगलवासीयाना विविध रत्ने देऊन महाराजानी वश करून घेतले.

मग काही खास सेनापती घेऊन श्रीभरत त्या पर्वताच्या मुखाशी गेले. अग्नीरसाचा वर्षाव सतत केल्यामुळे त्या पर्वताचे तोंड अगदी काळे पडलें होते. पोटांतील विविध धातूचा रस सतत बाहेर फेकला गेल्यामुळें डोंगराची चकाकी फारच वाढली होती. गेली हजारों वर्षे तो ज्वालामुखी असाच गर्जत होता, असें त्याना लोकांकडून कळालें.

श्री भरताने तांब्याभर पाणी घेऊन तें मंत्रित केलें. नंतर ते पाणी त्यानें ज्वालामुखीच्या तोंडांत ओतलें.

त्या सरशी त्या ज्वालामुखीचा रक्षक देव संतापून बाहेर पडला. आपल्या घरी येऊन आपलाच उपमर्द करणारा हा उद्धट माणूस कोण आहे, हें पाहण्यासाठी तो बाहेर पडला परंतु श्रीभरताची भव्य, शांत मुद्रा पाहताच तो शांत झाला. त्यानें त्याची क्षमा मागितली व आजन्म सेवक म्हणून स्वीकार करण्याचा आग्रह केला

भरतराजानें त्याची विनंती मान्य केली व स्वतःला त्यास त्या विभागातील प्रमुख संरक्षक म्हणून नेमले.

० ● ०

•

अशा प्रकारें पूर्वेकडील असंख्य राज्यें आपल्या छत्राखाली आणल्यावर भरतराजाचा मोर्चा दक्षिणेतील राज्यें जिंकण्यासाठी वळला.

दक्षिणेकडे जाताना मात्र भरताच्या सेनेला फार कष्ट घ्यावे लागले चेदि नावाच्या पर्वताच्या रक्षकाने डोंगराळ रस्त्यावर अनेक विघ्ने निर्माण केली. पर्वताना सुरुंग लावून मोठमोठाल्या दगडाचा वर्षाव करावयास सुरुवात केली अनेक प्रकारे सांगूनहि चेदि पर्वताचा रक्षक वश होईना तेंव्हा त्याचा पाडाव करून चेदि पर्वताचा पाडाव करण्यात आला. या पर्वताच्या पाडावाची बातमी दक्षिणेंत विजेसारखी पसरली. त्यामुळें इतर गिरीजनानी भरताचा विरोध करण्याचें सोडून दिले इतकेच नव्हे तर श्रीभरताचें सैन्य राज्यांत शिरण्यापूर्वींच शरण आल्याचे पत्र व त्याच्या बरोबर भरपूर खंडणीहि ते पाठवून देत.

यांतील अंतस्थ हेतू न कळण्याइतके श्रीभरत अजाण नव्हते. केवळ

मांडलिकत्व स्वीकारणे व नजराणा देणें या दोन गोष्टीपेक्षां त्या राजाचे खरेंखुरें प्रेम व सहकार्य भरताला हवें होतें.

चोल, पाण्ड्य आणि केरल या समुद्रतटवर्ती राजाना त्यानें प्रेमाने वश केले.

त्यांना भरत म्हणाले, " तुम्ही भाग्यवान आहांत. कारण समुद्र तुमच्या देशांचें दररोज पाय धुतो. तुम्ही मांडलिकत्व स्वीकारताना समुद्रासारखे हृदय धारण केलें आहे. "

असे म्हणून हजारो हत्ती, रथ, शस्त्रास्त्रें, रत्न–हिरे–माणकें यांचे दान देऊन त्या तीन्ही राजाचा भरताने सत्कार केला.

असें होतें भरतराजाचें मन ! फुलासारखें उत्साही, हसरें आणि इतरांनाहि हसरे बनविणारें. जीवनांतील महत्वाचा अंश म्हणजे मानव्याविषयीचा त्याचा सद्भाव. कर्तव्याच्या पोटी क्रूरता उद्भवल्यासारखी दिसते पण त्यात हितबुद्धीच अधिक. कराचें ओझें तितकेंच जसें पिठांत मीठ ! वर्गकलहाचा उदय होण्यास सवडच असू नये असा श्रीभरताचा कल. प्रत्येक मनुष्य म्हणजे परस्परांचा आधार ! ते नेहमी म्हणत, " समाज शरीरासारखा आहे. त्याचा डावा हात जितका खुलून दिसतो तितकाच उजवा हातही खुलून दिसतो ! त्या हातांत स्पर्धा नसते. " समष्टि–सौंदर्याचें त्याचें एक वेगळेच तत्वज्ञान होतें. एखादी वस्तु सुंदर दिसते ती समष्टिरूपात ! हे समष्टि–सौंदर्य टिकून राहावें यासाठीच त्यांची धडपड असे. एका व्यक्तीचा उद्धार करणारें तत्वज्ञान त्यांच्या जवळ नसे. सामुदायिकरीत्या समाजाची पातळी उंचावणारे, कांहीसा श्रद्धाळु, कांहीसा ध्येयप्रवण, कांहीसा व्यवहार–प्रिय असा समाज त्याना हवा होता. त्या स्वप्नात ते मग्न असत.

० ० ०

त्यानंतर पश्चिम किनाऱ्याचा प्रदेश जिंकत श्रीभरतानी, सौराष्ट्र, पश्चिम कौशल, सिंधु प्रदेश जिंकून घेतले. सिंधु नद ओलांडून नदीपलीकडील अनेक म्लेच्छ देश जिंकून घेतले. म्लेच्छ राजानी चक्ररत्नाचा केवळ आवाज ऐकून आपला पराभव जाहीर करणारे पांढरे निशान उभे केले. श्रीभरताने त्या म्लेच्छ राजांनी दिलेली खंडणी घेतली शरण आलेल्याना अभय दिले. जे शरण आले नाहीत त्याचा उच्छेद केला.

अशारीतीने जगविजेती सेना घेऊन भरत हिमवान पर्वताच्या पायथ्याशी आले इतर सैनिकाना थंडीचा त्रास होऊं नये म्हणून अग्निबाणानी उष्णता निर्माण करण्यात आली सैनिकाना हायसें वाटलें.

इतक्या कडाक्याच्या थंडीतही भरतेश शांत होते त्याना कसलाही त्रास होत नव्हता. हिमवान पर्वताच्या उत्तुंग शिखराची धवलानुपमा पाहून हृदय हर्षित झालें होतें. दिक्कालाची मर्यादा सोडून ते उन्मत्त मुळके " वर्धमान व्हा " असा उद्घोषच जणु अंगुली निर्देशाने करीत होते. हिमाच्छादित उत्तुंगपर्वत श्रेणी जणु पृथ्वीची मेखलाच असून श्रीभरत हा मेखलेतील दैदिप्यमान मणीच–होय असा भास होत होता. झुळझुळ करीत वाहाणारे हिमशीत निर्झर वेगाने खाली येत होते. प्रभूच्या भेटीस अंतरू नये अशी घाई त्याना झाली असावी.

पायथ्याशी पसरलेल्या विविध वृक्षलताचा हिरवा पेहराव पाहून अर्धवस्त्रांकित त्रैलोक्यसुंदरी जणु सूर्य स्नानासाठी सिद्ध झाली होती युद्धाच्या दगदगीने मन थोडेसे क्रूर, थोडेसे त्रस्त, थोडेसे हैराण होतेच. तो सर्व शीण, क्रौर्य, सत्रस्तता हिमवान पर्वताच्या धवल शिखरानी हिरावून घेतला होता. मन मागल्याचे वस्त्र लेवून अवनितलावरील दिव्य सुखशांतीच्या बिछान्यावर पहुडले होते.

भरताने मनाशीच विचार केला, " शहरी संस्कृति निर्माण करून शेवटी कांही साधले जाईल का ? की निसर्ग दुरावला, आरोग्य अंतरले, प्रेम व सहकार्याचे सत्यरूप अंतर्धान पावले, आणि उरले ते पाशवी सामर्थ्य व पशुसदृश जीवन, असें घडेल !

घडणारे जरी अगोदर कळाले तरी त्याला थांबविण्याचे सामर्थ्य मानवी कर्तृत्वात अजून नाही हेंच खरें !

० ० ०

हिमवान पर्वताच्या शोभेला उपमा नव्हती. सारेच अनुपम, अद्वितीय आणि वर्णनातीत ! विविध पशु–पक्षांनी भरलेल्या त्या वनात सैन्य शिरताच एकच कोलाहल माजला होता. कोल्हयांनी ओरडून ओरडून अक्षरशः सारं वन डोक्यावर घेतलें होतें. सिंहानी गुहेतूनच केवळ डोळे उघडून त्या सैन्याचें स्वागत केले होते. चित्ते, लांडगे, तरस, अस्वल या हिंस्त्रजातीच्या जंगली पशूंनी सुरुवातीस सैन्यातील हत्तींना, घोड्यांना व उंटानां त्रास देण्याचा प्रयत्न केला. पण हत्तींच्या सोंडा पाहून त्या सर्वांनी जणु वैरभाव टाकून दिला व ते दिसेनासे झाले.

लक्षावधि सैनिकाचे थवेच्याथवे सर्वत्र पसरल्यामुळें वनाचे स्वरूप नष्ट झालें. रात्रभर विश्रांती घेतल्यावर भल्या पहाटे गंधर्व–किन्नरांच्या मधुर आवाजानें सारे जंगल नादमय झाले होते. सूर्याची किरणें अद्याप त्या हिम–वान पर्वतावर पडलेली नव्हती. नव्या तेजानें बहरलेल्या वनलता वाऱ्याबरो-बर शेवटचे हितगुज करण्यांत गुंतल्या होत्या.

इतका मधुर आवाज कसला म्हणून सारे लोक चकित झाले. हें वन म्हणजे माया नगरी तर नव्हे ना ! थोड्याच वेळांत त्यांचा हा संशय फिटला.

हिमवान पर्वताचा रक्षक-देव पिवळी वस्त्रे नेसून आकाशातून खाली येत होता. त्याचे हजारो मित्रही विविध रंगाच्या रेशमी छटा असलेली वस्त्रें नेसून असल्यामुळें शेकडों इंद्रधनुष्य एकाच वेळी आकाशात दिसत असल्याचा भास झाला

विश्व जातीच्या रेशमाहून मऊ असलेल्या गवतावर भरतेश आपल्या राहुटीत झोपले होते. गंधर्वांच्या मधुर स्वरांनी ते जागृत झाले त्या देवाने पाच प्रकारच्या पांढऱ्या फुलांचा त्यांच्यावर वर्षाव केला. त्या पुष्पवृष्टीने सारे वातावरण सुरभित झाले

इतक्या प्रभाती, अशा सुंदर व्यक्तीस पाहून भरताच्या चेहऱ्यावर आनंदाची झांक पसरली. चमकदार दातांना स्पर्शून आलेले त्यांचे स्मित म्हणजे वसंतागमनाची सुचना देणाऱ्या कोकिळाचे स्वरच !

" या. तुमच्या सर्वांचें स्वागत असो, " भरतेशाने मोठ्या आदराने त्यांना बसावयास सांगितले.

*हिमावन-पर्वताचा रक्षक देव म्हणाला, " प्रभूच्या आगमनाची वार्ता* आम्हांस उशीरा कळाली असे नाही. पण आपणास पूर्ण विश्रांती दिल्यावरच भेटावें असा आमचा मनोदय होता. मी या पर्वताचा रक्षक-देव आहे. आपण चक्रवर्ती होणार हें आम्हास इंद्राकडून कळाले होते. आपले ऐश्वर्य, आपले सामर्थ्य आणि वैभव सूचित करणाऱ्या चक्राची आम्ही कीर्ती ऐकली आहे. त्या चक्राची पूजा करूनच आम्ही तुमच्या दर्शनासाठी आलो आहोत. आम्ही सारे तुमचे सेवक असून आपल्या स्वामित्वाचा लाभ आम्हास द्यावा. "

त्या देवाने भरतेशाच्या चरणावर आपला मुकुट काढून ठेवला व त्याना वंदन केले. भरतेशाने तो मुकुट त्या देवाच्या डोक्यावर परत ठेवला व ते म्हणाले,

" तुमची खरी भक्ति श्रीवृषभांच्या चरणी असावी. मी त्यांचा पुत्र आहे. त्यांची आज्ञा हेच माझें जीवन. त्यांचा आदर्श हाच माझा प्राण. त्यांनी सांगितलेला धर्म हाच माझा श्वासोच्छ्वास. "

त्या रक्षक देवाला अशा प्रकारें उद्बोधन करून भरत उठले. त्या देवानें त्यांची सर्व व्यवस्था खास आपल्या देखरेखीखाली केली.

१. दुपारच्या वेळी त्या देवानें हिमवान पर्वताचा फेरफटका करून येण्याची विनंती केली. भरतेश आपल्या निरनिराळ्या सेनापतींसह हिमवान पर्वता-वरील निरनिराळे झरे, धबधबे, तळी पाहण्यांत गुंग झाले. त्या जंगलांतील अवीट गोडीचीं फळें चाखून फार आनंद झाला. अमृताहूनही गोड वाटलीं तीं फळें त्यांना. हिरवी गर्द वनराजी, पक्ष्यांची मंजुळ किलबिल, झऱ्यांची झुळझुळ आणि पाण्याची खळखळ ! सारेंच वातावरण बेहोश करणारें ! जीव-नाचा खरा साक्षात्कार या निसर्गरम्य आणि [illegible] ! दैन्य, दुःख यांचें नांव देखील नव्हतें. मुक्तहस्तानें निसर्ग आनंदाचा [illegible] जणों पसरवीत सुटला होता. सर्व सेनापतींचा शीण तो वनशोभा पाहण्यानें निघून गेला. जिंक-ण्याची भावना, जेतेपणाचा गर्व तेथें उरला नव्हता.

खुश होते. या प्रचंड गिरीनगावर आपले नाव पहिल्यादाच कोरले जाणार या भावनेने तर त्याची छाती अधिकच रुंदावली पौरुषाचें लेणें म्हणजेंच स्वाभिमान !

सेनापतीसह भरतेशाने त्या प्रचंड शिळाखंडाच्या रोखाने गमन केलें. धीरगंभीर पाऊलाचा आवाज शांतता भग करीत होता थोड्याच वेळात ते त्या शिळा–खडाकडे आले त्या शिळाखडाकडे पाहताच त्याच्या उत्साह नष्ट झाला शेकडो नावे तेथे अगोदरच होती ज्याची स्मृतीहि इतिहासात उरली नव्हती, ज्याचें अस्तित्वही उरले नव्हते, अशी केवळ नावेच नावे तिथें कोरली होती

भरतेश म्हणाले, " मला वाटले होते आपलेच नाव प्रथम लिहिले जाईल. सर्वश्रेष्ठ म्हणून मीच आदि सम्राट म्हणून लोक मला ओळखतील. पण माझ्या गर्वाचें ताट या शिळाखडावर आपटून फुटले आहे. "

देव म्हणाला, ' आपण असे निराश होऊ नका, कालचक्राच्या अनत फेऱ्यात असे परिवर्तन घडून येते. असंख्यात सम्राट, चक्रवर्ती, साधु, उच्च–कोटीचे पुरुष जन्माला येतात आणि काही काळाने त्याचे अस्तित्वही जाणवत नाही असें असलें तरी आपण श्रेष्ठ आहांत. लोकोत्तर आहात. विषाद टाकून आपण आपलें नाव अंकित करण्याची सम्मती द्यावी. "

श्री भरताच्या आज्ञेने एक नाव खोडून टाकून त्या जागी शिल्पकाराने श्री भरताचे नाव कोरले. त्या कोरलेल्या नावात त्याने रत्नें बसवून ते दैदिप्यमान दिसेल असें केले. भरत विनोदाने म्हणाले,

" हाही विजयच ! एकाचें नाव पुसून दुसऱ्याचें नाव ! उद्या माझेही नाव पुसून आपलें नाव घालणारा जन्मास येणार नाही असे थोडेंच आहे. "

भरताच्या मनातील विषण्णता कमी झाली नव्हती. पराक्रमाने दिगंत कीर्ति मिळविण्याची अभिलाषा पूर्ण झाली होती सहा खडें जिंकून सर्व सैन्य परत आलें होतें. देव, दानव राक्षस, किन्नर, गधर्व यासह अखिल मानवजात त्याच्या धैर्य–पराक्रमादि गुणावर लुब्ध होऊन त्याचे अधीन झाली होती.

परततांना देव भरताला म्हणाला, " जवळच्याच कैलास शिखरावर आपल्या पिताजींचा निवास आहे. आपण परतण्यापूर्वी त्याचा मंगल अशीर्वाद घेऊनच परतावें अशी माझी इच्छा आहे. "

भरताला ते ऐकून आनंद झाला. वडीलांचें दर्शन घेण्यास तो आतुर झाला. जगाचें आधिपत्य व वडीलाची भेट यातील एक तू स्वीकार असा प्रश्न उपस्थित झाला असता तर वडीलाचें दर्शन, त्यांची भेट, त्यांचा मगल, पुनीत आशीर्वाद हेंच त्याने स्वीकारले असतें.

मान्या सैन्याला कैलासाच्या रोखाने निघण्याचा आदेश देण्यात आला. शंख, नगारे व ढोल याच्या आवाजानें सारें रान दुमदुमून गेले. चिरकालची शांती जणुं मुखरित झाली होती. पशु-पक्षी तो आवाज ऐकून पुनः एकदा घाबरले होते. असंख्य मानव समूहाचें या ठिकाणी काय काम आहे असेच जणु त्यांचे कुतूहल उच्च स्वराने विचारत होते

## "कैलासाच्या कुशीत"

भरताचा रथ वेगाने कैलासाकडे चळला होता. रथाची चाकेंच जणु भरताची इच्छा काय होती हें दाखवीत होती. घोड्यांनीही त्याची इच्छा ओळखली होती. मेघासारखी गर्जना करीत तो दिव्य रथ वनराजीतील कठीण मार्ग उल्लंघित होता. सूर्यालाही असा भास झाला होता की आपला रथ पृथ्वीवरून जात असून भरताचा रथ आकाशातून जात आहे.

भरताच्या मनात विचार घोळत होते. किती वर्षे या विजययात्रेत गेली ! किती लोकांना तो भेटला होता ! आमोद-प्रमोद, दुःख-सुखाचे क्षण आले आणि गेले ! अयोध्येकडील वर्तमानही त्यास कळालें नव्हतें. मातेश्वरी यशस्वतीची चिंता, पत्नीची चिंता, मुलाबाळांची ओढ ! एतद्-विषयक प्रश्नाची नुसती रीघ लागली होती.

त्यांत श्री वृषभांचा विषयही होता ! वडीलांनी त्याच्यावर जबाबदारी सोपवून फार वर्षे झाली होती. प्रौढ भरत अधिकच प्रौढ झाला होता. विविध

अनुभवांनी त्याची प्रज्ञा अधिक पक्व आला होती. विजय यात्रेंत मिळालेला अनुभव हा यशापेक्षाहि मोठा होता. युद्ध हा केवळ हेतु होता. त्यायोगे लाभलेली परिपक्वता और होती.

प्रभूला न विचारता केलेली एक गोष्ट म्हणजे ब्रम्हवर्णाची रचना ! त्याची स्मृति झाली.

आदिब्रम्हाने क्षत्रिय, वैश्य आणि शूद्र या त्रिवर्णाची रचना केली होती. पण भरताला वाटलें– यासर्वांनी कुणाच्या तरी आधीन रहावें. क्षत्रिय बलानें माजला तर बुद्धीचा– धर्माचा–तपाचा अंकुश हवा. अशा वेळीच जे हिताहित पाहू शकतील; जे क्रोधी असणार नाहीत; जे स्वतंत्रपणानें व स्वतंत्र वाण्यानें खरें तत्व प्रतिपादन करूं शकतील, जे सत्ता आणि संपत्ती, कनक आणि कान्ता याच्या मोहास बळी पडणार नाहीत असा एक ब्रम्ह–निष्ठ मानव समाज त्याला हवा होता. म्हणून त्याने क्षत्रियांतील अत्यंत शुद्ध, बुद्ध, प्रबुद्ध असलेल्याची निवड केली. त्याच्यातूनहि क्षमा-शांति–दया यांचें केवळ माहेरघर असलेलें, तपाला न घाबरणारे, सत्यासाठी व सत्वा–साठी प्राण देणारे जे लोक होते त्यांना "ब्राम्हण" अशी संज्ञा दिली. सर्व वर्गात त्याला श्रेष्ठ ठरविले, 'वर्णाना ब्राम्हणों गुरु:' या तत्वाची निर्मिती केली. त्या ब्राम्हणाचा त्याने सत्कार केला होता. राजदरबारी उच्च आसना–वर त्याना बसविलें होते. इतकेंच नव्हे तर स्वत: त्यांचा सल्ला घेतल्या–शिवाय तो कांहीही करीत नव्हता

सारथ्याने कांही तरी विचारलें म्हणून भरतेशाची विचारशृंखला मध्येंच तुटली. सारथी म्हणून होता- 'महाराज' तो पहा कैलास ! सर्व पर्वत शिखराचा राजा ! पृथ्वीचा क्षमा गुणच जणू कैलास रूपानें जन्माला आला आहे. सूर्याच्या किरणांनी वर्फाच्छादित शिखराना- कसे द्रवीभूत केले आहे!"

सारथी नेहमीप्रमाणे नानाप्रकारच्या वृक्षांचें, पक्षांचें वर्णन करण्यांत गुंतला होता. भरतेशानें मात्र तिकडे लक्ष नव्हतें.

• • •

विचित्र रत्नांनी मढविलेली, ध्वजा–पताकांनी सुशोभित असलेली गोपुरे ! गोपुरांच्या घुमटांतून वाद्याचे ध्वनी आकाशांत फेकले जात होते. वृक्षांच्या दुतर्फा रांगांनी सुशोभित रस्ते ही दिसू लागले.

सारथ्याने रथ थांबविला आतुर झालेले श्रीभरत रथावरुन खाली उतरले. शुद्ध वस्त्रें परिधान करुन ते श्रीवृषभाच्या दर्शनासाठी निघाले. भरताबरोबर त्याचे मंत्री, पुरोहित. इतर बांधव व सेनापती ही निघाले.

श्रीशंकर वृषभांची ती धर्मसभा होती. धर्मसभेत उच्चजागी कमला–सनावर सूर्यासारखी तेजस्वी मूर्ति होती श्री वृषभाची ! आपल्या तपोवैभवाने ते चकाकत होते. त्या सभेने दऱ्या खोऱ्या साऱ्या व्यापल्या होत्या.

— चार मोठ मोठाले प्रवेश द्वार असून चारहीबाजूस मोठा कोट होता प्रवेशद्वारावर येणाऱ्याचे पक्षीगण स्वागत करीत वारा आपल्या शीतल स्पर्शाने उत्साहित करी. समोरच एक योजनभर उंच स्तूप होता त्या स्तूपावर असंख्य घृतआरत्या तेवत होत्या. त्यानंतर संगमरवरी दगडाचा रत्न–खचित असा कीर्तिस्तंभ होता. सर्वांचा अभिमान–अहंकार त्या कीर्तिस्तंभाच्या दर्शनाने शांत होई. षट्खंडाचा अधिपति भरत त्या स्तंभाकडे पाहातच राहिला. जणु स्तंभ त्याला म्हणत होता– जगाला जिंकणारा श्रेष्ट नसतो षड्रिपूंना जिंकणाराच खरा जेता ! ये. आत असलेल्या महाविभूतीच्या दर्शनाने वासनेने मळकट झालेल्या मनाला धुवून स्वच्छ कर ! जगावर सत्ता गाजविणारे शेंकडो चक्रवर्ती होऊन गेले. रक्तपिपासू क्रूर राजेही पृथ्वीने फार पाहिले. आज पृथ्वी श्रीब्रम्हस्वरूप आदिनाथाला प्राप्त करुन धन्य झाली आहे. त्यांना भेटून तू आपले मनोरथ पूर्ण कर. ”

चक्रवर्तीनी त्या मानस्तंभाला नमस्कार केला सर्व सेनापतींनी आपले मस्तक तिथें नम्र केले. ‘ अहो आश्चर्य, अहो आश्चर्य ’ भरत खरोखरच धन्य आहे ! " असा कोलाहलाने आकाश दुमदुमून गेले.

भरताच्या मनाला शांति वाटत होती. दिव्य वातावरणानें त्याचा सर्व शीण निघून गेला होता. सहपरिवार भरत श्रीस्वयंभू शंभूच्या दर्शनास येत असल्याची वार्ता सर्वत्र पसरली.

सिद्धार्थ नावाच्या प्रचंड वृक्षाखाली प्रभूचे आसन होते. प्रभूच्या चारही बाजूस धूपपात्रें ठेवली असून त्यातून मदमद धूप–धूम बाहेर येत होता. पुष्पमडित पात्रें चारही बाजूस ठेवली होती. विविध प्रकारच्या चिन्हानी सुशोभित रेशमी ध्वज हवेनें फडफडत होते. धर्मसम्राट श्री आदि–प्रभू कमलासनावर–अचलासनावर बसून धर्मोपदेश देत होते.

भरताने श्रीप्रभूला त्रिवार वदन केले. त्याच्या तोंडून शब्दच निघेनात ! काय ते वैभव ! श्रीप्रभूची मंगलमूर्ति पाहताना दोन डोळे अपुरे वाटतील अशी दिव्यतेजाची प्रभा सर्वत्र पसरली होती. त्याने केशरीचंदनाने, पुष्पाने, धूपाने प्रभूची पूजा केली तो हात जोडून प्रार्थना करू लागला—

" पिताजी, आपण त्रैलोक्याचे स्वामी झालात तेव्हा केवळ ' माझे पिताजी असें आपणास म्हणतांना क्षुद्रतेची भावनाच अद्यापि माझ्या ठिकाणी वास करते असे मला वाटते. आपल्या आशीर्वादाने साऱ्या जगाचे भलें होत असता केवळ माझेच भले झाले असे म्हणणेंही गैर वाटते मला. आपण सर्वांच्या सकल्प सिद्धीचे दाते आहात. वेदविद्येचे उद्धारक आहात. तुमच्या रूपाने सारी मानव जात मान उच करून उभी आहे. मानवतेचा जगत् वद्य आदर्श म्हणून कैलासाने तुम्हाला आपल्या शिरी धारण केले आहे. आपल्या उपदेशाने आपण लोकोत्तर ठरला आहात सर्वांच्या कल्याणाची इच्छा बाळगल्याने आपण भद्र आहात. कल्पवृक्षच आहात ! सन्मार्ग दर्शविल्यामुळें आपण विचक्षण आहात ! आपल्या पदकमली माझें वैभव, माझा सारा अहंकार मी अर्पण करीत आहे "

श्रीभरताच्या प्रार्थनेने सर्वसभासदाना आनद झाला सर्वांनी भरताचा जयजयकार केला. " याला म्हणतात सम्राट् ! पृथ्वीचे भाग्य म्हणूनच दोन सम्राट् तिला लाभले. " अशा उद्घोषांनी सभासदानी भरताचे स्वागत केले.

सारी सभा शात झाली. त्रिलोचन, धर्मपाल, जगतगुरू श्री वृषभांची मंगलवाणी सुरू झाली. ते म्हणाले–

" भरता, जगातील सर्व जीवांची इच्छा म्हणजे सुखप्राप्ति. पण सुख देण्याची, घेण्याची पात्रता निर्माण करणें ज्याच्या त्याच्या हाती आहे. परंतु-

रीमृग सुगंधासाठी वणवण हिंडतो पण त्याला हें कळत नाही सुगंध त्याच्याच ठिकाणीं आहे. तसें आपलें आहे. सुखाचा शोध बाहेर करून भागणार नाही त्यामुळे तें अधिकच दुर्लभ बनते."

भरताने नम्रीभूत होऊन विचारलें, "प्रभू, मी आपल्या परवानगी शिवाय ब्राम्हण–वर्गाची निर्मिती केली आहे. मला वाटतें, नैतिक मूल्यांच्या रक्षणासाठी त्या वर्णाची राज्याला आवश्यकता आहे."

श्रीवृषभ गंभीरपणे म्हणाले, 'तू श्रेष्ठ आहेस. तुझा हेतु मंगल आहे. परंतु नैतिक मूल्यांच्या रक्षणासाठी काही काळ जरी या वर्गाचा उपयोग झाला तरी पुढें ब्राह्मणवर्ग लोभी बनणार नाही– सत्ताभिलाषू बनणार नाही असें थोडेंच आहे मी निर्माण केलेले वर्णहि मोडतील त्यातही कालपरत्वे विकृती होईल. तेव्हा वर्णनिर्मितीने कोणताही प्रश्न तात्काळ सुटल्यासारखा वाटतो. पण तसें चिरकाल घडेलच असं नाही"

"मग," भरत म्हणाले, 'हे सर्वज्ञ देव, जगाच्या रचनेंत चिर-कालीन तत्व कोणतें?"

"तत्व चिरंतन नाही. तें जड आहे. चिरंतन आहे चैतन्य. चिरंतन आहे मानवता–सजिवता मानवतेचा उत्कर्ष करील तेंच खरें तत्व. तत्व औषधाप्रमाणें असतें किती मात्रेंत केव्हां व कोणाला द्यावे याचे ज्ञान फक्त उत्कृष्ट वैद्यालाच असतें. म्हणून तत्वापेक्षा त्याचा योग्य उपयोग हाच महत्वाचा असतो. ज्या ज्या वेळी त्या तत्वाचा अम्मल नीट होत नाही त्या त्या वेळी मानव जात कलंकित होते. म्हणूनच द्रष्टा लागतो जगला. द्रष्टा एक चालतो पण द्रष्टे अनेक पाहिजेत समुद्र एक असला तरी चालतो पण सर्व भूमि सुजला सुफला करायला नद्या शेकडों लागतात."

प्रभूची वाणी एखाद्या धबधब्याप्रमाणें वहात होती. तिच्यांत दूर-दर्शिता, सत्यदर्शिता व सम्यक् दर्शिता हे तीन गुण होते. ती वाणी हितकर होती, मित होती, आणि प्रिय होती.

श्री भरत म्हणाले, "हे सामान्यपणें झालें तरी राज्यकारभाराच्या दृष्टीनें मी काय करावें, मी कसें वागावें म्हणजे कल्याणकारी राज्य निर्माण होईल."

" हे श्रेष्ठ पुरुषा, " तू असा वाग जेणे करुन लोक तुला आळशी म्हणणार नाहीत. आधळा म्हणणार नाहीत. बहिरा म्हणणार नाहीत. पगू म्हणणार नाहीत दुर्बळ म्हणणार नाहीत म्हातारा म्हणणार नाहीत, रोग जर्जर म्हणणार नाहीत. "

या सूचक उपदेशाचे मर्म त्याच्या ध्यानी आले. त्याला आनंद झाला अशा प्रकारे रोजच्या रोज नानाप्रकारची चरित्रें, कथा--पुराणे ऐकण्यात किती काळ निघून गेला हे त्याला कळाले नाही.

*भरतासारखा विद्वान प्रश्न—कर्ता आणि सर्वज्ञ प्रभू उत्तर देणारे!* यामुळें निरनिराळ्या तत्वावर चर्चा होती अनेक कुट प्रश्नाची उत्तरे सहज मिळत. भरताच्या विचाराला फारच मोठी धार प्रभू सयोगाने आली प्रभूची उत्तरें विश्वरूप होई. त्यात संशयाला जागा नसे दुरुस्तीला वाव नसे. सूर्याच्या किरणाची दुरुस्ती काय करता येणार? त्याचा उपयोग करून घेणें हेच मानवाचे कार्य

एके दिवशी त्या धर्मसाम्राज्य नायकाची परवानगी घेऊन भरत जायला निघाला. त्याचे भावना प्रवण मन द्रवीभूत झाले इतराचे प्रभु असले तरी ते त्याचे वडील होते. त्याच्या अगाखांद्यावर जो मोठा झाला होता. जीवनाचे पाठ त्याच्याच अंकी लोळून तो शिकला होता. प्रभु दुरावले होतें प्रभूच्या वैभवापुढें आपले वैभव त्याला फिके वाटू लागले

" तुझें व तुझ्या प्रजेचे मगल होवो" हा आशीर्वाद हृदयाशी बाळगून तो निघाला. आजूबाजूस लक्षावधी सैनिक असताही त्यास अगदी एकाकी वाटलें शून्यवत् वाटलें.

श्री भरताचें सैन्य अयोध्याच्या रोखाने कूच करीत होतें. दिग्विजयाची वार्ता अगोदरच पोचली होती रस्ते शृगारले होते. वाद्ये वाजत होती नगारे झडत होते. कुमार कुमारीचे थवे रस्तोरस्ती नृत्य करीत होते. भरताच्या महन्मगळ विजययात्रेची गीतें गाईली जात होती.

भरताच्या सैन्यातील घोडे फुरफुरत होतें, रथाचा गडगडाट वाढला होता. पायदळातील सैनिकाची उत्सुकता— घरी पोहोंचण्याची— वाढली

होती. अखिल विश्वभ्रमणाची सांगता होणार होती. "हें आलें शहर! तो पहा तट! आलेंच महागोपुर! अशा प्रकारची वाक्यें उच्चारली जाऊ लागलीं, गावांतील स्त्रियांनी पचारत्या सजविल्या. हजारो दीपपंक्तींनीं गोपुराजवळील भाग सुंदर दिसूं लागला.

० ० ०

इतक्यांत एकाच खळबळ उडाली गोपुराच्या तोंडाशी "चक्र" येऊन थांबले. त्या चक्राची पूजा केल्यावरही ते नगरात शिरेना! प्रत्यक्ष भरतेश्व-राने त्याला आत जाण्याची आज्ञा केली. पण व्यर्थ! ते 'चक्र' आत शिरे-चना! सर्व मंत्री जमले. भरताने विचारले, "असे काय झाले कीं ज्यामुळें हें 'चक्र' आत जात नाही?"

त्यावर वृद्धमंत्री म्हणाला, "अद्यापि चक्र' संतुष्ट नाहीं. जगात कुणीतरी राजे अद्यापि असे आहेत, जे तुमचे मांडलिक व्हायला तयार नाहीत"

त्यावर दुसरा मंत्री म्हणाला, "सर्व सेनापतींना बोलवा म्हणजे त्याच्याकडून काही माहिती कळेल"

सारे सेनापती गोळा झाले. त्यांनाही पेंच पडला. भरतराजानें विचारले, "अद्यापि असे कोणी आहेत का की हे अद्यापि मला सम्राट् मानायला तयार नाहीत? तुम्ही सर्व देशांतील राजांना नमवून केलें ना!"

त्यावर एक सेनापती म्हणाला, "सर्व राजांनी आपले मांडलिक स्वीकारले असले तरी आपल्या सख्ख्या बंधूंनी व [illegible] बाहुबलींनी नाकारलें आहे."

'नाकारलें! कशायस्न ? तुम्ही केवळ बंधू–बंधूमध्यें भांडणें लावूं इच्छितां "— भरतानें रागाने म्हटले.

त्यावर वृद्धमंत्री म्हणाला, " इथें आम्हाला सांगायला जागा आहे, एवढेच माझे म्हणणें आहे. आपल्या बधूना सोडून सर्व राजे पराजित झाले आहेत, हें उघड सत्य आहे चक्रवर्तीच्या चक्राला हे सहन होणार नाही. आपले सर्व बंधूवरील प्रेम जगजाहीर आहे परंतु चक्रवर्तित्व प्राप्त करण्यास त्यांनी देखील आपले मांडलिक झालेच पाहिजे"

क्षणभर भरतेश्वर विचारात पडले. बधूना काय कळवावे? त्याना प्रेमाने अंकित करावे की युद्धानें? पण — — छे: — — ते अंकित होणारच नाहीत. मांडलिक होण्या इतपत राज्यलोभ त्याना नाही. ते माझ्याच हाडा–मासाचे नाहीत का? सिंहासारखे पराक्रमी भाऊ माझे अंकित होणार नाहीत'

भ्रात प्रेमाआड "चक्रवर्तीत्व" येऊ लागले यातील काय निवडावें ? चक्रवर्तीत्वाचा स्वीकार अगोदरच केला आहे तो टाळतां येत नाही बंधुत्वाचे नाते रक्ताचें आहे. ते तोडूं म्हणता तुटणार नाही. अशा प्रकारच्या उलट सुलट विचारानें त्याच्या मनात संभ्रम निर्माण झाला.

अद्यापि सैन्य शहरांत का शिरत नाही म्हणुन सारे नगरवासी अधीर झाले. श्रीभरत शोकाकुल झाले, नगरांतील उत्सव बंद झाला. नगारे थांबले. नाचगाणें बंद झालें. आरत्या विझल्या. सर्वत्र विषण्णपणाची उदास मरगळ पसरली.

नगराबाहेरच सैन्य थांबले. घोडे, हत्ती, उंट यांची हालचाल मंद झाली. जणु प्रचण्ड वादळाचा तडाखाच बसला होता.

• • •

रात्रीचे बारा वाजले होते. सारे मंत्री व सेनापती प्रभूच्या राहुटीत होते. काय करावे हें सुचत नव्हते, प्रसेनजित महामंत्री शांततेचा भंग करीत म्हणाला, "पत्रे लिहून त्याची संपत्ती घेतली जावी." ते जर मांडलिक होऊ शकले तर ठीकच झाले नाहीतर ....."

"नाहीतर युद्ध ! हेंच ना तुमचें उत्तर !" भरताने विकल होऊन विचारलें.

"महाराज, क्षात्रधर्माला भाऊ, मामा, काका इतकेंच काय, पिता देखील ठाऊक नसतो, हे श्रीवृषभाचे वचन आपण विसरलात का? ममतेच्या सुरंगानें कर्तव्याचा किल्ला ढासळतांना तुम्ही पाहू शकाल का? तुमचे बंधु सुज्ञ आहेत. ते तुमच्यना कर्तव्य कठोर वागण्याने संतुष्ट होतील. ममतेच्या चुंबनाच्या ठशापेक्षा कर्तव्याचा वार ते अधिक मोलाचा मानतील. आपण असे दिङमूढ होऊ नका कर्तव्याच्या विचारच तुम्हाला प्रकाश दाखवील."

पत्रें लिहिली गेली. शिक्का मोर्तब झाल्यावर वायु वेगाने घोडेस्वार सर्वत्र पळत सुटले. दाही दिशाना पसरलेली बंधूंची राज्यें फारच थोड्या-अवधीत त्यांनी गांठली. ज्येष्ठ बंधूचा आशय त्याना कळाला. बंधूचे चक्र-वर्तित्व अबाधित रहावे, त्याच्या दिव्य यशाला कलंक लागूं नये म्हणून नव्वद बंधूनी त्याना कळविलें.

"तुमचा आशीर्वाद मिळाला. तुमच्या चक्रवर्तीत्वाचा विजय असो पण मांडलिकत्व स्वीकारण्याची इच्छा नाहीं. केवळ राज्यलोभासाठी स्वतंत्र्य गमावलें, असा मिथ्या आरोप आमच्यावर येईल. आम्हास हेही माहित आहे कीं आपणास राज्यलोभ नाही. अनेक देवानी, गंधर्वानी, किन्नरानी, खेच-रानी आपल्या पदकमली आपलीं मुकुटें वाहिली. परंतु श्रीमहर्षि पिताजींनी आमच्याच्या डोक्यावर ठेवलेला मुकुट आपल्या चरणी ठेवण्यानें प्रभूंच्या मोठेपणास दूषण येईल. आम्ही राज्य सोडून श्रीवृषभनाथांच्या सेवेंत जात आहोत. हें राज्य आपण जिंकून त्यावर आपली अधिसत्ता स्थापन करावी"

अशी पत्रें वाचून भरताला खेद वाटला. राज्योपभोगापेक्षां श्रीवृष-भांची पादसेवा खचितच अधिक मोलाची आहे. त्याने तीं पत्रें सेनापतीला दिली व पुन: अपुरी राहिलेली विजय यात्रा पूर्ण करून येण्यास आज्ञा दिली

पुन. ते चक्र जोराचा आवाज करीत निघाले धरी पोनण्याची उत्सुकता युद्धाकडे वळली. अपूर्ण यशाचे मानकरी होण्यास कोण तयार होणार ?

इतक्यात श्री बाहुबलीकडील दूत परत आला. त्याची काय मनीषा आहे हे जाणून घेण्यास भरतास उत्सुकता वाटली. कारण बाहुबलीचा स्वभाव त्याला माहित होता. कदाचित् तो धैर्यसागर खवळला असेल ! त्याच्या पत्रांतही तसलेच काही तरी असेल ! ते वाचून मनात क्रोध निर्माण होऊ नये म्हणून अत्यंत उत्सुकता असूनही ते पत्र त्यांनी सेनापतीला वाच–ण्यास सांगितले सेनापती वाचू लागला.

" प्रिय तीर्थरूप जेष्ठ बंधु भरतराजे, आपला आदेश वधु म्हणून मी शिरोधार्य मानला असता. तुमच्या वैभवाने या लहान बंधुचे हृदय भरून आले आहे. अखिल षट्खंडाना जिंकून पौरुष, पराक्रम आणि राज्यनीति यांचा धडा तुम्ही जगाला दिला. श्रीवृषभांची कीर्ति या तुमच्या यशाने अधिकच निर्मळ झाली आहे इक्ष्वाकु कुलाचे महत्‌भाग्य म्हणून आपल्या सारख्या पुत्रांचा जन्म या कुलात झाला तुम्हास तुमचा लहान भाऊ म्हणून माझे शतशः प्रमाण ! पण माझ्या शिरा वरील हे मुकुट आपल्या चरणी मांडलिक म्हणून नमविण्याची आशा आपण करावयास नको होती. प्राणापलीकडे प्रेम करून तुम्हीच भ्रातृत्वाचा पाट जगाला शिकविला. पिताजींच्या प्रेमालाहि उणेपणा येईल असे प्रेम तुम्ही केलेत, ते याचसाठी का ? माझे पंच प्राण तुमच्या चरणी मी वाहिले तरी भ्रातृत्वाच्या कर्तव्याची पूर्ति अपुरी राहील पण माझ्या सारख्या राजाला एखादा सम्राट होऊं इच्छिणारा केवळ पत्रा–नेच जिंकून घेऊ शकतो हा दाखला इतिहासात मला नको आहे इक्ष्वाकु–कुलाला हा दाखला कलंक ठरेल. स्वातंत्र्यप्रेमी जनतेच्या इच्छेशिवाय मी राज्य अर्पण केले तर ते तुम्हासही भूषणास्पद होणार नाही. राज्यें जिंकून घेणें एकपरी चक्र–शस्त्राच्या बलावर सोपे आहे, पण स्वातन्त्र्याचे दान जनता सहजासहजी करणार नाही माझ्या तोंडी युद्धाची भाषा यावी हें मी माझें भाग्य समजतो. दोन कर्तव्यदक्ष इक्ष्वाकु कुलातील बंधु कसे वागतात हे तरी जगाला कळून चुकेल. "

श्री भरतेशाला हे उत्तर जणु अपेक्षित होते. चक्रवर्तित्व अनायासे

मिळालें असें घडत नाही. घरांघरात भांडणे लागावीत. एका भावाने दुसऱ्या भावाच्या नाशास प्रवर्तावे ही कल्पना भरताला रुचणे शक्य नाही. पण सकट अटळ होतें घडणारे घडणारच यावर विश्वास ठेवला तर पराक्रम आणि पुरुषार्थ या शब्दांना अर्थच उरणार नाही, असे भरतेशाला वाटत होते.

सेनापतीचाही विचार युद्ध करण्याचा निश्चित झाला. पुनश्च एकच विचार— दक्षिण विजय ! दक्षिणेतील चोल, पाण्ड्य, चेर, केरल इत्यादि राजेही मदतीसाठी बोलविण्यात आले. आज पर्यंत जें घडले नाही ते जणुं घडणार होतें. स्वतन्त्र्य रक्षणासाठी साम्राज्याला विरोध करणारे पोदनपुरचे राज्य उभें ठाकले होते. स्वातन्त्र्याचे, जनतेच्या अभिमानाचे संरक्षण हाच त्यांचा हेतु ! साम्राज्य निर्मितीला त्याचा विरोध होता. कडवा विरोध करून पोदनपुरचे स्वातंत्र्य रक्षण ते करणार होते

युद्धाची तयारी सुरू झाली. पोदनपुरराज्यांतील तरुण क्षत्रियांची सैन्यात भरती होऊ लागली. सैनिकांचे शिक्षण सुरू झाले. सर्वांच्या तोंडी युद्ध हाच एक शब्द होता प्राणांचे मोल देऊन स्वातन्त्र्याचे रक्षण व आक्रमकाचा प्रतिकार !

० ० ०

भरतेशाच्या सैन्याने दक्षिणेच्या वाटेनें कूच केलें. अनेक दिवसानी भेटलेल्या पतीचा विरह स्त्रियांना साहवत नव्हता. असा इच्छा-भंग होईल असें त्यांना वाटले नव्हते. त्या पतिभक्त स्त्रियांनी पतींना आपल्या बाहूतून मोकळें केले. पुनः त्यांना पचारत्यानीं ओवाळिले. फुलें उधळली गेली. नगाऱ्यांचा आवाज घुमू लागला. घोड्यांच्या टापांचा ध्वनीनें आकाश दणाणून गेले. धुळीने आकाश इतके भरले की अयोध्यावासीयांना मंन्द दिसेनासे झाले

रणवाद्ये झडत होती. गीतं गायिल्या जात होती. हत्तींच्या गंडस्थळां–तील मद गळून गळून रस्त्यावर मोत्याचा सर पसरला होता. अनेक नद्या, जंगले व पर्वत पार करीत सैन्य पोदनपुराजवळ आले. गावाबाहेरील मुद्दाम तयार करण्यात आलेल्या रणांगणात पूर्वाभिमुख होऊन भरताचें सैन्य येऊन उतरले. अनेक मांडलिक भरताच्या सेवेस तयार होते. त्यांचीही सैन्यें येऊन मिळाली. सेनापतीच्या आज्ञेने सैन्य योग्य जागी व्यवस्थित आले

• • •

रात्रीची प्रशांत वेळ होती. चंद्राची किरणें शत्रु–मित्र असा आप–पर भाव सोडून सर्वांवर आपल्या चंदेरी अमृताचा वर्षाव करीत होता. चांदण्यात हत्तींचे दात चमकत होते. तरवारींना व ढालींना तेज चढले होते पांढरे शुभ्र घोडे उष्म्याने सुखनिद्रेत मग्न होते. हत्ती परस्परांच्या गळ्यात सोंड घालून झोपी गेले होते

श्री भरत आपल्या राहुटीत झोपले होते. रेशमी-चादर त्यांच्या शरी–रावर पसरली होती महाशक्तीच जणु विसावली होती तिचे दर्शनही सामान्य पुरुषास घडू नये म्हणून ते रेशमी वस्त्र अधिकच सावध होते

दूरच्या एक भागात अद्याप जागृतीची चिन्हे दिसत होती एका मोठ्या राहुटीत सर्व सेनापती जमले होते. प्रसेनजित नावाचा वृद्ध सेनानी सर्वांना काही तरी समजावून देत होता आवाज घोगरा असला तरी स्पष्ट होता. त्याच्या म्हाताऱ्या चेहऱ्यावरील सुरकुत्यांतही रग भरलेली दिसत होती. डोळ्यातील भेदकपणा तरवारीच्या तीक्ष्णतेची आठवण करून देत होता. त्याच्या हाताच्या हालचाली काहीसे अस्पष्ट असणारे शब्द स्पष्ट करीत होते.

तो म्हणत होता— " पराभूत मनोवृत्तीतून हे माझे विचार उद्भवले

असा याचा अर्थ नाहीं. युद्धाला भरताचें सैन्य धावलें, फक्त म्हणून असा कुणी निष्कर्षही काढू शकणार नाहीं. श्री चक्रवर्ती भरत याच्या शरीरांत श्रीवृष-भांचे रक्त आहे. तेंच श्रीबाहुबलीच्या शरीरांत आहे. दोघांचाहि पराभव युद्धांत होणें शक्य नाही. लक्षावधि सैन्याच्या विनाशाशिवाय यांतून कांहीच निष्पन्न होणार नाही. युद्धाचा हेतू चुकला असे मला वाटतें 'चक्रासाठी युद्ध' हा हेतू प्रशस्त वाटत नाहीं. युद्धासाठी चक्र, युद्धासाठी शस्त्रास्त्रें हा हेतू मी समजूं शकतो. परंतु शस्त्रस्पर्धेसाठी, शस्त्र-रंजनासाठी युद्ध हे मला समजत नाही. देवानी दिलेली हीं शस्त्रें भावाभावाचा नाश करू शकत नाहीत. केवळ परकीय सैन्याचा नाश ती करू शकतात. अशा नाशापेक्षा ...... "

पुढें काय बोलावें हें एकदम न सुचल्याने ते वृद्ध सेनापती अडखळले. सावरून त्यांनी आठवण्याचा प्रयत्न केला. योग्य शब्द त्याना सांपडत नव्हता त्याचे डोळे किलकिले झाले होते. भुवईचे पांढरे केस डोळ्यावर आले होते.

नंतर हळूंच ते म्हणाले— " अशा नाशापेक्षां या दोन बंधूंनाच आपण विनंती करावी. "

" कसली विनती," अधीर होत एका तरूण सेनापतीने विचारलें

" असें अधीर होऊं नका, धैर्यमेरू. तुमचा विरोध मला करायचाना नाहीं. मला ठाऊक आहे तुम्ही काय म्हणणार आहात? राजे- राजेच भांडू लागले व त्यांच्या जयापजयावरच निर्णय होऊ लागला तर सैन्याची जरूरीच उरणार नाही. हेंच ना तुमचें म्हणणें?"

तरूण रक्ताचा धैर्यमेरू त्या वृद्ध सेनापतीच्या या प्रश्नानें कचरला. अद्याप त्याचे स्थान कमी प्रतीचे होतें. बढतीची आशा होती. अनुभवाची कसलीहि बैठक अद्यापि त्याच्या विचारांना लाभली नव्हती. नसानसातून तेजस्वी, गरम रक्त होतें, पण विवेक नव्हता.

वृद्ध पुनः सांगू लागला- " आपण पर्यायी युद्धाचा एक विकल्प सम्राटापुढें मांडावा. दोन महाशक्तिमानांची झुज व्हावी. त्या झुंजीत जो जिंकेल त्यानें पराभव मान्य करावा. महाराज भरताचें मन या कामीं

मी वळवू शकेन असा आत्मविश्वास मला वाटतो."

त्या वृद्ध सेनापतीच्या चाणाक्ष बुद्धीचें सर्वांना कौतुक वाटलें. दोन मत्त हत्तींच्या झुंजीत मशकाचा कुठें पाड लागणार होता? जिथें जयही नव्हता व पराजयही नव्हता, असें ते युद्ध होतें.

श्री बाहुबली सारखा दिव्यशक्तिचा पुतळा भरताला युद्धांत हार जाणार नव्हता श्रीभरतही या युद्धात हारणार नव्हते. युद्ध टाळून सामोप-चाराने होणाऱ्या गोष्टी त्याना आवडत होत्या युद्ध हे कर्तव्य आहे हा त्याचा सिद्धांत होता. युद्धात राग्रसबधी द्वेष असावा असें त्याना वाटत नव्हते. शिवाय बाहुबलीचा हट्टी आणि आग्रही स्वभाव त्याना चांगलाच सुपरिचित होता यातून काही मार्ग निघाला तर तो त्याना हवा होता. अगदी शेवटच्या क्षणी मार्ग सांपडेल व युद्ध टळेल अशी आशा भरताच्या मनांत होतीच.

० ० ०

शारदीय चंद्राचें सुमशीतल चांदणे विरविरीत होत होत विलीन झालें. पक्षांच्या कूजनानें श्रीपती भरत जागे झाले.

जागे झाल्याबरोबर ते आपल्या वडीलांच्या नामस्मरणात रंगून जात. ते राजमहालात असोत, अरण्यात असत, नाहीतर रणांगणांत असोत. भरताच्या या क्रियेंत खंड पडला नव्हता. जीवन सर्वस्व म्हणजे पिता श्रीवृषभ!

" हे पिताजी, तुम्ही वीतमत्सर आहात, जेष्ठ आहांत, कारूण्यमूर्ति आहांत. माझ्या मनांतील संशय काढून मला योग्य मार्ग का दर्शवीत नाही? आपण सौम्यमूर्ति असून माझ्यात हा क्रोधाचा उद्रेक का शिल्लक ठेवला? विघ्नहर्त्याचे कौशल्य असून या कुलनाशक कलहाचे कार्य माझ्याकडून का

करून घेत आहात? युगादि पुरुषाचा मी पुत्र असून अशी माझी अवस्था तुम्ही का केली? सर्वक्लेशविनाशक असून माझा एवढा क्लेश का दूर करीत नाही? "

अशा प्रकारें विविध विशेषणांनी स्तुति केल्यावर त्याच्या मनास शांति लाभली. प्रातःकालीन क्रिया आटोपल्याबरोबर दोन मल्लांनी येऊन भरताच्या अंगाला चंदनाच्या तेलाची मालीश केली. अगोदरच तेजस्वी असलेले कांतिमान शरीर तप्त सुवर्णाप्रमाणें चकाकू लागले.

त्यानंतर भरतेशाने एक दूत पाठवून युद्ध होण्यापूर्वी श्री बाहुबलींना भेटावयास येण्याची विनंती केली.

त्या अवधीत प्रसेनजित सेनापतीने भरत महाराजांची गाठ घेतली. मोठ्या युक्ती-प्रयुक्तीनें आपलें म्हणणे त्याने महाराजांना पटवून दिले. युद्धाने प्रलय ओढवेल, प्राणहानी किती होईल याचा नेम नाही. संपूर्ण अयोध्येंत केवळ मुलें, बायका व म्हातारे याशिवाय कोणी उरणार नाहीत. विनाशाव्यतिरिक्त या युद्धाचा हेतूच असू शकत नाही याची कल्पना आल्यावर भरताने तें म्हणणें मान्य केले

थोड्या वेळानें दूत परत आला श्रीबाहुबली भेटावयास भरताच्या छावणीत आले. भरतेशानें त्यांचें स्वागत केले. त्या राहुटीत दोन भाऊ एकत्र बसले होते. फार दिवसांनी ते भेटले होते. भरताने कडाडून मिठी मारली. पाठीवर ममतेचा हात फिरला. भरताच्या डोळ्यांत आसवें उभी राहिली याच पाठीवर त्याने अनेकदा हात फिरविला होता. छोट्या भावावर विशेषतः बाहुबलीवर त्याचें निरतिशय प्रेम !

काही काळ नीरव निस्तब्धता पसरली. बाहुबलीने विचारलें,

" पिताजींचे क्षेम आहे ना ! आई यशस्वतींचें क्षेम आहे ना! आणि कुमार अर्ककीर्ति आता चांगला बोलत असेल नाही?"

घराकडच्या गोष्टींनी वातावरणांत बदल झाला. नवे जगच निर्माण झाले. दोन लढवय्ये तेथें नव्हते तर ! दोन भाऊ एकाच रक्ता-मांसाचे-एकत्र नांदलेले-एकत्र भांडले- मिसळलेले!

श्रीभरताने विजययात्रेतील विविध गमती सांगितल्या. श्रीवृषभ नाथांच्या महप्रासातील दिवसांचें वर्णन केलें. भाषेचें माधुर्य भरताच्या ठिकाणी विपुल! जिभेत नुसती साखर घोळत असे. कठोर शब्दांचा उच्चार करण्यापर्यंत पाळीच येत नव्हती.

" पण आईसंबंधी व कुमारासंबंधी नाही सांगितलें काही?,– बाहुबलीनें विचारलें."

" काय सांगू तुला? कसं सांगू ? या चक्रवर्तीत्वाच्या मोहात सार विसरलो आहे बघ. यात्रा करून परतलो. घरी जाऊन गाठी भेटी होतील असं वाटलं. पण ' चक्र ' शहरात शिरेना! सर्वांचा आग्रह आणि राज्यकार्य म्हणून पुन: निघालो माता यशस्वती भेटू शकली नाही कुमारही भेटला नाही. "

असं बोलता असता जणु व्यथाच ते बोलून दाखवीत होते कंठ दाटून आला होता. भावविव्हल झाले म्हणजे ते व्याकुळ होत.

मन कठोर करून भरत म्हणाले, " युद्धासंबंधी मी असे ठरविले आहे की आपण दोघांनीच युद्ध करावे. तुझ्या सैन्याची अवहेलना म्हणून नव्हे. मी विनाश इच्छित नाही. मला चक्रवर्ती व्हायच आहे, जनतेला नाही. माझे सेनापती नुकतेच येऊन गेले. त्यांचेही म्हणणें तेंच आहे. आपणही आपल्या सेनापतीचा सल्ला घ्या. युद्ध ठरले तर युद्ध ! द्वंद्व ठरले तर द्वंद्व ! माझी तयारी सर्वाला आहे. यात माझा फायदा एवढा की तुझें शौर्य, तुझा पराक्रम, तुझें अतुल सामर्थ्य पुन. एकदा पहायला मिळेल ! "

" पुन: एकदा ?— " बाहुबलींनें आश्चर्य चकित होऊन विचारलें.

" हो, पुन: एकदा. तुला आठवतं का ? एकदा तू आणि मी मिळून द्वंद्व केलं होतं. तें प्रदर्शन पाहून प्रेक्षक भयभीत होऊन निघून गेले. तुझ्या शंख नादाने प्रत्यक्ष मीही चकित झालो. "

" आठवलं. त्यावरूनच पिताजींनी क्षत्रियाचा धर्म स्थापन केला, कुरु इक्ष्वाकु, नाथ आणि सूर्य या चार वंशाची त्यांनी स्थापना केली होती. त्या दिवशी आपण दोघेही अगदी बेहोश होऊन लढलो होतो. होय ना ! "

" आणि उद्याही तेच व्हावयाचें आहे. त्यावेळी आपण भाऊ–भाऊ होतो. आज तू राजा आणि मीही राजा. दोन राजे केवळ राज्य लोभा–साठी भांडले हा इतिहास उद्या लिहिला जावयाचा आहे. "

" भाऊ, आपण व्यथित झाला आहांत माझ्या प्रेमामुळं ! मी केवळ बाहुबली नाही. प्रजेचं मत मला विचारात घेतलं पाहिजे. क्षत्रियाच कर्तव्यही मला पार पाडलं पाहिजे. युद्ध अटळ आहे तुमचे चक्ररत्न तुम्हाला स्वस्थ बसू देणार नाही. मी तुमचा भाऊ असलों तरी शस्त्रास्त्राना तें कळत नाही. उद्यां तुम्ही सम्राट होणार आणि माझं काय होईल तें सांगतां येणार नाही, कुणासाठी कां होईना माझ्या नशीबी जें असेल ते भोगणं अगदी क्रम–प्राप्त आहे. "

" असं कां बोलतोस, भाऊ ? माझ्या जागी तू असतास तर माझ्या व्यथित हृदयाची कल्पना आली असती. हा विनाश होऊं नये असं मला वाटतं "

" तुमच वाटून काय होणार ? विनाशाच्या नावाखाली मी माझें राज्यविसर्जन करूं शकत नाही. साम्राज्याचा वरवंटा माझ्या इच्छेशिवाय मी माझ्या या चिमुकल्या राज्यावर फिरवू देणार नाही. क्षत्रिय मृत्यूला घाब–रला तर काय अनर्थ होईल, भाऊराया ? जगांत गुंडाचं राज्य होईल. नीच लोकांच्या हातीं राज्य तेव्हाच जात जेव्हा क्षत्रियाना विनाशाच्या आड लपण्यास जागा मिळते. माझ्या युद्धामार्गे विनाशाची सावली नाहीं– तर जिवंत व प्रकाशमान असे तत्व आहे. जगण्यामरण्याच्या–भीतीच्या कल्पना ज्याच्या उराशी असतात तो क्षत्रिय राहूं शकत नाही. राज्याचं सामर्थ्य म्हणजे जागृत शस्त्र सामर्थ्य. क्षत्रियानें हिंसा–अहिंसेच्या वादांत शिरणें म्हणजे गृहस्थाने ब्रम्हचर्याची चर्चा करण्यासारखें आहे. "

" ठीक आहे. भाऊराया, " भरत म्हणाले, " उद्यां सकाळीच तुमची–आमची आतां दृष्टादृष्ट ! माझ्या मनात संशय नव्हता. युद्धाच्या तयारीनेच मी आलों आहे. तुझी इच्छाच आहे तर युद्ध होईल. "

" माझेही सेनापती जर द्वंद्व पसंत करतील तर मलाही आनंद होईल. काय निर्णय होतो तो मी तुम्हास गेल्यावर कळवितों. "

असें म्हणून बाहुबली जायला निघाले. भरतानें पुनः एकदां त्याला हृदयाशी धरलें त्याच्या कपाळाचे चुंबन घेतले. भरताने आपली बहुमोल कुंडलें त्याच्या कानात घातली गळयातील रत्नाचा हार त्याच्या गळयांत घातला. सीमेपर्यंत बाहुबलीला फारच इतमानानें पोचविण्यात आले. हजारो हत्तींनी सोंडेत धरलेली कमले त्याच्यावर ढाळली सहस्त्र शंखांचा नाद झाला. दूर जाईपर्यंत भरत त्या पाठमोऱ्या भावाकडे पाहात राहिला जणु त्याचा आत्मासोडून त्याला चालला होता

## युद्ध — पर्व

भल्या पहाटें पासून दोन्ही सैन्याच्या छावणीत गडबड चालू झाली. नगारे झडू लागले. हत्तींचा आवाज, घोड्यांचें खिंकाळणें सुरू झालें. माण–सांची ये–जा सुरु झाली. अद्याप पूर्णपणें फटफटलें नव्हतें. सैनिकांना लढा–वयाचें नसल्यानें ते थोडे आळसावले होते. त्यांच्या हालचालींत उत्सुकता असली तरी घाई नव्हती. कांही सैनिकांनी सेनापतीचे मनांतून आभार मानले होते पण जे शूर होते ते मनातून लढण्याची इच्छा करीत होते. अयोध्येपासून पायपीट करीत करीत उगाच का ते पोदनपुरांला आले होते?

एक सैनिक दुसऱ्यास म्हणत होता— युद्ध विरामाची ही अजब युक्ति आहे. ज्याच्या डोक्यातून ही निघाली ते डोकें फारच सुपीक असलें पाहिजे."

दुसरा त्याला डोळ्यानें खुणावत म्हणाला, 'असें बोलू नकोस प्रसेन–जित म्हातारा इकडेच येत आहे तुझें शब्द कानी पडलें तर जीभच तोडून टाकेल तुझी तो.'

मग ते दोघे हळूहळू कुजबुजू लागले. तो सांगत होता. अगदी हळू आवाजांत—

" दोघे भाऊ म्हणे दृष्टियुद्ध, मुष्टियुद्ध व जलयुद्ध खेळणार आहेत. त्यांत ज्याचा पराभव होईल त्यानें...... "

त्याचें वाक्य मध्येंच तोडीत तो म्हणाला, " अरे ही धूळफेक आहे. कसचें युद्ध नी काय ? पूर्वीच मग असे का केले नाही ? एवढा खटाटोप केला आणि म्हणे युद्ध नाही. दोघाचेच युद्ध ! अगदीच अजब प्रकार आहे हा ! "

अशारीतीने काही सैनिक सुरुवातीस या प्रकाराला नाखूष होते. परंतु जिवंत परत जाण्याची आशा कुणाला नसते ?

• • •

सूर्योदय झाला होता. सूर्याचें परिवर्तन नेहमीप्रमाणेच होते पण आजचा सूर्य जें पाहील तें कल्पांती त्याला पहायला मिळणार नव्हते. रणांगणाचें रूप क्रीडांगणांत पालटले. सर्वत्र हर्ष आणि आश्चर्य पसरले होते.

श्री भरतेशानी युद्धाची वस्त्रें चढवली, मनात श्रीवृषभांचें स्मरण, चालीत सिंहाचें गांभीर्य व आत्मविश्वास. हृदयात बंधुप्रेमाचे अमृत. रणांगणात सहस्त्रावधि सैनिक केवळ प्रेक्षक म्हणून बसले होते. त्यांच्या जीवनातही हा पहिलाच प्रसंग होता. इतिहासांतही पहिला. भाऊ–भाऊ युद्धार्थ बद्ध परिकर झालेले. चक्रवर्तित्वाच्या कल्पनेने विजय यात्रा करणारे भरत आणि त्या सुंदर विजयाला जणुं नजर लागू नये म्हणून गालबोट लावणारे श्री बाहुबली !

भरताच्या हृदयात वेगवेगळ्या भावनांच्या तारा छेडल्या जात होत्या.

कधीं संवादी सूर बाहेर पडत तर कधी विसंवादी ! महस्त्रावधी सैनिक माझा पराभव आज पाहाणार ! माझ्या सर्व गात्रांतून पसरलेली शीतलता ते पाहणार ! कातर झालेले हे रोमांच त्याना एकदा पहावयास मिळणार ! बाहुबलीचा पराभव झाला तर तो माझाच ! शेवटी इक्ष्वाकूच्या इतिहासातील पानें काय सांगतील जगाला ?

त्याच वेळीं महामंत्री तेथे आले. श्रीभरतेशाच्या पायाना वंदन करून समरांगणावर चलण्यास विनंती केली. श्रीभरतेश मंचकावरून उठले. हाता-तील कमळाचा सुवास त्यानी घेतला. नतर त्यांच्या चेहऱ्यावर नेहमीचें दिव्य तेज पसरले. मन प्रसन्न झाले. संभ्रम, संशय, ममता, मोहपाश सारे सारे मेघासारखे पळून गेले व पराक्रम सूर्याला त्यानी वाट करून दिली.

वाद्ये वाजू लागली. शंखाच्या ध्वनीने सारे अंबर कोसळते की काय असें वाटले. हत्तीनी सोंडा वर करून प्रचंड ध्वनि केला. भरजरी पीतांबर, रेशमी उपरणें, हातात फक्त एक कमळ असलेले भरत रणभूमीवर आले एका सुवर्णखचित आसनावर ते जाऊन बसले.

श्री बाहुबलीची स्वारी ही तेथें आली वीर माणूस केवळ पराक्रमा-साठी जन्मास येतो. जन्म-मरणासारख्या तुच्छ गोष्टीचा, जय-पराजय सारख्या अनिश्चित गोष्टीचा तो विचार करीत नाही. अशा प्रकारची भावना त्यांच्या चेहऱ्यावर विलसत होती. पोलादी बाहू हलत होते. प्रचंड हत्तीच्या सोंडेप्रमाणे ! उंच व सरळ नासिका पाहून जणुं स्वाभिमानच पुंजीभूत झाला आहे. गोळा झाला आहे असें वाटे. विशाल मस्तकावर पत्नीने लावलेल्या गधाक्षता अद्यापि तेथेंच चिकटून होत्या. दिव्य मस्तका-वरील ते प्रेमचिन्ह जणु वज्राचें कवच होतें. ममतेचा तिसरा नेत्र देऊन पत्नीने पतीला रणांगणावर पाठविले असल्याचा भास होत होता.

*श्रीबाहुबलीच्या सैन्याने त्यांचा जयजयकार केला.*

श्रीबाहुबलींनी भरताला नमस्कार केला. भरताने आशीर्वाद दिला—
" विजयी हो "

मेनापती प्रमेनजित भग्नाकडे पहात राहिला महाराजानी ' विजयी हो ' असे का म्हणावे याचे त्याला कोडे पडले. भ्रातृत्वाची परमावधीच झाली होती.

थोड्याच अवधीत श्रीभरतानी युद्धोचित पोशाख केला. मखमाली लालरंगाचा अंगरखा त्यानी घातला होता अंगावर सूर्याची किरणे पडल्याने अधिकच तेजस्वी दिसत होते

बाहुबलीने केशरी रंगाचा अंगरखा घातला होता. वज्राप्रमाणे भरदार व पिळदार बाहु पाहून प्रत्यक्ष यमालाही भीति वाटावी विशाल वक्ष: स्थलावर असलेल्या रोमराजीमुळे ते वक्ष अधिकच सुंदर दिसत होते दोन प्रचण्ड कुंजरच युद्ध करावयास सज्ज झाले असल्याचा भास निर्माण झाला.

पहिले दृष्टियुद्ध ! दोघाच्या नजरा परस्पराच्या नजराशी भिडल्या. विशाल नेत्रातील तेजस्वी गोलकच जणु ते पहात होते कुणाची पापणी अगोदर लवेल त्याचा पराजय होणार होता भरताची दृष्टि बाहुबलीच्या नेत्रातून जणु त्याच्या हृदयात प्रवेशली होती. सूर्यकिरणाचा बारीक कवडसा आत पडून अधारी जागाही प्रकाशमान व्हावी तसे भरताला वाटले. सारे साम्राजच याला अर्पण करावे. शेवटी, राज्य मी केले काय किंवा बाहुबलीने केले काय? दोघात अंतर आहे असे भरतास वाटेना!

समयासमयाला दोघाच्या डोळ्यातील तेज वाढतच होते. डोळ्याच्या पापण्यावरील स्नायूची पकड ढिली होण्याऐवजी अधिकच घट्ट झाली होती भुवयाच्या सावलीत दोन सूर्य गोलच जणु विसावले होते

भरताचे भावविव्हल नेत्र बाहुबलीचे बालपण वाचण्यात रंगले होते. अनेक सुखदु:खाच्या आठवणीने सुखावत होते. तोच नेत्राजवळील एका भागावर त्याचे लक्ष गेले ती एका बालपणीच्या खेळाची आठवण होती धनुष्य-बाणाचा खेळ रंगात आला असता भरताचा एक बाण उजव्या डोळ्याच्या पापणीजवळील भागास चाटून गेला होता. त्याचीच ती

आठवण ! भरताचे जग वेगळे होतें. बाहुबलीशी स्पर्धा चालू आहे हें तो विसरला देखील.

बाहुबलीचे डोळे एखाद्या प्रमत्त हत्तीने रोमलेल्या डोळ्याप्रमाणे लाल झाले होते. दोन संतप्त, जहरी अग्नि गोलच तो जणु फेकत होता. त्याच्या डोळ्यांतील दीप्ति प्रखर होत होती. निखारे फुलत होते. स्फुलिंग बाहेर पडत आहेत असा भास निर्माण झाला होता. बाहुबली वयाने लहान असला तरी भरतापेक्षां उंचीने मोठा होता. श्रीभरताला नजर वर करून दृष्टियुद्ध खेळावें लागत होतें त्याच्या डोळ्याच्या स्नायूवर ताण पडत होता. कानशिलावरील शीर ताठलेली होती. बुबुळें कठोर होत चालली. बाहुल्या विस्फारित झाल्या. ताण असह्य झाला. मानही अवघडायला लागली होती. पण भरताचें तिकडे लक्ष नव्हते. लहान भावाच्या तेजस्वी डोळ्याकडे पाह-ताना तो अधिकच भाऊक झाला होता पापण्याच्या कडा ओलावू लागल्या डोळे पाणवठले. डबडबले स्थिरावले. बाहुबलीची मूर्ति अदृश्य झाली. त्याने पापण्या मिटून पराभवाचा स्वीकार केला.

चित्रित झालेले प्रेक्षक हर्षित झाले. बाहुबलीच्या सैन्याने जयघोष केला. पट्खडाला जिंकणारा अधिपति सम्राट् अपेशी ठरला. सेनापतींनी माना खाली घातल्या. पण भरताचें मुळी तिकडें लक्षच नव्हते. बाहुबलीच्या विजयापुढें स्वतःचा पराभव त्याना तुच्छ वाटत होता. डावा हात उजव्या हाताचा पराभव कसा करूं शकतो ? आरशांतील स्वतःची प्रतिमा स्वतःचा पराभव करू शकेल कां ? याचीं उत्तरें शोधण्यात भरताचे मन गुंतले होते

तोंच दुसऱ्या युद्धाची घोषणा झाली. जलयुद्ध ! जल युद्धासाठी जवळ-चेंच पद्म सरोवर निवडण्यांत आले युद्धासाठी मुद्दामच ते स्वच्छ करण्यात आलें होतें जलयुद्धाचे आव्हान बाहुबलीने पाण्यात उडी मारून दिले बाहु-बलीच्या उडीने सरोवरातील पाणी घाबरले होते सर्वत्र वलये निर्माण झाली होती. लाटा उचंबळत होत्या " तु धन्य आहेस " असा ध्वनि काठावरील दगडावर आपटणाऱ्या लाटा म्हणत होत्या. मासे घाबरून गेले होते.

श्रीभरताने हंसत हंसत तेही आमंत्रण स्वीकारले. माडपा ·पालटून श्रीभरताने जलाशयांत सूर मारला. प्रचण्ड वेगाने एखादी वीज कोसळावी,

एखादा हिमगिरी वेगाने वहात जावा, असे तें दृश्य होतें.

भरतेश्वराने श्रीवृषभाचें स्मरण केले पोहत पोहत पाण्याचा मारा ते बाहुबलीवर करूं लागले. दोन्ही हातानी जलाशयातील पाणी ते बाहुबलीच्या अंगावर फेकत असता एखादा प्रचण्ड हत्तीच जलक्रीडा करीत असल्याचा भास निर्माण झाला होता.

बाहुबलीने आपल्या पोलादी हातानी पाणी फेकायला सुरुवात केली. तोंडावर येऊन आदळणाऱ्या त्या पाण्याने श्वास घेणेही दुर्लभ करून टाकले. मुसळधार वर्षावाने कुरळ्या केसाच्या बटा मस्तकावर रागू लागल्या. एखाद्या हत्तीने सोंडेंत पाणी घेऊन राज्यलक्ष्मीचा अभिषेक करावा तसा अभिषेकच जणु बाहुबलीने चालविला होता. सूर्याच्या किरणानी त्या पाण्याचे स्वरूपच पालटून टाकले होते. असख्य मुक्तावलीच्या वर्षावांत त्याचे रूपातर झाले होतें. भरताचा सोनेरी दिव्य देह मौक्तिकानी नटल्याप्रमाणें सुदर दिसत होता. बाहुबलीने सतत चार घटका पाण्याचा मारा चालू ठेवला. सारे सैनिक त्या पराक्रमाचा देखावा पाहून चकित झाले होते.

भरताचेही प्रचंड बाहू त्या पाण्याचा वेग स्वत: फेकलेल्या पाण्यामुळें आवरून धरण्याचा निष्फळ प्रयत्न करीत होते. त्या परस्परांच्या जलवर्षा-वाने भरताची सपूर्ण काया न्हाऊन निघाली. बाहुबलीच्या वज्रमय हाताना विश्राम नव्हता. जणु सहस्रहातानीच तो वर्षाव करीत होता ! भरताच्या जलवर्षावाचें पाणी जेमतेम बाहुबलीच्या हनवटीपर्यंत पोचत होते शिवाय सूर्याचीं किरणें त्याच्या पाठीला स्पर्श करीत होती. जणु प्रत्यक्ष सूर्यच सहस्र हस्तांनी त्याला सहाय्य करीत होता भरताच्या चेहऱ्यावर मात्र सूर्याची किरणें सरळ पडत होती. त्याच्या डोळ्यासमोर फक्त प्रकाशमय जलवर्षाव एवढेंच काय ते दृश्य होतें. बाहुबलीचा चेहरा ही त्याला दिसत नव्हता. तो व्याकुळ झाला होता. पराभवाच्या दु:खापेक्षा त्याची काळजीच त्याला वाटत होती. भावाच्या पराक्रमाने तो हर्षित झाला होता. लहान भावाच्या पवित्र हातानी पुन: केव्हा आपला अभिषेक होणार ? हीच संधि आहे. हाच अमृतयोग आहे. शिष्याकडून पराभव पावण्यांत गुरूला, सौभाग्यपूर्ण सद--

णात स्त्रीला, लहान भावाकडून पराजित होण्यात मोठ्या भावाला आनंद वाटला पाहिजे. पण अशा विचाराचा उदय म्हणजेच अमृतयोग ! संस्कृति याहून काय वेगळी आहे ? आत्मयज्ञाला ज्या संस्कृतीत स्थान आहे, बलि-दानाची जेथें परंपरा आहे, हुतात्म्याची कीर्ति-काव्यें जिथें गायली जातात तीच कर्मभूमि, तीच धर्मभूमि !

बाहुबलीच्या प्रचंड हाताचा उद्योग अखंड चालू होता. प्रेक्षकांना केवळ बाहुबलीच दिसत होता पाण्याच्या वर्षावात भरत लुप्त झाला होता. मात्र भरताला बाहुबली दिसत नव्हता त्याचे मन कातर झालें. अधीर झालें. श्वास घेतां येईना. कांहीच दिसेना. तेव्हा भरताने पुन: विजयाची माळ बाहुबलीला घालून त्याचा गौरव केला.

बाहुबलीला हें सारे नाटकी वाटत होतें प्रतिपक्षी आपल्यावर रागा-वत नाही. आपल्या पराक्रमाने त्याच्या ठिकाणी द्वेषाची भावाना निर्माण होत नाही म्हणून त्याला वाईट वाटलें असावे. तो सिंहासारखी गर्जना करून म्हणाला—

" मला तुम्ही दिलेला विजय नको. मी मिळविलेला विजय, माझ्या पराक्रमी बाहूंनी मिळविलेला विजय मला हवा. कृपेचें दान घेण्याइतका मी नादान नाही. ही युद्धाची चेष्टा आहे. माझ्यावर हा अन्याय आहे. यापुढील युद्ध निकरानें लढलें जाणार असेल तरच त्याला माझी मान्यता राहील. नाहीतर पुन: घनघोर संग्रामाच्या भेरी झडू लागतील व भरतासहित साऱ्या सैनिकांना यमसदनी पाठविण्याचा आदेश मला सैनिकाना द्यावा लागेल. सिंहाच्या गुहेत शिरणें सोपें असते पण तेथून निघून जाणे कठीण हें सर्वांनी नीट लक्षांत ठेवावें. "

श्रीभरताला भावाच्या या उद्गाराची कीव आली. दोन्ही युद्धांत पराजय पत्करूनही श्रीबंधूंची समजूत निघत नाही, याचें त्याला मनोमन फारच वाईट वाटलें. जीवनातील गुतागुंत संशयपिशाच्चाने जेवढी अनाकल-नीय होते तेवढी कशानेही होत नसेल ! सुखाच्या संसारांत, प्रेमपूर्ण वागणुकीत, ममतेच्या साम्राज्यांत संशयाचें विष कालवू लागलें की माणसाची

प्रमत्त झालेल्या दोन मुझाराकडे वळले. काही सैनिकाची हृदये धडधडत होती. शूर हृदयांचा आनद गगनांत मावत नव्हता

भरताकडील मेनापति आतुर झाले होते. दोन युद्धातील पराजयानी त्याचे चेहरे कोळमे झाले होते. उगीच आपण हें पर्यायी युद्ध सुचविले. यापेक्षा संहार परवडला असता. चक्रवर्तीचा पराजय म्हणजे फारच मोठी गोष्ट होती. जगाच्या इतिहासात नमूद होण्यासारखी दुसरा मेनापति प्रमेनजिताला उद्देशून म्हणाला – " महाराजाचा पराभव झाला तर काय होईल......? "

" काय होणार ? ही विजयी तोंडें घेऊन का अयोध्येला परतायचे ? जे भरत करतील तेच आपण करावे "

" बाहुबलीचा पराभव यात होईल असे नाही का काही करता येणार ? "

प्रमेनजिताला वाटले — " असल्या विचार माझ्या डोक्यांत का नाही आला. "

नंतर तो म्हातारा म्हणाला; " उपाय आहे पण भरताला आवडला पाहिजे: शिवाय, हा त्याच्या घरातील प्रश्न आहे. श्रीबाहुबलीच्या सैन्याचा पराभव करून त्याला कैद करणे शक्य आहे. पण धर्ममर्यादा उल्लंघणे भरताला मान्य होणार नाही...... " पुनः तो खाकरून म्हणाला, ' देवाने दिलेले " महाचक्र " प्रभूच्या जवळ उभे करावे. प्रभू संतापले की चक्राला तो संताप सहन होणार नाही आणि पराभव करणाऱ्यावर तें चाल करून जाईल. "

" हा एक मार्ग आहे पण चक्राला रणमैदानांत आणण्याची कामगिरी तुम्हीच बजावली पाहिजे. खरच तुम्ही जा आणि वाटेल तें करून तें चक्र आणून येथे उभे करा "

प्रमेनजित चक्रगृहाकडे जायला निघाले. त्यानी सर्वांचे डोळे चुकवून त्या चक्रगृहांत प्रवेश केला. देवसंरक्षित चक्र तेथे थडपणें उभे होते. हात जोडून तो म्हणाला—

" चक्रा, तुझा येथें येऊन काय उपयोग ? प्रत्यक्ष तुझे स्वामी तिकडे पराभूत होत आहेत, आणि या ठिकाणी तू स्वस्थ आहेस ? तू युद्धात नेहमी अग्रभागी असायचा. मग आजच का मागे ? हे चक्राच्या संरक्षक देवतांनो, माझे म्हणणें तुम्हांस ऐकू येत आहेना ? मी चक्रवर्तींचा प्रमुख सेनापति आपणाला विनंती करतों की श्री प्रभूच्या जवळ नेऊन हें चक्र उपस्थित करा. श्रीप्रभूंना त्याची केव्हां आवश्यकता भासेल हें सागता येत नाही. "

सेनापतीची विनंती ऐकून देवरक्षित ते महान अस्त्र, चक्र, श्रीभरता-कडे जायला निघालें.

• • •

इकडे दोन अजस्त्र सिंहांची लढत चालू होती. ते दोघेही महापराक्रमी वीर परस्परांच्या कानशीलावर आपल्या अजस्त्र बाहूंचे तडाखे देत होते हात बगलेत धरून पिरगाळत होते. भरताने बाहुबलीच्या पंजात आपला पंजा अडकावून त्याच्या पंजाला पीळ देताच बाहुबलीच्या हातात अनंत वेदना निर्माण करणारी कळ उठली. असह्य वाटणाऱ्या त्या [illegible] बाहुब-लीने हिसडा देऊन नष्ट केलें. आणि वळून त्याने भरतराजर्षींची कंबर आपल्या दोनही बाहूंनी घट्ट धरली. प्रचंड वृक्षाच्या बुंध्याला महाकाय विशाल अजगराने वेढा घालावा, सिंहाने हत्तीच्या पाठीमागून येऊन त्याच्या गंडस्थ-ळावर आघात करावा तसे झाले. भरत क्षणभर एखाद्या वज्राच्या खांबा-प्रमाणे उभे होते. आतली सर्व ताकद खर्चून बाहुबलीने त्यांना वर उचलण्याचा विफल प्रयत्न केला. तोंच ती गळाची मिठी सोडवून घेऊन भरत बाहु-बलीसमोर उभे ठाकले

आपणास वर उचलून भूमीवर आदळण्याचा मनोदय भरताच्या नजरेस आला. अभिमान, दंभ, अहंकार याचा पगडा बसला म्हणजे माणस काहीच समजू शकत नाही. त्याची खरी ज्ञानचेतनाच थिजून जाते. त्याच्या सर्व भावना काजळून जातात. अहकार म्हणजे सर्व दैवी व मानवी गुणांवर होणारा वज्रपात ! भरताचे मन जागृत झालें. त्याच्या मनात असंख्य विचार तरंग उठूं लागले. निर्मळ आकाशांत असंख्यात पक्षांनी फडफड करून शांतता भंग करावी त्याप्रमाणें त्याचे अंतरग उद्वेगाला प्राप्त झालें. एखादा प्रचण्ड हिमनग तीव्र वेगाने जाऊ लागावा त्याप्रमाणे श्रीभरतानें बाहुबलीवर चाल केली. अपमानाचे आतापर्यंत त्याला कांहीच वाटलें नव्हते— वाटणार नव्हतें. परतु आपल्या थडगणामुळें बाहुबलीवर होणारा परिणाम विपरीत होत आहे, याचे त्याला स्मरण झालें. या बच्या सैनिकानी उघड्या डोळ्यांनी बधू—बधूतील हे अशुभ द्वद्व मिटक्या मारून पहात रहावें, दोन कोंबड्यांना झुजत ठेवून त्याची केवळ मौज लुटावी ही भावनाच भरताला अत्यत तापदायक होती. कोणत्याही पक्षाकडील सैनिकानी सहर्ष ध्वनि केला की असंख्य नागानी दंश करावा असलें तीव्र दुःख त्याला होई. श्रीवृषभदेवांचा हाच कां मी भरत ? ज्या भरताच्या राज्यात भाऊ–भाऊ नसलेल्या मानवांनीही ममतेनें आणि ममतेने वागावें, कसलीही दुजी किंवा खुजी भावना हृदयाशी बाळगू नये, त्याच भरतानें भावावर विजेसारखें तुटून पडावें त्याचा अहकार — त्याचें अज्ञान, जग तो लहान म्हणून क्षम्य करील— पण माझा अपराध ? मोठेपणाचा हा तुरा धारण केल्यावर केवळ तोंड दाबून बुक्यांचा मार सहन करण्यापलिकडे आपल्या हातात काय आहे ? नियतीचा हवाला देऊन मी मोकळा होऊं शकतो कां ? क्षत्रियत्वाचा दाखला देऊन मी बधुद्रोह व बधुवधाचें अमगल कृत्य करू शकतो का ? कायद्याची सबब सागून माणुसकीला लांच्छनास्पद ठरणारें निर्घृण पाप मी करूं शकेन कां ? श्रीवृषभा, मला सर्वत्र अंधःकार दिसत आहे. मला प्रकाश पाहिजे– प्रकाश ! मानवाला कुंठीत करणारी ही नियती नष्ट करण्याचे सामर्थ्य मला पाहिजे. रक्ताळलेल्या हातानीं जगण्याची माझी इच्छा नाही. माझ्या प्रिय बधूने

मला पाताळांत फेकून दिले तरी चालेल. पण असले नियती — नियंत्रित जीवन मला नको. जें जीवन मी समजू शकत नाही, ज्याच्या परीणामाचा सुगावा मला लागत नाही, ज्याचे मला अस्तित्वही तापदायक आहे, असें जीवन मला नको.

भरताची पावले नीट पडत नव्हती सारे सेनापती म्हणत होते— आज भरतराजाना झाले आहे तरी काय ? धैर्याच्या पुतळ्यालाही ममतेचे, सम्रमाचे बंध तोडतां येत नाही काय ? दिव्य शस्त्रास्त्रे जवळ असूनही भरत त्याचा उपयोग का करीत नाही. "

इतक्यांत भरताचा तो विशाल देह बाहुबलीने आपल्या अजस्र हातांनी उचलला. मेरु शिखरालाच जणु बाहुबलीने आपल्या प्रचंड बाहूत धरले होतें. दोन्ही हातांत धरलेल्या भरताला बाहुबलीने गरगरा फिरविलें. बाहुबलीच्या अजस्र सामर्थ्याने सीमा गांठली होती. त्याचे सारे सैनिक जय-जयकार करण्यांत गुतले होते. टाळ्याचा कडकडाट, वाद्याचा गजर यानी आकाश भरून गेलें होतें.

श्रीभरताचे मन अद्यापही विचारचक्रांत गुतले होतें. बाहुबलीच्या पराक्रमानें संतुष्ट व्हावें की अपमानें संतप्त व्हावे, की ज्या चक्रामुळें आपण या स्थितीला प्राप्त झालो तें चक्रच लायाडावे ?

नेमके त्याच वेळी शस्त्रागारातून भयानक आवाज करीत ते चक्र बाहेर पडले. त्याच्या फिरण्याच्या वेगाने होणारा आवाज दाही दिशांची कपाटे फोडून टाकतो की काय असें वाटलें. भरताने त्या चक्राकडें पाहिलें. त्याच्या विचारांत बदल होऊं लागला. या चक्राने सर्व सैनिकाना यमसदनी पाठवून गावाला कवटाळावं असा विचारही क्षणभर चमकून गेला पण त्याने प्रश्न सुटणार नव्हता. चक्रामुळेंच दिग्विजयाची कल्पना त्याला सुचली होती. याच चक्रामुळें हा अटळ असा युद्धप्रसंग निर्माण झाला होता. एके-काळी अत्यंत आवडते असणारें तें चक्र आता भरताला विषाप्रमाणे अप्रिय वाटूं लागले. कुळाकुळांतील द्वेष पसरविणारे भावांचं सुख, त्यांचं प्रेमही अबाधित व अखंडित न ठेवूं शकणारें हें चक्र आहे की यमाच्या रथाचें चाक? अनीतिप्रवर्तनाचें चक्र !

( अधर उचललेल्या बंधूचा याहून अधिक अपमान आपण करूं नये असा सद्विचार अहंकाराच्या चिखलांतूनही उगवला.) जमीनीवर आदळून जें यश त्याला मिळणार होते ते त्याला तत्पूर्वीच मिळालें होतें. साम्राज्य-लोभाला पायबंद घालणारा पहिला प्रजातन्त्री राजा, चक्रवर्तींच्या धवलयश चंद्राला नेहमीचाच डाग लावणारा प्रतापी राजा म्हणून कल्पांता-पर्यंत त्यांची कीर्ति उरणार होती. देवदैत्यांच्या उरीही धडकी भरेल असें पौरुष आणि पराक्रम त्यानें दाखवून दिलें होतें. राजा म्हणून एक कर्तव्य त्यानें पार पाडलें होतें. परंतु बंधू म्हणून एक कर्तव्य पार पाडावें असाही विचार निर्माण झाला. श्रीभरताच्या सद्भावनेचें अंकुर जणु बाहुबलीच्या हृदयांत उगवलें होते. त्याने भरताला अलगद उचलून बाजूलाच मांडलेल्या आसनावर बसविलें.

काय घडत आहे याची कल्पना येण्यापूर्वीच एकामागून एक गोष्टी घडत होत्या.

० ० ०

\ असें होतें न होतें तोंच त्याचवेळी ' चक्र ' तेथें आलें. त्या चक्राच्या आवाजानें दिशा बधिर झाल्या. धारा घाबरून सैरावैरा पळू लागल्या. सैनिकांची हृदयें घाबरून गेली आता भरतानें मनात आणल्यास क्षणात सर्वांची शिरकमलें पृथ्वीदेवतेला वाहून तो या पराभवाचें उट्टें काढू शकणार होता. आपल्या दैवीबलानें या मानवी अहंकाराची नांगी तो पुरती मोडून काढू शकत होता.

पण भरताचे मन अद्याप दिव्य व्यामोहाच्या रेशमी बंधनांतून बाहेर पडले नव्हते. सारी सत्ता, सारा पराक्रम, सारी शस्त्रास्त्रें ही खेळणी असून त्यापायी मानव त्याचा गुलाम झाला आहे तो या शस्त्रास्त्रामुळ खुजा झाला आहे त्याचें मानवी मन सैतानाच्या पूजेंत मग्न झाले आहे

या साऱ्या अपमानाचें खापर शेवटी तो चक्रावर फोडत होता हें चक्र आहे की मानवतेच्या अमृततत्वाचा शिरच्छेद करून त्याचे रक्तप्राशन करणारी देवता ! याच चक्रामुळें सर्व दुष्कृत्याची मालिका सुरु झाली याच चक्रामुळें सम्राट होण्याची स्वप्ने मी पाहिली. याच चक्रामुळें बधूचा कोप मी ओढवून घेतला. माझे अत्यंत आवडते नव्वद भाऊ अपमानित होऊन संन्यासी झाले. हेच ते दुष्ट चक्र असे म्हणून जवळ आलेल्या त्या चक्राला त्याने लाथ मारली. अपमानित होऊन ते चक्र बाहुबलीच्या रोखाने निघाले.

भरत दिङ्मूढ होऊन डोके दोन्ही हातांत धरून विमनस्क स्थितीत बसून होता.

भरताला अलगद बसवून बाहुबलीने पाठ फिरविली होती. इतक्यात आपल्या पाठीमागून भरताने चक्र आपल्यावर फेंकले आहे अशी त्याची सम-जत झाली. मनात उगवणारा सद्‌भाव कोळपून गेला. तो वळून म्हणाला—

" शाब्बास बंधुराजे, शाब्बास, पाठ वळविलेल्या बधूवर शस्त्राचा ...घात करून तुम्ही पराक्रमाचे तोंडच काळे केले आहे ही दैवी अस्त्रें माझें काहींच बिघडवूं शकत नाही. मी तुझा रक्ताचा भाऊ आहे पण विवेकभ्रष्ट माणसाला अवधान राहात नाही हेंच खरे ! अरे, माझे राज्य बळकावण्या-साठी असलें अधर्मी कृत्य तरी करायस नको होते. परतु मला माहिती आहे की तुझ्या डोक्यावर साम्राज्य लालसेचे भूत सवार झाले आहे. त्या तृष्णेला बळी पडून प्रत्यक्ष बंधूवरच तू चक्र फेंकावेस ना ! ........"

भरताच्या हृदयाला वेदनेचे तीव्र कढ येत होते. जे करावे ते नेमकेच उलट होत होते. दैवच जणु हात धुवून त्याच्या मागें लागलें होते. तो उठून उभा राहिला त्याने बाहुबलीचे बाहु धरले व तो म्हणाला—

" तूं तरी असे बोलूं नकोस. माझ्या भावनांना तू तरी जाणशील अशी माझी भोळी भावना होती. "

" बंधुश्रेष्ठ, तुमच्या तोंडून असें कपटी उद्‌गार निघावेत याचे मला आश्चर्य वाटतें. खरें पाहिले तर तुमचा पराजय करून षट्खंडांचा मी अधिपति झालों आहे क्षणभराचा अधिपति काय किंवा अनंत काळचा अधिपति काय, यांत मला फरक वाटत नाही. साम्राज्य लोभानें तुम्ही असें आधळे झाला असाल असें मला वाटले नव्हते. माझें चिमुकलें राज्य जिकण्यासाठी तुम्हाम काय किंमत द्यावी लागली हें समजण्याइतके तुम्ही अनभिज्ञ नाही. मी तुमच्या राज्य लालसेचा धिक्कार करतो अशा राज्य तृष्णेपेक्षा मी मरण पत्करेन. तुझ्या या कलंकित भूमीवर मी अद्याप जिवत आहे, हें माझ्या पापाचे फळ मी समजतो. तुझ्या सारखी दैवी अस्त्रें मजजवळ असती तर मी म्हटलें असते— हे शस्त्रास्त्रांनो, तुम्ही माझ्यावरच तुमच्या क्रूरतेची बरसात करा. त्या दाहकतेतही माझें बंधुप्रेम अढळ राहिले असतें .. "

" पुरे. पुरे बाहु, माझ्या व्यथित भावनाना डागण्या देऊ नकोस. साम्राज्यलोभ मला नाही. चक्राचा लोभ मला नाही. मला तुझें राज्य नको. काही नको. तू माझा व्हावास. माझें तुझें नाते अभंग राहावें. "

" हे सारे मायावी बोलणे मला समजतें. त्यातील हेतू मला उमगतो. राज्य–लोभाने तू असा अंध होशील हें मला कळले नाही. असो, " तो साऱ्या सैनिकांना उद्देशून म्हणाला, " सैनिकानो, माझें राज्य या सत्तालोलुप, साम्राज्य निर्मात्या बंधूला मी अर्पण करीत आहे ही भूमी भरताची आहे. माझी नाही. पृथ्वीवरील अणुरेणू भरताचा आहे. त्यावर मी स्वतंत्रपणें जगू शकत नाही. त्याच्या हुकुमशाहीत माझें चित्त विकल झालें आहे. एक क्षणभरही भरत रक्षित भूमीवर मी जिवंत आहे यासारखी शरमेची व अपमानाची गोष्ट माझ्या जीवनात मी अनुभवली हाच माझा सर्वात मोठा पराभव आहे. सैनिकानो, या माझ्या सम्राटाचा जयजयकार करा. पृथ्वीवर यावच्चंद्र दिवाकरी याचेच अधिपत्य राहील असें समजून तुम्ही त्याचे व्हा. आतां मी तुमचा राजा नाहीं. या अनंत पृथ्वीवरील मी क्षुद्र कीटक आहे. भरताच्या इच्छे–

विरुद्ध श्वासघेण्याचा अधिकारही मला नाही ? धिक्कार करतो मी या साऱ्या साम्राज्य प्रवृत्तीचा. धर्म, संस्कृती, वर्ण, पराक्रम यापैकी कशाचा तरी आधार घेऊन स्वतःची अधिसत्ता अखिल पृथ्वीवर स्थापन करण्याच्या मनोवृत्ती मागील हेतू मला कळाला आहे. "

असें म्हणून आपलामुकुट त्याने जमीनीवर ठेवून पायाने लाथाडला. आणि एका पांढऱ्या शुभ्र घोड्यावर बसून तो दक्षिणेकडील भयानक जगलांत अदृश्य झाला.

## प रा भू त — वि ज य

या साऱ्या प्रकारानें भरताचें मन उद्विग्न झालें. दिङ्मूढ होऊन एखाद्या वेड्यासारखा बाहुबली गेला त्या दिशेकडे तो पहात राहिला. जणुं त्या दिशेने त्याच्या लाडक्या भावास आपल्या उदरांत लपवून ठेवलें होतें. भरताचा सारा उत्साह, सारी शक्ति, सारा आनंद उथळ झाला होता. त्याला अन्नांत गोडी वाटेना, झोंप येईना, कुणी समोर उभा असला तरी तें साहवेना. बाहुबलीचें चिमुकलें राज्य त्यानें मिळविलें पण हृदयांतील चैतन्य गमावून ! प्रिय अशा बंधूस गमावून.

तीन रात्री आणि तीन दिवस तो शोकमग्न अवस्थेंत होता. कशाचेंच भान त्याला उरलें नव्हतें. काय घडलें ? कसें घडलें या विचारांनी सुरू झालेली त्याची विषण्णावस्था — विपन्नावस्था तीव्रतर उद्वेगाच्या लहरींवर हेलकावे खात होती. बाहुबलीचें हें वृत्त श्रीवृषभांना कळणारच. ते आपणास काय म्हणतील ? त्यांच्या नंतर भावांना सांभाळून घेण्याचेंही मला जमलें

नाही. माझें सारें सामर्थ्यंच आज ग्रहण लागल्याप्रमाणें काळवडून गेलें आहे.

अनेक प्रिय सामतांनी त्याची समजूत काढण्याचा प्रयत्न केला. त्याच्या मनास बरे वाटेल अशा काही गोष्टी करून पाहिल्या. पण मना-प्रमाणें काहींच घडेना, जमेना. प्रचंड आवेगाला थांबविण्याचें सामर्थ्य कुणाच्या अंगी असणार !

हळुहळू विषाद लोपला. विवेकसूर्य उदित होऊं लागला.

भरताने हांक दिली – " प्रसेनजित "

" जी, महाराज. मला बोलावल ? "

" बाहुबली कोणत्या दिशेने गेला, कोठे गेला याचा शोध केला ? "

" एक सहस्र घोडेस्वार त्याच शोधांत गुतले आहेत. "

" अद्याप तपास चालू आहे...? "

" होय, महाराज, कोणताही स्वार अद्याप परत आला नाही. "

" माझा घोडा तयार करा. मी त्याच्या शोधार्थ बाहेर पडेन..."

श्रीभरताने स्नानादिक कार्यें उरकून पांढरी रेशमी वस्त्रें घातली चक्रवर्तीत्वाचें एकही चिन्ह त्याच्या अगावर विलसत नव्हतें. कसलीही रत्नें त्यांच्या अंगावर चमकत नव्हती. डोळे निस्तेज होते – नम्र होते.

चाकराने नुकतीच उमललेली कमळें ताटांत आणली होती. त्या कमळांना पाहून भरताला आनद झाला श्रीवृषभाच्या चरणपादुकाना ती फुलें त्यानी वाहिली. वडीलाच्या नामस्मरणात अवीट गोडी होती. सारे दुःख विसरावयास लावणारे ते चरणकमल होते. भरत हात जोडून उभा होता. त्याने वडीलाची दिव्यमूर्ति डोळ्यासमोर आणली व तो म्हणाला–

" हे विघ्न विनाशक, तू क्षमेची मूर्ति आहेस. प्रत्यक्ष पृथ्वीची क्षमताच तू हरण केली आहेस. पाण्यातील शीतलता तुझ्या ठिकाणीच गोरवाला

प्राप्त झाली आहेत. तूं वायूमूर्ति आहेस. अगदी निःसंग, निर्लेप, निर्धूत आहेस.. तूं अग्निमूर्ति आहेस. [अहंकारादि षड्रिपूना जाळून त्यांची तूं राख केली आहेस. माझ्या मनातील औदासिन्य, दौर्बल्य व किंकर्तव्यमूढता नष्ट करून ते उत्साहाने, तेजाने आणि आणि आनंदाने भरून जाईल असे कर.]

प्रार्थना संपतांच श्रीभरतेश धवलासन मंडित अश्वावर आरूढ झाले. सेवेसाठी फक्त एक हजार घोडेस्वार ठेऊन घेऊन सर्व चतुरंग सैन्यास अयोध्येकडे निघण्याचा आदेश देण्यात आला चक्राला उद्देशून भरत म्हणाले,

" आताच पुन. सांग, कोणी शत्रू अद्यापि जिवंत आहेत कां ? तेथें गेल्यानंतर या सर्व सेनापतींना कोंडवात टाकू नकोस तुझ्या केवळ दर्शनानें मला अशुभ सूचक चिन्हे दिसू लागतात. माझ्या बंधूना कोवळ्या वयात सन्यासाला पाठवून तूं चांगल्या प्रकारे धन्याची सेवा बजावली आहेस. एकीकडे वैभवाचा वर्षाव करून दुसरीकडे दुःखांचा – वियोगांचा वर्षाव तू केला आहेस. तू या सर्व सैन्याला मार्गदर्शक हो आणि अयोध्येकडे प्रस्थान कर. "

श्रीभरताच्या आज्ञेने सारे सैनिक अयोध्येस जावयास निघाले मोठा कोलाहल सुरुं झाला. चक्र आपल्या दिव्य तेजाने पुढें पुढें सरकत होतें पाठीमागे घोडेस्वार, रथ, उंटस्वार, हत्तीस्वार, पायदळ निघाले. विजय मिळाला होता. पण त्यात आनद नव्हता. पराभूत विजय होता तो.

एक सहस्र घोडेस्वाराबरोबर भरताचा घोडा वनें, तपोवने, जगले, गिरीशिखरे धुडाळत चालला होता. भरताच्या हृदयात निसर्गाने आनंदाची कारंजी उडविण्यास आरंभ केला फुलांनी त्याचे हरपलेलं स्मित परत केल. चंद्राने शीतलता परत दिली

हिंडत, शोध घेत, तपास करीत, श्रीभरत वनातून हालअपेष्टाना सहन करीत हिंडत होते. पर्वतावरील प्रचण्ड दगडाला पाहून त्याना बाहुबली उभा असल्याचा अनेकदा भास होई

एका भिल्ल राजाने भरताकडे येऊन बातमी दिली—

" महाराज, येथून उत्तरेकडील एका घनदाट जंगलातील टेकडीवर एक दिव्य पुरुष सर्व वस्त्राभूषणे टाकून उभा आहे. अजस्त्र बाहू माडयांना भिडले आहेत. कुरळया केसाच्या बटा कपाळावर विखुरल्या आहेत. डोळे एखाद्या मूर्तिसारखे अचल व स्थिर आहेत. जंगल अतिशय भयाण आणि कुक्कुट नावाच्या विषारी सर्पांनी भरलेले आहे क्रूर श्वापदाच्या गुहा इतक्या आहेत की आम्हालाही तेथें जाववत नाही. आजच आमच्या जमातीने त्या महापुरुषाची पूजा केली आहे आपणही चलावे "

भरताने विचार केला— वर्णनावरून बाहुबलीच तेथे आला असावा. त्याचा आनंद गगनात मावेनासा झाला. सैनिकांनी भिल्लाला पुढें घालून मार्ग शोधून काढला. अनेक वृक्षांना कापून रस्ता तयार केला. श्वापदांनी आपआपली स्थळें सोडली.

सैनिकाची टोळी त्या डोंगराच्या माथ्याशी पोचली खरोखरच तेथें महा मानव बाहुबली उभा होता. एका मोठया पर्वतावर. सर्वांनी त्यांना नमस्कार केला.

श्रीभरतही तेथें आले. बाहुबलीचं रूप उन्हान काळवंडल होतं भुकेमुळें म्लान झाल होतं. तहानेमुळे ओठ सुकले होते शरीर तेजोहीन दिसत होतं. पक्षी डोक्याखांद्यावर बसून विसावा घेत होते. सापांनी जवळच वसती केली होती. उगवणाऱ्या वेली त्याच्या शरीराशी नातें जोडण्यासाठी धडपड करीत होत्या.

भरताने आपल्या हातांनी जवळची जागा साफ केली काटेरी झुडुपें काढून टाकली. विषारी सर्पांना पळवून लावलें.

इतके सर्व होत असतांही बाहुबलीने डोळे उघडले नाहीत. हालचाल केली नाही. मनांतील विषादाची भावना ओठावर पेंगुळलेली दिसत होती. भरतासंबंधीचा राग अद्यापि मनाच्या पोकळीतून धूत्कार करीत होता.

श्रीभरताने जवळच्याच तलावातील शुद्ध पाण्याने श्रीबंधूचे पाय धुतले. त्याची पूजा केली. फळें – फुले वाहिली. त्याला नमस्कार करून तो म्हणाला—

" माझ्या लाडक्या बंधुराया, इथें जंगलात राहून तुझं क्षेम कसं होईल ? मी – भरत तुझ्यासाठी इथें आलों आहे. सार षड्खडाचं राज्य मी तुला अर्पण करतो. मनांतील अप्रीतीची भावना काढून टाकून माझ्या मनाला शांत करण्याचं सामर्थ्य तुझ्याच ठिकाणी आहे. वाटेल ते प्रायश्चित्त मी घ्यायला तयार आहे. इथ जंगलांत तुझा सेवक होऊन मी आजन्म राहीन पण एकदांच तूं माझ्याशी बोल. ही सारी भूमि तुझी आहे. तूच याचा मालक आहेस. खरं सांगू, भाऊराया, ही पृथ्वी कुणाच्याही मालकीची नाही. आपण सारे या पृथ्वीवरील प्रवासी आहोत आज–उद्यां येथून निघून जाणार. मनांतील हा विकल्प तू टाकून दे की ही पृथ्वी भरताची आहे. या पृथ्वीवर भरताची मालकी आहे मध्यस्त जीवनाचा अंगीकार तू केला आहेस. पण तत्पूर्वी मला तू क्षमा केलीस एवढेंच ऐकण्यास माझे कान आतुर झाले आहेत. तुला छातीशी कवटाळण्यासाठी मी उत्कंठित झालों आहे. तुझ्या तोंडातील मधुर बोल ऐकायला माझे कान कासावीस होत आहेत. बोल, भाऊराया, बोल. या भावाला क्षमा नाही का करणार ? तुझ्या मनांतील माझ्या संबंधीचे कुसळ दूर करून मला आनंद नाही का देणार ? युद्धांत पराभूत करण्याचे पातक मी टाळलें. तुझ्या स्वच्छ भूमिकेची मी कदर केली. कृताकृतांची फळें भोगताना निर्मोही वृत्तीनें ती भोगावीं असे पिताजींनी नाही कां शिकविले. कर्तव्यच्युतीपेक्षां जीवन त्याग करावा हे तत्वच नाही कां त्यांनी आपणांस शिकविलें ! "

अशा प्रकारे अनेक विनवणी करूनही बाहुबलीने डोळे उघडलें नाही. उत्तर दिलें नाही. एखाद्या प्रचण्ड शिळा–खंडाप्रमाणें तो उभा होता. या नश्वर जगांतील, क्रूर विश्वांतील सर्व मोहक पाश तोडून जंगलाच्या आश्रयास जो आला होता. पण "ही भरताची भूमि " केवळ याच विकल्पामुळें त्याची आत्मसाधना अपूर्ण होती. त्या धैर्यमेरूच्या हृदयांत तेवढाच काय तो किंतु होता.

पुन: भरत हात जोडून म्हणाला, " चल पाहिजे तर त्रिकालदर्शी, कल्याणप्रकृति असलेल्या पिताजींकडे जाऊं. त्यांच्याकडुन तुझ्या मनांतील संभ्रम फिटेल. चराचरसृष्टींतील गोपनीय रहस्य ते तुला सांगतील. मला

लागतील. अंधाराने भरलेलें तुझें व माझें हृदय ते कैवल्य प्रकाशाने प्रकाशित करतील. चल. त्याचें दर्शन तरी घेऊ. "

श्रीबाहुबलीच हृदय – परिवर्तन होत नव्हतें. भरत विनवणी करीत होते डोळ्यातून अश्रूधारा वाहात होती. वाटेल तो त्याग करून श्रीबाहूचे समाधान करावयाची त्याची प्रतिज्ञा होती. पण दृढव्रती बाहुबली तसाच उभा होता

० ० ०

भरतेश्वराने केलेली मन धरणी विफल झाली. काय करावे हें सुचेना. संन्यास धारण केलेल्या बाहुबलीच्या चेहऱ्यावरील क्रोध तेथेंच थिजल्या– सारखा दिसत होता. अखेर नाईलाजानें त्यास परतावें लागले. काही सैनि– काना तेथेंच ठेवून त्यानें अयोध्येच्या रोखानें प्रस्थान केलें. तेथील नगरवासी- यानी भरताच्या आगमनाचा महोत्सव साजरा केला.

अनेक सामत, माडलिक, सरदार यांच्या विनंती वरून साम्राज्य प्राप्तीचा महोत्सव साजरा करण्याचें ठरलें. देशोदेशी पत्रें गेली. षट्खडांतील राजे– महाराजे मुद्दाम त्यासाठी आले. अयोध्यच्या इतिहासांत हा फार महत्वाचा क्षण होता. विश्वाच्या रथाचे लगामच जणु अयोध्येच्या हाती होते म्लेंच्छ– खंडांतील राजेही आपल्या आपल्या परिवारांसह उपस्थित झाले होते. आलेल्या प्रत्येकासाठी मोटमोठे वाडे, स्नानगृहें, क्रीडागृहे बाधण्यांत आले होते. प्रत्येक घरांघरांवर वृषभध्वज फडफडत होते. रस्ते श्रृंगारले होते. आदरसत्काराला नुसता पूर आला होता. रस्तोंरस्ती इक्षुरसाचीं पानकें उघण्यात आली होती. प्रतिष्ठित संगीतज्ञ, गायक, चित्रकार, नर्तक व नर्तिका यांना पाचारण करण्यांत आलं होतं.

जगाची संपत्ती, कला आणि विद्या जणुं अयोध्येंतच एकत्रित झाली होती. दिग्विजयांत मिळालेल्या विविध वस्तूंचे, शस्त्रास्त्रांचें एक प्रदर्शनही भरविण्यांत आलें होतें. ज्या चक्रामुळें हें सर्व शक्य झालें होतें त्या चक्रासाठी मुद्दाम एक चक्र-गृह तयार करण्यात आलें होतें. तेथें सुवर्ण सिंहासनावर चक्राला अधिष्ठित केलें गेलें होतें. विविध प्रकारच्या पुष्पमालांनी तें चक्र अधिकच तेजस्वी दिसत होतें.

निरनिराळ्या प्रदेशांतील माती आणि चौदा हजार नद्यांतील पाणी मागविलें गेलें होतें. भरतेश्वरासाठी विविधप्रकाराची वस्त्रें, आभूषणें आणि अलंकार बनविण्यात आले.

भरताच्या मनांतील उत्तम अद्याप भरलेली नव्हती. बंधू बाहुबलीचें एक महाचित्र त्याने फलकावर स्वतःच्या हाताने रंगविलें होतें. भरताने काढलेल्या श्रीवृषभांच्या चित्राहूनही ते अप्रतीम होते. मानवतेचा महान आदर्शच त्यानें उभा केला होता त्या चित्रात ! जें साम्राज्य सुखानें प्राप्त होणारा नाही असें दिव्य मंगलरूप वैराग्याने प्राप्त झालेले त्याने दाखविले होते. कारुण्याने नटलेलें मंदस्मित ओठावरून ओघळलेलें दाखविले होतें. गाल रुसव्यानें फुगले होते की विषादाच्या भावनेनें स्नायूंना ताण पडून ते फुगले होते हें सहजासहजी लक्षात येत नव्हतें. स्वयमेव मृगेन्द्रता प्राप्त करणाऱ्या सिंहाचा बेडरपणा त्याच्या उभ्या असलेल्या पायांत दाखविला होता. जगा-तील लक्षावधि दीनांचा भार सहज पणे वाहूं शकतील असे प्रचंड खांदे त्याने रंगविले होते.

तें चित्र दिवस-रात्र खपून भरत पूर्ण करीत असतां त्याची पत्नी सुभद्रा त्याला म्हणाली, " ज्या भावाला तुम्ही जिंकायला गेला, शेवटी त्यानेंच तुमचा सर्वदृष्टीनें पराभव केला की "

" हेंच......हेंच लोकांनी म्हणावें, याहून मला तरी काय हवें आहे. मी माझ्या लहान बंधूकडून पराभूत झालों. त्याच्या पायाना धरून मी माझ्या अपराधाची क्षमा मागितली. मी त्याच्या महन्मंगल वैराग्याच्या साधनेंत उपयोगी कसा पडेन हीच चिंता विसरण्याचा मी प्रयत्न करीत आहे. "

आपल्या पतिराजांनाही काळजीनें घेरलें असावें हे ऐकून सुभद्रेला आश्चर्य वाटलें. साऱ्या विश्वावर अप्रतिहत सत्ता गाजविणारा महान पराक्रमी चक्रवर्ती केवळ बंधुविरहाच्या कुसुमकोमल चिंतेने व्यग्र व्हावा ना !

त्यावर सुभद्रा म्हणाली, " तुमच्यावर ते रागावले असले तरी बहिणी-वर ते रागावले नाहीत तुम्ही आर्यिका ब्राम्ही आणि आर्यिका सुंदरी या दोघींना तिकडे पाठवा हवे तर तुम्ही ही जा. पण तुमचे मन शांत झाल्या शिवाय हा उत्सव म्हणजे प्रेतावर चढविलेला साजच होय. "

दुसऱ्याच दिवशी भरत, महासती साध्वी ब्राम्ही आणि सुंदरी यांनी दक्षिणेकडे प्रस्थान केले. भरत दूरवरच जंगलांत राहिला. साध्वी ब्राम्ही आणि सुंदरी या दोन बहिणींनी श्रीबाहुबलीची समजूत काढली. बहिणीच्या ममतेन त्याच्या मनातील काहूर शमले. साध्वी ब्राम्ही म्हणाली, " तूं मूळचाच असा हट्टी आहेस. कुणाचे विचार समजून घेण्याइतकीही किंमत तूं कधी कुणास देत नाहीस पण एवढें लक्षांत ठेव जोपर्यंत तुझा अहंकार गळून पडत नाही तोपर्यंत तुझ्या ह्या खोट्या तपाला फळ येणार नाही." साध्वी सुंदरी म्हणाली, ' अरे, तिकडे श्री वृषभांना वाटत असेल की त्याच्या वनवासगमनानंतर भाऊ भाऊ मोठ्या प्रेमाने वागून जगाला बंधूप्रेमाचा आदर्श घालून देत असतील ! तू माझं ऐक ही भूमि कुणाच्या मालकीची नाही अनेक राजे येतात आणि जातात मात्र ही भूमि या आकाशाप्रमाणेंच आहे तशी राहते. यांतील एक कण ही कुणी आपल्या बरोबर नेत नाही. तू समजूतदार आहेस. मनातील विपण्णता टाकून खऱ्या तपाचा मार्ग तू चोखाळीत का नाहीस? "

साध्वी ब्राम्ही म्हणाली, " तुझा वेडेपणा गेला नाही तर तुझ्या बरो–बर याच भयाण अरण्यात आम्ही राहूं व मग जें होईल ते आमचें होवो. ज्या बहिणींना भावाचा राग काढून टाकता येत नाही, त्यांनी परतून तरी काय करावे ? हे सुंदरी, हा काही आपले ऐकत नाही बोलतही नाही मला तर दुसरा उपाय सुचत नाही. "

बाहुबलीचें कठोर मन या वचनांनी ढळले त्याला माहित होते कीं

माध्वी आम्ही म्हणजे निश्चय जग वाकेल पण तिचा निश्चय वाकणार नाही.
" तिनें माझ्या मूर्खपणासाठी इथेंच राहण्याची प्रतिज्ञा करावी, हे मला शोभणार नाही. माझ्या निश्चयांत विपण्णता आहे. अहंकार आहे, क्रोध आहे. मी शेंकडों वर्षेंही असा उभा राहिलो तरी मी चांगलें केलें असें जग म्हणणार नाहीं. होणाऱ्या गोष्टींना अगतिकपणें शरण जाण्याचा प्रसंग टाळता येत नाहीं हेही या जगांतील कटुसत्य आहे मोठमोठ्यांना त्या नियति–नियंत्रित घटनेपुढें मान वाकवावी लागते. ज्या भरतेश्वराने माझ्या जीवनात फुलांचा वर्षाव केला त्याच्याशी मी असें वागलों. जिथें मी प्राण द्यावयास पाहिजे तिथें मी माती द्यायलाही संकोच केला. भरता, मी चूक केली. साम्राज्यापुढें, देशापुढें बंधुप्रेमाला मी कलंकित केले. माझे वैराग्य म्हणजे केवळ संताप ! मला पश्चात्तापाच्या पवित्र जलाने शुद्ध झालें पाहिजें. त्याशिवाय मुक्ति नाही. " असा विचार तरंग त्या महासात्विकाच्या हृदयांत उठला, फिरला आणि सर्व शरीर–मन–आत्मा या तीन्हीत व्यापून राहिला.

*अहंतेचें वस्त्र विरलें. क्रोध क्षमेंत, काठिण्य मृदुतेत, गर्व ऋजुतेंत विलीन* झाले. आकाश निरभ्र झाले. सद्विचाराचा सूर्य चमकूं लागला.

ते म्म्हणाले,

" माझें चुकलें. हा घ्या अहंकार मी टाकला. हे घ्या माझें वचन. मी होतो तसाच झालों. भरत माझा बंधू ! त्याच्या अनंत शुभभावना माझ्या साधनेत पाठीशी राहतील. तुमची मंगल भावना मला दीपज्योतिप्रमाणें अंधारांतून मार्ग दाखवील. "

श्री बाहुबलीनी ॐ असे म्हणून बहिणीचें म्हणणें मान्य केलें. चूक पदरी घेतली. मन निर्मळ झालें, जणु तुफान उठलेंच नव्हतें !

श्रीभरताने बहिणीसहित त्या त्यागीश्वराची भक्तिभावानें पूजा केली. जंगलांत मांगल्य प्रगटले. भरताने भावाला उद्देशून म्हटलें– " श्रीवृषभांच्या मंगल आशीर्वादानें कुळाला लागणार कलंक लागण्यापूर्वीच धुवून निघाला. हे महापुरुषा, तुझ्या अंगीकृत कार्यांत आम्ही सदैव सुयश चिंततो. तुला लवकरच कैवल्याची प्राप्ती व्हावी, तूंही श्रीवृषभाप्रमाणेंच सर्वज्ञ व्हावा अशी आमची प्रार्थना आहे. सारे जग अनंतकाळपर्यंत तुझ्या यशाचे पोवाडे

गावी हीच माझी प्रार्थना." असे म्हणून त्याला नमस्कार करून ते सारे परतले.

( वाटेंत भरत बहीणींना म्हणाला, "तुमच्या मुळें माझे मन शांत झालें. माझ्या मनांतील तळमळ तुम्ही शांत केली. अशा बहिणी माझ्या पाठीशी उभ्या आहेत याचा मला गर्व आहे. चक्राचे सामर्थ्य तुमच्या प्रेमापुढें फिकें आहे." )

साध्वी ब्राह्मी आणि सुंदरी यांनी केवळ स्मित केलें. मांगल्य, सद्विचार आणि विवेक यांच्या जणु त्या दोघी पुतळ्या होत्या. वडीलांना कैवल्य झाल्याबरोबर त्यांनीहि संसार सुखाला लाथाडून तपश्चरणाचा सत्यपूत असा अवघड मार्ग अवलंबिला होता. श्रीवृषभांच्या चरणाशी स्त्रीसमाजाला देखील उत्कृष्ट दर्जा प्राप्त होऊ शकतो हें तत्व त्यांनी सिद्ध करून दाखविलें. तपसिद्धीचा, व आत्मशुद्धीचा मार्ग स्त्रियांनीही चोखाळावा व त्यात जीविताचे सोने बनवावें. निसर्गदत्त गुलामीविरुद्ध तप आणि संयम यांची शस्त्रे उगारून तपस्वी जीवन घालविता येणे शक्य आहे हे त्या दोघींनी सिद्ध केलें. आपल्या परिश्रमाने, प्रेमाने व सिद्धीनें त्या दोघींनी सहस्रावधि स्त्रियांना संघात आणले. त्यांना दीक्षित करून घेतलें व कामभोगाच्या भौतिकतेंतून कायमचें मोकळें केलें.

श्रीभरताला मंगल आशीर्वाद देऊन त्या दोन्ही साध्वी संघांत परत आल्या.

तपःसाधनेंत बाहुबलीला मागें टाकील अशी व्यक्ति इतिहासात पहावयास मिळत नाही. अतुलनीय असे शारीरिक बळाव्यतिरिक्त अमोघ असे आत्मिक बळ त्यांच्या ठायी होतें.

सर्वप्रकारच्या आहारादिक क्रियांचा त्याग करून कैवल्यसिद्धीसाठी महातपास त्यांनी प्रारंभ केला. लोभासारख्या प्रचण्ड विकाराशी झुंजून त्याचा नाश केला. अहंकार तर गळूनच पडला. क्रोधाचा अग्नि तपाच्या अग्नीत भस्म झाला. सारें जग त्याला आपलें घर वाटूं लागलें. सारे जीव आपले मित्र वाटू लागले अज्ञानाचें आवरण विरलें. अंतरायाचा अंत झाला.

क्षुधा, तहान, निद्रा, म्हातारपण, हास्य, भीति इत्यादि क्षुद्र विकार वाळलेल्या गवताप्रमाणे जळून खाक झाले.

बाहुबलीला कैवल्य झाले इंद्रानी पुष्पाचा वर्षाव केला. भरताला ही बातमी कळतांच त्याने श्रीबाहुबलीच्या कैवल्यप्राप्तीचा फार मोठा सोहाळा केला. अयोध्येतील जनतेने बाहुबलीचा जयजयकार केला.

त्यानंतर वडीलाच्याही आधी सर्व कर्मबधनातून स्वतःला सोडवून घेऊन श्री बाहुबलीने आपल्या तप साधनेने निर्वाण मिळविले. त्या महान आत्म्याची ओळख म्हणून भरताने महान शिल्पकाराकडून एक शुभ्र दगडाची प्रचण्ड मूर्ति उभी केली स्वातन्त्र्याचा पहिला मानकरी म्हणून त्याची कीर्ति षट्खडांत पसरली.

श्रीबाहुबलीच्या निर्वाणाने या कथेतील एक पर्व आटोपलें

० ० ०

## सम्राट् भरत —

अपूर्ण राहिलेला भरतेशाचा साम्राज्याभिषेक फारच थाटात पूर्ण झाला. षट्खंडाधिपति भरताचें राज्य निर्विघ्नपणें चालू झालें. आपल्या नातलगांना विविध प्रकारच्या अधिकाराच्या जागा देऊन त्याने संतुष्ट केले होते. म्लेंच्छ खंडांतील राजांनाही त्याने संतुष्ट केलें.

श्रीभरतेशाला लोकांकडून नवीन ' मनु ' अशी पदवी देण्यात आली. श्रीवृषभनाथांनी प्रवर्तित केलेला गृहस्थधर्म त्यानें समृद्ध केला. ब्राह्मण वर्णाची स्थापना केल्याने विद्वान व त्यागी समाजाची जोड देशाला मिळाली होती. त्या ब्राह्मण जमातीने पौरोहित्य करून राजाला धर्म व न्याय या दोन गोष्टींत स्थिर ठेवण्याचा फारच चांगला प्रयत्न केला. सर्व वर्णांचा प्रतिपाळ ममतेने ते करीत होते.

विविध प्रकारचे धार्मिक उत्सव व आमोद–प्रमोदपूर्ण महोत्सव भरतानें चालू केले. त्या उत्सवांच्या निमित्तानें सर्व प्रकारच्या वर्णांना एकत्र येण्याची संधि मिळत होती. विविध प्रकारच्या गुणांचे आदानप्रदान त्या निमित्तानें होत असे.

भरताच्या राज्यात ७२ हजार शहरें, ९६ हजार गांव, १६ हजार लहान लहान पण स्वयंपूर्ण अशी खेडी होती. समुद्रातील ५६ द्वीपांची अधिसत्ताही त्यावेळीं भरताकडे होती. प्रचण्ड विस्तारानें युक्त असा भरताचे राज्य स्वर्गासमान वाटत होतें. लोकांच्या योगक्षेमाची काळजी वाहणारे चौदा हजार अधिकारी होते. जीवनावश्यक अशा गोष्टींची मुबलता देशांत राहील याची निरंतर काळजी ते अधिकारी घेत असत. त्यांना 'संवाह' अशी संज्ञा होती.

दुधाची व्यवस्था हा भरताच्या राज्यातील अनुपम व्यवस्थेचा भाग होता. दुधाची विक्री होत नसे. गाय आणि बैल यांना घरातील कुटुंबिया-सारखें वागविण्यात येत होते. पशुहत्येसारखी गोष्ट लोकांच्या मनातही येत नव्हती. कारण धनधान्य इतके विपुल होते.

त्याच्या प्रमुख सेनापतीचें नाव अयोध्य होते. तो अनेक प्रकारच्या युद्धांत प्रवीण होता. समुद्रावरील युद्धांत त्याच्या युक्तीचे श्रीभरतानें कौतुक केलें होतें. सैन्य म्हणजे सत्ता यावर त्याचा विश्वास नव्हता. भरतासारखा सदा जागरूक राहणारा सम्राट हा त्याचा मालक असल्यामुळें युद्धाचा प्रसंगच उद्भवला नव्हता.

बुद्धिसागर नांवाचा अत्यंत चारित्र्यशील संपन्न असा भरताचा पुरोहित होता. विविध प्रकारच्या राजकार्यांत भरताला सल्ला देण्याचें कार्य तो करीत होता. राज्यातील सर्व धार्मिक क्रियांचे अधिपत्यही त्याच्याकडे होते. सर्व न्यायालयांचा प्रमुखही तोच होता. पण आश्चर्य हें की सत्प्रवृत्त लोकांकडून दुराचरण न घडल्यामुळें देशातील न्यायालयें ही केवळ औप-चारिक गोष्ट होती. गावागांवातील प्रेम इतके होते की एका गांवाला

लागणारे पदार्थ कमलेंही मुल्य न घेतां दुसऱ्या गांवाला तें देण्यात येत असे.

कामवृष्टि नावाचा भरताचा गृहपति होता भरतेश्वराच्या घरातील सर्व प्रकारच्या खर्चाचा हिशेब ठेवण्याचे कार्य त्याच्याकडे होते. भरताची स्नानाची, भोजनाची, वस्त्राची, राहण्याची, आगमन–निर्गमनाची सर्व व्यवस्था तो स्वतः जातीनें पहात असे

अशाप्रकारे अनेक भोगाच्या आणि उपभोगाच्या सामुग्रीत भरताचें मन मात्र कधीच गुतत नसे सहस्त्रावधि स्त्रियाच्या सहवासातही त्याचे मन कामभोगात रमत नसे विविधप्रकारच्या कामक्रीडेत, आमोदप्रमोदात आत्मनिष्ठ प्रवृत्तीला तो चिकटून राहत असे. श्रीवृषभांच्या सहवासाने इंद्रियाचा निग्रह कठोरपणाने कसा करावा हे तो शिकला होता सदानृप्त असलेल्या महायोगी प्रमाणें भरत आत्मचिंतनांत वेळ घालवी. उपभोगाचे प्रचण्ड सामर्थ्य त्याच्या शरीररचनेत समाविष्ट होते परंतु त्या सामर्थ्याचा उपयोग करताना ' हा भोग आहे कर्मबंधनामुळेच मला हे सारे भोगावें लागत आहे. हे पदार्थ मी अनेक वेळां भोगले आहेत. माझा या भोगाशी आत्मिक व मानसिक असहकार आहे. ' अशी दिव्य भावना त्याच्या ठिकाणी वास करीत होती

त्याची राणी सुभद्रा नावाची होती तिच्या तारुण्याला नवविकसित पुष्पाची उपमा दिली तर तिच्या गुणाला सुवासाची दिली पाहिजे पतीचें मन आपलेसें करण्यातच तिचे खरे कौशल्य होते विरक्त प्रवृत्तीचे भरत तिच्याशी बोलताना म्हणत—

" आर्ये, तुझा माझा संयोग आजचा नाही. गेल्या अनेक जन्मातून तुझेंमाझें नातें चालत आहे. परपस्पराची अनुमति असल्याशिवाय ही विवाह परंपरा नीट चालावयाची नाही. श्रीवृषभाची मागच्या जन्मातरी असलेली पत्नी श्रीमती आज श्रेयासाच्या रूपाने जन्माला आली. श्रेयासाच्या अक्षय दानाने प्रभू तृप्त झाले. कसा योगायोग असतो पहा ! गत जन्माच्या प्रेमरज्जूनी जगत्प्रभूला आपल्याकडे कसें आकर्षित केले हे पाहिलें म्हणजे धन्य वाटते त्या श्रेयास कुमाराची ! विविध जन्मातून जणु परस्पराची कर्मबंधनें तोडण्यात ते गुतले असावेत. परस्परांचा उद्धार हीच पति–पत्नींची एकमेव

इच्छा असली पाहिजे. "

भरतेश असे भावविवश होऊन बोलत असता सुभद्रा मंत्रमुग्ध होत असे. जीवनात भोग आणि योग या दोन्ही गोष्टी अनुभवत ती होती. कसल्याही सुखदुःखात समत्व राखण्याची, मनाचा तोल सांभाळण्याची प्रवृत्ति तिच्या ठिकाणी उद्भूत झाली होती.

भरताचे आपल्या मुलावर अप्रतीम प्रेम होते. परन्तु त्यांची वागणूक अन्यायपूर्ण असेल तर त्याचाही निषेध तो करीत असे. एकदां त्याचा अतिप्रतापी मुलगा अर्ककीर्ति एका स्वयंवर मंडपात उपस्थित झाला. ते स्वयंवर काशीच्या राजानें, अकंपनानें मांडलें होतें त्याची मुलगी सुलोचना नावाची होती. तिच्या शील, विनय आणि आदरातिथ्य इत्यादि गुणांची प्रशंसा स्वर्गात देखील देव करीत असत.

अशा स्वयंवरांत भरत–पुत्र अर्ककीर्ति आल्याबरोबर सर्वांनी त्याला आदरानें बसविलें. परंतु सुलोचनेनें त्याच्या गळ्यात माळ घातली नाही. तो खवळून गेला. त्यातच त्याचा एक मित्र दुर्मर्षण नावाचा होता. तो म्हणाला 'महाराज, हा आपला अपमान आहे. तुमचे पिताजी चक्रवर्ति आणि असे असतां तुमचा अपमान म्हणजे तुमच्या पिताजींचा अपमान या अकंपन राजाचा, आपण आज्ञा दिल्यास, मी क्षणांत निःपात करीन.'

या बोलण्यानें अर्ककीर्ति अधिकच रागावला. त्यानें लगेच युद्धाची तयारी केली. युद्धाचे नगारे वाजू लागले. ज्या राजाच्या गळ्यांत सुलोचनेनें माळ घातली होती त्याचें नांव जयकुमार होतें. तो अत्यंत विचारी व विवेकी होता. उत्कृष्ट योद्धाही होता.

त्यानें आपला सेनापति त्याच्याकडे पाठवून समजूत काढण्याचा फार प्रयत्न केला. पण सर्पाला पाजलेलें दूध जसें पुनः विषच बनतें तसें झालें.

अकंपनानें एक खास दूत श्रीभरताकडे पाठविला. त्या दूतानें भरतेश्वराला सारी हकीकत सांगितली. तेव्हा भरत त्याला म्हणाले—

" श्री अंकपनाला मी माझा मोठा भाऊ समजतो. त्यानें मला जें

सहकार्य दिले आहे त्याची मला जाणीव आहे. माझ्या पुत्राने न्याय सोडून वागावें हे त्याला शोभत नाहीं. शिवाय म्लेच्छ राजाना जिंकताना जयकुमाराने केलेली मदत मी विसरू शकत नाही. तू परत जा व माझी आज्ञा म्हणून अर्ककीर्तिला घरी पाठवून दे "

दूत निघून गेला.

सुभद्रा तेथे होतीच. तिला उद्देशून भरत म्हणाले, " अर्ककीर्तिनें असे वागायला नको होते. न्यायनिष्ठा ही राजघराण्यातील लोकानी जर पाळली नाही; सदाचाराचे सार्व नियम राजे लोक उलटू लागले तर प्रजेने काय करावे ? प्रजा नेहमी राजाकडे पाहून वागत असते. राजा व्यसनी तर प्रजा व्यसनी राजा दुष्ट व अन्यायी. तर प्रजेतही दुष्टता व अन्याय करण्याची प्रवृत्ती वाढत जाते. "

त्यानंतर जेव्हा अर्ककीर्ति परत आला. तेव्हा त्यासही योग्य मार्गदर्शन श्रीभरतानें केले. इतकेंच नव्हें तर जयकुमारला आमंत्रण देऊन व त्यास अयोध्येस बोलावून त्याचा सत्कार केला व पुत्राच्या वागणुकीबद्दल स्वत. दिलगिरी प्रदर्शित केली.

अशी आहे. " दिवसरात्र तो अप्रमत्त राहून आत्मचिंतनांत वेळ घालवित असे. सतत चिंतनामुळें प्राप्त झालेलें सम्यक्ज्ञान आणि सुनिर्मळ चारित्र्य यांचा त्याला प्रत्यहीं चांगला उपयोग होत असे. त्याच्याच सहाय्यानें त्यानें सामाजिक दृष्टिकोणाची निर्मिती केली होती. तो उत्कृष्ट गृहस्थधर्माचा व कुटुंबसंस्थेचा पुरस्कर्ता होता जोपर्यंत संस्कारयुक्त व उच्च आचारांची कुटुंबें राष्ट्रांत नांदत नाही तोपर्यंत राष्ट्र नांवाची वस्तु उदयाला येत नाहीं, हे तत्व त्यानें प्रजेच्या ठिकाणी बिंबविलें होते.

त्यानें कुटुंबात सदाचार व सत्यनिष्ठा बिंबावी म्हणून त्रेपन्न प्रमुख गोष्टींना महत्व दिलें होतें. बालकाच्या गर्भात येण्यापासून तो त्याच्या निर्वाणापर्यंतच्या त्या क्रिया होत्या. मूल गर्भात आल्यापासून आईवडीलानी योग्य संस्कार व योग्य सद्भाव मनात बाळगावेत. कारण मनांतील विचाराचा व भावनेचा मुलावर परीणाम होत असतो. इतकेंच नव्हे तर योग्य पुरोहिताकरवी अग्निकुंडाची स्थापना करून यज्ञपूजा करावी. सर्व कल्याणकारी अर्हंतांचें नामस्मरण करावें सर्वांना संतुष्ट करावें.

( अशाच क्रिया गर्भ तीन महिन्याचा, पांच महिन्याचा, सात महिन्यांचा आणि ९ महिन्याचा असताना कराव्या. त्यानंतर जन्म झाल्यावर जन्मोत्सव करावा. बारा दिवसानी परमेश्वराच्या १००८ नावांपैकीच एक नांव ठेवावें. त्यानंतर क्रमानें बहियान, निषद्या, प्राशन, व्युष्टि, केशवपन, शिक्षासंस्कार, उपनीति, व्रतचर्या, विवाह, गृहत्याग, दीक्षा इत्यादि अग्रनिवृत्ति ( निर्वाण ) पर्यंतच्या क्रिया करण्यात याव्या. )

मानवी जीवन कुठेंही कुंठीत न होतां बाल्य, यौवन वृद्धत्व या तीन शारीरिक अवस्थातून त्याच्या आत्मविकासास वाव मिळावा हाच या क्रियांचा उद्देश आहे. या क्रियासंबंधाने भरताचें म्हणणें असे होतें–

" मानवाचें जीवन केवळ इहलोकाशीच संबधित नाहीं. वेगवेगळ्या जन्मांत, वेगवेगळ्या ठिकाणी त्याच्यात विविध गुणांचा प्रादुर्भाव होतो. त्याचा विकास होतो. व्यक्तीचें जीवन समष्टीनें घडवावें आणि व्यक्तीचें जीवन समुन्नत झालें तर त्यानें समष्टीचे कल्याण चिंतावें. समष्टीला न्याय-

मार्ग व धर्ममार्ग दाखवावा. व्यक्ति आणि समाज हे परस्परास पूरक असून एकमेकांच्या सहकार्याने परस्परांनी प्रगत व्हावें हाच सर्वांचा दृष्टिकोण असावा. क्रिया महत्त्वाच्या नसून ज्यावर त्या क्रिया करायच्या ती व्यक्ति महत्त्वाची आहे. तिला जीवन–मुक्तीची वाट मोकळी करून द्यावी जीवनावर प्रेम करावे ते प्रेम संकुचित राहू नये. आपले जीवन जितके मोलाचे तितकेंच दुसऱ्याचें समजावें असें समजण्यात मनाचे आरोग्य स्थिर रहावे. शारीरिक आरोग्यात जसे विविध धातूंचे समत्व असणे आवश्यक असते तसेच आत्मिक आरोग्यात समतेचे महत्त्व आहे अहंकार, दंभ, क्रोध, ईर्षा, असूया व लोभ ही आत्म्यात विकृति निर्माण करतात जीवनाचा वृक्ष खुरटतो. मग त्याला बहर कसा येणार ? ”

( भरताचें जीवन विशिष्ठ पुरोगामी संस्कृतीचे प्रतीक होतें मानुसदृश असणारे त्याचे आयुष्य प्रजेच्या स्थिति–वृद्धि–फलोदयासाठी नित्य वेंचले जात होतें कुणाची अडवणूक नाही की फसवणूक नाही. कुठेंही जीवनाचा ओघ थाबत नसे. मृत्यूची भीति नसे. त्याचा स्वीकार करून त्यावर विजय मिळ–विणारे हजारो प्रजाजन त्याच्या राज्यात राहात होते आर्थिक अडवणूक नव्हती की पिळवणूक नव्हती. अर्थ हा त्याच्या जीवनात वृक्षाच्या पुष्पा–प्रमाणें होता आणि धर्म मुळाप्रमाणे. म्हणूनच नश्वर जीवन सुखप्रद होतें· सुसह्य होतें आनंदित होतें. प्रफुल्लित होते

अशा आदिपुत्र भरताचे राज्य दीर्घकालपर्यंत सुखाने चालत असता त्याला मधूनच वडीलांच्या दर्शनास जाण्याची उत्कट इच्छा निर्माण होई. अनेक करती–सवरती मुले भरताभोवती निर्माण झाली होती. वंशलता समृद्ध झाली होती. नातू–पणतूच्या मधुर आवाजानी भरताचे कान पुनीत झाले होते. तो या सर्वप्रकारच्या समृद्धीत सुखावत होता. एखादें पक्व फळ हळुहळू रसाने समृद्ध व्हावें, मधुर व्हावे, सुवासित व्हावे तसे त्याचे जीवन होते.

एके दिवशी सर्व परिवारासहित तो श्रीवृषभेश्वराच्या दर्शनासाठी निघाला मार्गात त्याला अनेक शुभशकुन होत होते

० ० ० १२

## म हा नि ष्क्र म ण

श्रीवृषभ आपल्या अद्वितीय गुणांनी विश्ववंद्य झाले होते. विविध देशांतील राजे, महाराजे सर्व वैभवांचा त्याग करून त्यांच्या सान्निध्यात येऊन राहिले होते. एका महा वटवृक्षाचा असंख्य पक्षांनी आश्रय घ्यावा त्याप्रमाणें घडत होतें. ज्येष्ठ–श्रेष्ठ तपस्वी, अनेक विद्येंत पारंगत असे महा-ऋद्धिधारी मुनी, चवऱ्यांशी श्रेष्ठ गणधर, हजारों साध्वी यामुळें श्रीवृषभ जणूं लक्षावधि तारकांनी वेष्टित अशा चंद्राप्रमाणें शोभत होते.

ती सकाळची शुभ वेळ होती. मंद मंद समीरण आपल्या बरोबर पुष्प-पराग आणून सारे वातावरण अधिकच सुगंधित करीत होता. आकाशांतून बगळ्यांच्या रांगा उडत होत्या. सूर्यप्रकाशांत त्यांची रांग अधिकच तेजस्वी वाटत होती. कमलासनावर विराजित श्रीप्रभूंची सहजसरळ मूर्ति आपल्या केवळ अस्तित्वाने सारे वातावरण अहिंसामय करीत होती. गरुडाच्या आवा-जाने सर्पांच्या मनात भीति निर्माण व्हावी त्याप्रमाणें श्री प्रभूच्या वाणीने

मनांतील मिथ्या विचार नष्ट होत होते. भूक, तहान, निद्रा या तीन विकारांना त्यांनी आपल्या तपानें जिंकले होते. त्यामुळें नित्यप्रसन्नता त्यांच्या मुखावर विलसत होती. रस, रूप, गंध आणि स्पर्श यापासून मुक्त झाल्यामुळें अमूर्तत्व त्यांना प्राप्त झाले होते. निरंतर वाग्यज्ञात प्रविण असलेल्या महाऋत्विजाची भूमिका त्यांनी अनेक वर्षें पार पाडली होती.

देशोदेशी विहार करून खऱ्या जीवन—निष्ठ श्रद्धेचा प्रचार त्यांनी केला होता. निष्ठाहीन ज्ञान हे पिंपासारखें असून निष्ठा आणि ज्ञान यांनी विरहित चारित्र्य हें दारूड्याच्या आचरणासारखें आहे हें त्यांनी सुबुद्ध लोकांना पटवून दिले होते शेंकडों वर्षांच्या दीर्घ तपश्चर्येने प्राप्त झालेल्या कैवल्यानें अनेकांना त्यांनी संबोधित केले होते. त्यांच्या धर्मचक्रप्रवर्तनामुळें भारतीय जनात सत्कर्मनिष्ठा, सज्जनसंतसंग आणि निरंतर कर्मप्रवणता या गोष्टी आल्या होत्या.

। श्रीवृषभाची मंगल वाणी सर्वांच्या हृदयांना आल्हादित करीत असता त्या ठिकाणी इंद्राचें सहपरिवार आगमन झाले

इंद्राच्या आज्ञेने श्री प्रभूचे सभास्थान अत्यंत पवित्र ठेवण्याची कामगिरी इतर देवाकडे होती. पवनकुमार नावाच्या देवाकडे सारी भूमि स्वच्छ ठेवून वारा निरंतर मंद व सुरभित राहील हें काम सोंपविले गेलें होते. मेघकुमाराकडे सारे रस्ते धूळरहित करण्याचे काम होते अशीं विविधकामें वेगवेगळ्या देवांनी वाटून घेतलीं होती. इंद्राने प्रथम त्यासर्वांच्या कामाची पाहणी केली. नंतर प्रमुख द्वारांतून हळुहळू पाऊलें टाकीत व प्रभूच्या विविध गुणांचे स्मरण करीत त्यानें प्रवेश केला.

इंद्राच्या आगमनानें नवीनच शोभा तिथें पसरली. श्री प्रभूंना त्याने तीनदा प्रदक्षिणा घातल्या. नंतर साष्टांग नमस्कार करून त्याने विविध प्रकारची नृत्यें केली. नंतर तो म्हणाला— " प्रभूची स्तुति करावयास मी धजत आहे. भक्तीच सामर्थ्यंच असं आहे की ती अशक्त व असमर्थांना सामर्थ्यसंपन्न करते. कोटी सूर्यांना लाजवील असलें आत्मसामर्थ्य आपणाकडे असताना केवळ देहाच्या गुणाची — आपल्या रूपाची, आपल्या भोवताली असलेल्या वैभवाची मी काय स्तुति करावी ? मोहाची प्रचण्ड सेना आपल्या

तपश्चर्येनं हतबळ झाली. आपण आत्मजित् झालात हाच आपला श्रेष्ठपणा.

" अज्ञानाचें वज्र – पटल आपण ज्ञानाने क्षणात नष्ट करून स्व–पर हिताचा मार्ग सर्वांना दाखविला. या मार्गदर्शनात कुठेही हठाग्रह नाही. कुठेही आत्मवंचना नाही. म्हणूनच आपला मार्ग बुद्धिमन्तानी स्वीकारला आहे.

" तुमची स्तुति कोणत्याही मानवाला अंधारातून दिव्यप्रकाशात नेईल. अज्ञानातून दिव्य ज्ञानात प्रविष्ट करील. आपली स्तुति म्हणजे या भूमीवरील कल्पवृक्ष आहे

" हे महायोगी, इतकं हेवा करण्यासारखं वैभव असताना, प्रत्यक्ष माझ्या सारख्या इंद्रालाही मोह पडावा असं रूप – लावण्य आणि ऐश्वर्य असतांना त्याचा तुम्ही त्याग केला यावरूनच आपण महाप्रज्ञावान् आहांत, महागुणी आहात. "

अशा प्रकारे श्रीमत् स्वयंभू वृषभनाथांची स्तुति करून इंद्र स्वस्थानीं जाऊन बसला.

त्याचवेळी श्रीभरतेशाचे आगमन झालें त्यांनीही जगच्चूडामणि असलेल्या त्या शिवश्रेष्ठाची स्तुति केली. भरताच्या वाणीत ओजस्वीपणा होता. त्याचा आवाज मधुर असून गंभीर होता. त्याच्या स्तुतीनें सारे वातावरण पवित्र झाले

स्तुति संपताच अनेकांनी भरताच्या दिव्य भक्तीचे कौतुक केले.

इंद्र म्हणाला " आम्ही संस्कृत भाषेचे स्वतःला निर्माते समजतो. देवांची भाषा म्हणून संबोधतो. परंतु श्री.भरतांच्या भाषासौष्ठवा पुढें, रसवंती पुढें आम्ही अगदी फिके पडतो. "

श्रीवृषभदेवाचा उपदेशपर्वाचा हा शेवटचा भाग होता. यानंतर प्रभूचा विहार बंद होणार होता. सर्व कल्याणप्रद दिव्यवाणी बंद होणार होती.

म्हणूनच आज समवसरणात गर्दी लोटली होती. अनेक देशांतील राजे, महाराजे राज्य त्याग करून प्रभूंच्या सान्निध्यासाठी आले होते त्यामुळे सभेतील गांभीर्य अधिकच जाणवत होते.

श्रीभरतानें पहिला प्रश्न विचारावा असे ठरलें. तेव्हा हात जोडून श्री भरत उभे झाले. सर्वांच्या मनातील आकांक्षाच जणु उभी होती. ते विनयानें म्हणाले—

" धर्माचा प्रथम उपदेश देणारे म्हणून आपण मूलकर्ता आहात. या जगातील मांगल्याचे, सद्धर्माचे मूळ कारण ही आपणच आहात. अनेक मुमुक्षूंचे आपण अग्रणी आहात. कृपा करून आम्हाला मोक्षाचा मार्ग कोणता ? व संसारबंधनातून सुटून जन्म–मरणाच्या फेऱ्यांत पुनः सापडू नये यासाठी आम्ही काय करावे ! "

श्रीप्रभू म्हणाले, " एका शब्दात मोक्षाचा मार्ग सांगता येईल तो शब्द म्हणजे विवेक. मोक्षाचा मार्ग जंगलात नाहीं, गुहेत नाही, देवळांत नाही, ग्रंथात नाही. पक्षासाठी पसरलेल्या जाळ्यात कोणता पक्षी सांपडत नाही ? माशासाठी टाकलेल्या गळाला कोणता मासा फसत नाही ? जो विवेकी आहे तोच ? हे भरता, तू विवेकी हो. चालता, बसता, खातां, पीता, झोपता हाच विचार कर कीं, जी क्रिया तू करतोस ती ज्ञानपूर्वक आहे. ती विवेकपूर्ण आहे. ती हितकर आहे ती प्रिय आहे ती श्रेयस्कर आहे. "

श्रीभरतेश पुनः म्हणाले, " हे प्रभो, इतका सोपा आहे का हा मार्ग ? "

पुनः दिव्यवाणीनें उत्तर दिलें— " तुमचा आमचा मार्ग एकच आहे. फरक आहे केवळ दृष्टीत. तुम्हाला जें श्रेयस्कर. प्रिय व हितकर वाटतें तें आमच्या दृष्टीनें हानिकारक वाटते. तुमच्या दृष्टिकोणात वासना, मोह आणि ममत्व. तर आमच्या दृष्टिकोणात निर्ममत्व ! आमच्या दृष्टीत समत्व तर तुमच्या दृष्टीत ममत्व. तुम्हीं इंद्रियांचे व मनाचे गुलाम. ही गुलामी आजची नाही. अनंत युगाची आहे. तिला मी झुगारून देईन व मोकळा होईन हा विचार म्हणजेच विवेक. आत्मसूर्याचें दर्शन म्हणजे विवेक. आत्मीय विविध गुणांची जाणीव म्हणजें विवेक ! आत्म्यावरील प्रचण्ड निश्चल श्रद्धा म्हणजे विवेक !

" आणि ही निष्ठा जागृत कशी करावी ? " — भरतानें विचारले.

" साधु – संतांच्या संगतीत राहून. अग्नीच्या संसर्गानें कोळसा जमा

तेजस्वी होतो तसा. सत्संगाचा महिमाच आहे. हे आयुष्यमन्, माझ्या जीवनांतीलच एका प्रसगाची आठवण करून देतो. माझी दृष्टि निर्मळ व्हायला, माझ्या मनात विवेक निर्माण व्हायला असाच साधुसंतांचा समागम मला मागील एका जन्मात घडला होता.

त्यावेळी मी देखील तुझ्या सारखाच तीर्थंकराचा पुत्र होऊन विदेह क्षेत्रांतील भोगभमीत जन्माला आलो होतों. माझें त्यावेळचें नांव वज्रनाभि होतें. व माझ्या वडीलाचे नांव वज्रसेन होते. पिताजीच्या योग्य संस्कारांनी माझें ही मन सुसंस्कारित झालें होतें. तुझ्या प्रमाणेच चक्रवर्तीत्व मी मिळविलें होतें.

एके शुभदिनी मी त्यांच्या धर्मसभेंत गेलों तीर्थंकरांचें चरणाजवळ असंख्य मुनि, ऋषि, साधु आणि श्राविक – श्राविका होत्या. तीर्थंकराच्या दिव्य उपदेशाने माझ्याही मनात मगल भावनाचा उद्रेक झाला. सर्व प्राणिमात्रांच्या ठायी असलेल्या आत्म्यांचा मला साक्षात्कार झाला. सर्वांचे हित व्हावे असे तीव्रतेनें मला वाटू लागलें. सर्वांच्या हितासाठी आपण तीर्थंकर व्हावें अशी मंगलकामना मनात अंकुरली. आणि सुदैवानें त्याचवेळीं मी देखील तीर्थंकर होणार अशी दिव्यवाणी पूज्य वज्रसेनांच्या तोंडून मी ऐकली. तो माझ्या अनंत आयुष्यक्रमांतील फारच मोलाचा क्षण होता. माझ्या उन्नतीची ती पहिली पायरी होती. आध्यात्मिक वसंताच्या शुभागमनाची ती पूर्व सूचना होती.

श्रीप्रभूच्या तोंडून त्यांच्याच जीवनांतील महत्वाची गोष्ट कळाल्यामुळें सर्वांनी उच्चरवानें " साधु ! साधु ! " असा घोष केला.

श्रीभरताने पुन: प्रश्न केला –

" या संसाराला संक्षेप कसा द्यावा हें कृपा करून सांगाल कां ? "

भगवान म्हणाले, " भरतेशा, तुझ्या या प्रश्नांत सर्व प्रश्न आले आहेत. हा प्रश्न विचारून तूं धर्माचे रहस्य जाणूं इच्छितोस. ऐक तर मग –

" जे सामान्य लोक असतात ते काम – मोहांत, वासनेंत, क्रोधादिक विकारांत मग्न असतात. त्याना संसारातील प्रत्येक गोष्टीचें आकर्षण वाटतें.

तेथें संतसमागम असेल तर मार्ग सापडतो. अन्यथा या संसार चक्रांतच तो गुरफटून राहतो.

" भरतेश्वरा, प्रत्येकाचा देह हाच एक तू ग्रंथ समज. त्या देहाकडे पहा. तो देहच तुला नश्वरतेचे व अशुचित्वाचे पाठ देईल तुझ्या आत्म्या-भोवतालचें पहिलें बंधन म्हणजेच हा देह ! मांस, रक्त, हाडें यावर पसरलेली तुझी दिव्य कातडी नसतीतर तो देह किती घृणास्पद वाटला असता ! या देहाचे लाड पुरविण्यासाठी किती यातायात, किती यातना, किती परिश्रम ! इतके परिश्रम करून वाढविलेला देह एके दिवशीं त्यातील चैतन्य निघून जातांच तो स्पर्शास देखील अपात्र ठरतो. "

अशा प्रकारें श्री आदिप्रभूनी विविध उदाहरणानी संसारांतील नश्वरतेचें वर्णन केलें.

अनेक लोकानी त्यावेळी दीक्षा घेऊन संघांत प्रवेश केला. त्यांना उद्देशून परमयोगी वृषभ म्हणाले,

" वैराग्य होणं जरी सोपं असल तरी तें टिकविणं फारच कठिण आहे. आंतरिक निर्वेद — आंतरिक व्यामोह सुटल्याशिवाय हा संसार सुटत नाहीं. नवदीक्षित श्रमणानो, तुम्ही आज प्रव्रज्या घेतली आहे. सर्व परिग्रहांचा तुम्ही त्याग केला आहे. सर्व वस्त्राचा तुम्ही त्याग केला आहे. अहिंसा हें तुमचें शस्त्र आहे. तेच तुमचे वस्त्र आहे. शरीराने तुम्ही अहिंसक व्हा, मनाने अहिंसक व्हा, वाचेने अहिंसक व्हा ! तुमच्या सद्विचाराचें तुम्हीं रक्षक बना ! पहिला हल्ला आतून होतो हें विसरू नका. तुमचा खरा शत्रु व मित्र म्हणजे तुम्हीच !

" ज्ञान हा तुमचा परम मित्र आहे. कोणतीही गोष्ट ज्ञानपुरस्सर करा. ज्ञानी माणूसच कर्मबंधने तोडून मुक्त होऊं शकतो. तुमचें तपश्चरण, तुमची व्रतें, तुमचे आचरण यांत ज्ञानाचा वापर करा. अज्ञानी माणसानें केलेलें तप म्हणजे देह दण्ड होय. त्यानें मोक्षप्राप्ति होत नाहीं.

" हे भिक्षूंनो, तुमच्या आहारासाठीं तुम्ही भ्रमरासारखे असावें. भ्रमर ज्याप्रमाणे मधाचा स्वीकार करतांना फुलांना त्रास देत नाहीं तसें वागावें.

मुक्तीची कल्पनाही त्याच्या ठिकाणी नसते. इंद्रियांच्या मार्फत मिळणारें तुच्छ सुखच त्याना खरें सुख वाटतें. वर्तमानकाळाचाच ते विचार करतात म्हणून त्याना खरा मार्ग सांपडत नाही."

" मुक्तीचा मार्ग तसा नाही. विकाराच्या, वासनाच्या आवरणांनी तो अटकत जातो. कर्मरजाने त्याचे सद्विचार व सदाचार काळवडून जातात. हाच ससार आहे. जन्म — मरणाच्या फेऱ्यांत आपण सांपडतो. अमर असलेला आत्मा क्षणोक्षणी मृत्यूच्या भीतीनें घाबरतो मरणाची तरवार सारखी टांगली असताना तो भासमान सुखात रमून जातो. हेच न उलघडणारे कोडें आहे. संसाराहून काहीतरी वेगळें विश्व आहे जिथे माणूस अनत ज्ञानी, अनत सुखी, अनंत शक्तिमान असू शकेल असें ही एक आगळें विश्व आहे याची त्याला कल्पना येत नाही.

" कर्मबंधनामुळें त्याला स्वातंत्र्याचा विसर पडतो. फार वर्षे तुरुगात असलेल्याला बाह्य विश्व नकोसें वाटते. त्यात तो रमत नाही. तसेच आपले होतें. भरता, पारतंत्र्य ही अशीच मादक वस्तु आहे. त्या वस्तूची गुगी मानवास चढली की स्वातंत्र्याचें तो नाव काढीत नाही. क्षात्रतेज लोप पावतें. पौरुष सेवेत व लाचारीत बदलतें. अनंत शक्तिमान आत्मा क्षुद्र कीटकाप्रमाणें भासूं लागतो. भरता, संसार म्हणतात तो हाच जें नाही ते तसें आहे असें दिसावें. पाण्याच्या भासानें मृगानें सारखें पळत रहावें व त्यास पाणी तर प्यावयास मिळूं नये. अथांग सांगरात उभें राहूनही तृषार्त रहावें, कल्पवृक्षाखाली राहूनही क्षुधार्त रहावें हाच ससार !

" हा प्रिय असणारा संसार व त्यातील सुख हे अनित्य आहे, क्षणिक आहे. समर्थ अशी एक ही व्यक्ति नाही जी तुमचे मृत्यू पासून सरंक्षण करून तुम्हांला आश्रय देईल. कधी नरकात, कधी पशुयोनीत, कधी स्वर्गात, कधी मानवयोनीत, तूं जन्म घेतोस. परंतु या जन्म — मरणाचें कारण जाणून घेण्याचें भानही न रहावे हीच ससारांतील आश्चर्यजनक गोष्ट होय. एकटाच जन्म घेऊन एकटयालाच येथून निघून जावे लागतें असे स्पष्ट दिसत असतां ममत्वाने " हें माझें, हें माझें " तो म्हणतो. भरतेश, विकासाचा मार्ग व विनाशाचा मार्ग प्रत्येकाला व्यक्तिशः च ओळखावा लागतो.

तेथें संतसमागम असेल तर मार्ग सापडतो. अन्यथा या संसार चक्रांतच तो गुरफटून राहतो.

" भरतेश्वरा, प्रत्येकाचा देह हाच एक तूं ग्रंथ समज. त्या देहाकडे पहा. तो देहच तुला नश्वरतेचे व अशुचित्वाचे पाठ देईल तुझ्या आत्म्याभोवतालचें पहिलें बंधन म्हणजेच हा देह ! मांस, रक्त, हाडें यावर पसरलेली तुझी दिव्य कातडी नसतीतर तो देह किती घृणास्पद वाटला असता ! या देहाचे लाड पुरविण्यासाठी किती यातायात, किती यातना, किती परिश्रम ! इतके परिश्रम करून वाढविलेला देह एकें दिवशीं त्यांतील चैतन्य निघून जातांच तो स्पर्शास देखील अपात्र ठरतो. "

अशा प्रकारें श्री आदिप्रभूनी विविध उदाहरणानी संसारांतील नश्वरतेचे वर्णन केलें.

अनेक लोकानी त्यावेळी दीक्षा घेऊन संघांत प्रवेश केला. त्यांना उद्देशून परमयोगी वृषभ म्हणाले,

" वैराग्य होणं जरी सोपं असलं तरी तें टिकविणं फारच कठिण आहे. आंतरिक निर्वेद -- आंतरिक व्यामोह सुटल्याशिवाय हा संसार सुटत नाहीं. नवदीक्षित श्रमणांनो, तुम्ही आज प्रव्रज्या घेतली आहे. सर्व परिग्रहांचा तुम्ही त्याग केला आहे. सर्व वस्त्रांचा तुम्ही त्याग केला आहे. अहिंसा हे तुमचें शस्त्र आहे. तेंच तुमचे वस्त्र आहे. शरीराने तुम्ही अहिंसक व्हा, मनाने अहिंसक व्हा, वाचेने अहिंसक व्हा ! तुमच्या सद्विचाराचे तुम्ही रक्षक बना ! पहिला हल्ला आंतून होतो हें विसरू नका. तुमचा खरा शत्रु व मित्र म्हणजे तुम्हीच !

" ज्ञान हा तुमचा परम मित्र आहे. कोणतीही गोष्ट ज्ञानपुरस्सर करा. ज्ञानी माणूसच कर्मबंधनें तोडून मुक्त होऊं शकतो. तुमचें तपश्चरण, तुमची व्रतें, तुमचें आचरण यांत ज्ञानाचा वापर करा. अज्ञानी माणसाने केलेलें तप म्हणजे देह दण्ड होय. त्यानें मोक्षप्राप्ति होत नाही.

" हे भिक्षूंनो, तुमच्या आहारासाठीं तुम्ही भ्रमरासारखे असावें. भ्रमर ज्याप्रमाणें मधाचा स्वीकार करतांना फुलाना त्रास देत नाही तसें वागावें.

" हे साधकांनो, तुमच्या मार्गातील अडथळे तुम्ही जाणून घ्या. भूक, तहान, म्हातारपण व रोग यामुळें तुमची शांति ढळूं देऊ नका. लोकांनी तुमच्या मार्गात काटे पसरले तरी त्यांच्यासंबंधी मैत्रीची भावना कायम ठेवा. समता हा तुमचा स्थायीभाव असावा.

" कटु भाषण तुम्ही करूं नये. तुमच्या वाणीने तुम्ही सारे जग आपलेसे करावे. हें न असले तर मौनाचा स्वीकार करावा. "

" जेव्हा जगण्याचें सर्व मार्ग अवरुद्ध होतील त्यावेळी लाचारपणे दीक्षेचा त्याग न करतां अत्यंत शांतीने देहाचा त्याग करावा. "

सर्व भिक्षूंनी श्रीप्रभूंना वंदन केले. श्रमणांना योग्य अशी महाव्रते त्यांनी घेतली. सारी सभा तटस्थ होती. श्रीप्रभूंच्या दिव्यवाणीरसानें भिजलेलीं त्यांची मने अकल्पित आनंदाचा आस्वाद घेत होती.

स्वर्गीय देवतांनी कल्पसुमनाचा वारंवार वर्षाव केला. त्या फुलांच्या सुवासानें आधींच भारावलेलें वातावरण अधिकच मोहक झाले.

० ० ०

*आपल्या दिव्यवाणीने अमृतवर्षाव करणाऱ्या श्रीवृषभांची काय थोरवी* वर्णावी ! धर्मोपदेश करताना, वस्तुस्वरूपाचे खरेखुरें दिग्दर्शन घडविताना, मानवाच्या मूलभूत समस्यांना युक्तियुक्त उत्तरें सांगतांना कशाचीहि अपेक्षा न करणाऱ्या मृदंगाप्रमाणें ते निरपेक्ष असत. दीपाचे कार्य वाट दाखविणे एवढेंच ! मार्गातील अडचणी दाखवून उत्कृष्ट मार्ग कोणता हें दाखवितांना श्रीवृषभाची दिव्यवाणी न्यूनतेनी रहित होती.

त्यानंतर श्रीवृषभांचे सर्वश्रेष्ठ गणधर वृषभसेन सर्व नव दीक्षितांना म्हणाले,

"हे परिव्राजकांनो, तुम्ही धन्य आहांत. महर्षि आदिनाथांच्या महातीर्थांत तुम्ही प्रविष्ट झाला आहांत. आज खालील मंत्रांनी तुम्हास आम्ही पवित्र करीत आहोत याच दिव्य मंत्रांनी श्रावकानी आपल्या मुलाना शिक्षण संस्काराच्या वेळी, उपनयन संस्कारच्या वेळी, विवाह संस्काराच्या वेळी पवित्र करीत असावे. या दिव्य मंत्राच्या जपाने इष्ट, दिव्यसिद्धीची प्राप्ति होते."

असं म्हणून त्या गणधराने अत्यंत धीर गंभीर स्वरांत मंत्रोच्चार करावयास प्रारंभ केला. त्या मंत्राचे निनाद सर्वत्र घुमूं लागले—

"सत्य जाताय नमः, अर्हज्जाताय नमः, परम जाताय नमः, अनुपम जाताय नमः, अक्षयाय नमः, अव्याबाधाय नमः, अनंत दर्शनाय नमः, अनंत वीर्याय नमः, अनंत सुखाय नमः,

नीरजसे नमः, निर्मलाय नमः, अच्छेद्याय नमः, अभेद्याय नमः, अजराय नमः, अमराय नमः, अप्रमेयाय नमः, अगर्भवासाय नमः, अक्षोभाय नमः, अविलीनाय नमः, परमघनाय नमः, परमकाष्ठयोगाय रूपाय नमः, लोकाग्रवासिने नमः, परम सिद्धेभ्यो नमः, अर्हत्सिद्धेभ्यो नमः, केवलि सिद्धेभ्यो नमः, अंतःकृत सिद्धेभ्यो नमः, परम्पर सिद्धेभ्यो नमः, अनादि परम्पर सिद्धेभ्यो नमः, अनाद्यनुपम सिद्धेभ्यो नमः, सम्यग्दृष्टे, सम्यग्दृष्टे, आसन्नभव्य, आसन्नभव्य निर्वाण पुजार्ह, निर्वाण पूजार्ह, अग्नीन्द्र स्वाहा, सेवाफलं षट् परमस्थानं भवतु, अपमृत्यु विनाशनं भवतु, समाधिमरणं भवतु।"

अशा प्रकारें उपरोक्त दिव्य मंत्राची सविस्तर माहिती सांगून श्रीगणधरांनी सर्व नवदीक्षितांना संघांतील आचार धर्माची पूर्ण कल्पना दिली

हा सर्व देखावा फारच रमणीय होता. भारतातील साधु परम्परेचा तो जणु श्रीगणेशा होता आध्यात्मिक संस्कृतीचा पायाच जणु त्या मंगल-प्रसंगाने घातला गेला होता

भरतेश्वराचें भाऊक मन भरून आलें आनंदाश्रूंनी त्याची लोचनें ओली झाली. ज्या देशातील जनता साधुजनांची निर्मिती करू शकते, त्यांना परमोच्च आदर अर्पण करते तो देश खात्रीनें महान होय. साधु म्हणजे देशाचा मानदंड ! त्यांची सेवा मानवाला अखण्डपणे जीवनावर प्रेम करायला शिकविते, रंजल्या गांजल्यांचे ते वाली असतात. त्यांच्या सेवेत आपली जीवनें अर्पण करतात आपल्या आचरणानें, नवा धर्म, नवें युग ते निर्माण करतात. त्यांचा उदरनिर्वाह हा सेवेसाठी, चन्दनासारखे झिजण्यात, दीपाप्रमाणे प्रकाश देण्यात, ते रमून जातात आपल्या उपजीविकेचा भार वाटेल असे ते कधीच वागत नाहीत. अशा साधुसन्तांचा चरणांची धूळ मस्तकी धारण करावी असें भरताला वाटलें.

० ० ०

त्यानन्तर श्रीवृषभसेन गणधर सर्व सभेला उद्देशून म्हणाला–

" आजची सभा शेवटची सभा आहे. आपल्या जीवनात मांगल्याची सुप्रभात आणणारे, सर्व जीवांना कल्याणाचा मार्ग दाखविणारे, संयमतीर्थाचे प्रवर्तक असलेले, सर्वश्रेष्ठ यति श्रीवृषभ पुन: आपणास दिसणार नाहीत. "

त्यांचा विहार पूर्ण होत आहे मृत्यूच्या शृंखला तोडून उरलें सुरले सूक्ष्मयोगाचें आवरण तें जाळून भस्म करणार आहेत.

उद्यां पौष महिन्यातील पौर्णिमा आहे. श्रीप्रभूचा विहार हिममंदिर

कैलासगिरीवर होईल. तेथील प्रशांत वातावरणांत अवशिष्ट कर्मबंधनें प्रभु तोडून टाकतील. त्यांचा दिव्य व पवित्र योगात्मा हा संसार सोडून लोकाच्या अग्रभागीं जाईल. अगदी निर्लेप होईल. ती मंगल ज्योत आपणास पुनः दिसणार नाही

आदिप्रभूचे मंगल दर्शन पुनः होणार नाही. ही हृदयांतील स्निग्धताच जणुं आटून जाणार होती. अलौकिक प्रेमाचा वर्षाव करणारा पितामह अचानक साऱ्यांना सोडून मोक्षगामी होणार होता.

प्रभूच्या नामाचा गजर झाला. साऱ्यांनी आपआपली मनें गोंवरली. त्या पवित्र समयी अश्रू नको होते. आनंदाचा वर्षाव हवा होता इंद्रादिकांनी सुवासिक पुष्पांचा वर्षाव केला मंगल गीतें गायली जाऊं लागली.

सभा संपली होती. केवळ सभेतील साधु आणि साध्वी तेथें होत्या

सध्याकाळच्या शुभमुहूर्तावर दिव्य देहधारी श्रीवृषभ सर्व कर्मक्षयासाठी कैलास गिरीवर जावयास निघाले. अनेक पक्षांच्या मंगल रवानें त्यांचे स्वागत झालें. हिमशीतल वारा वाहू लागला आपली पाऊलें उमटवित श्रीवृषभ वेगानें शिखरावर निघाले त्यांच्या पाठीमागें हजारों श्रमणांची रीघ लागली दिव्य संस्काराची परंपरा, भारतीय संस्कृतीचा महान आदर्श जणु कैलासगिरीनें आपल्या माथी धारण केला.

कैलास ! धन्य धन्य त्या कैलासाची जगद्वंद्य महापुरुषाचा सहवास त्याला घडत होता. तपःसाधनेचा अंतिम क्षण त्यांच्या कुशीत घालविला जात होता. जीवनज्योतीची अंतिम परिसमाप्ति त्याला पहावयास मिळत होती त्या तपश्चर्येत तोही सहकार्य करीत होता त्याला तो सांगत होता —

" जपून तू जा माझ्या डोंगरावर महेंद्रवंद्य योगींद्र आहेत. मानवांतील महामानव माझ्या घरी आले आहेत. क्रोध, मान, माया, लोभ, यांचा नाश करणारे धीर पुरुष आले आहे. अग्नीनें गवत जळावें तसें तपोग्नीनें त्यांची कर्में जळत आहेत. सारें शरीर, कापूर जसा हवेंत उडून जातो, तसें क्षय पावत आहे अशा वेळी शांततेचा भंग करू नकोस.

" इष्ट पदार्थांच्या प्राप्तीने हरखून जाणाऱ्या आणि अनिष्ट पदार्थांच्या

प्राप्तीनें शोकाकुल होणाऱ्या इतर मानवाप्रमाणें हे नाहीत. त्यानी महायज्ञ मांडला आहे त्या महायज्ञाच्या अग्नीला तूं मदत कर. तुझें माहात्म्य मिळाले तर आम्ही जन्ममरणाची सर्व बंधनें तोडून अमर, अविनाशी, अक्षय होतो."

हजारो महातपस्वी इतस्ततः बसले होते. ते सर्व ध्यानस्थ होते. आत्मचिंतनात मग्न होते. विकल्पसंकल्पाचे तरंग त्याच्या मनातून नष्ट होत होते. दिव्यगांभीर्य निर्माण होत होतें कधीही क्षय न पावणारे ज्ञान, दर्शन, सुख आणि वीर्य याच्या योगें चिरसमाधी–सुखाचा अनुभव श्रीवृषभाना येत होता ज्याचे सदैव चिंतवन करावे असा एकच पदार्थ होता तो म्हणजे आत्मा. त्याचे ध्यान परमशुक्ल होते. सूर्य जें काम करतो तेंच काम हें ध्यान करण्याने होतें. आत्मिक मळ जळून खाक होतो. मनाच्या व वचनाच्या सूक्ष्म हलनचलनाला रोकून नंतर शारीरिक स्पंदनालाही विराम देणारे हे ध्यान सूक्ष्मक्रिया प्रतिपाति नांवाचे असतें. ही ध्यान क्रिया मोटमोठ्या योगानाही अशक्य होती. त्यानंतर श्रीवृषभानी शेवटले शरीर व कर्माच्या त्यागाचे व्युपरतक्रियानिवर्ती नावाच्या सर्वोत्तम ध्यानाला सुरुवात केली. फारच कमी कालावधीचे हे ध्यान म्हणजे सर्वोच्च सुखाचे दार उघडे करणारे द्वारपालच होय. पाच स्वर म्हणायला जितका वेळ लागेल तितक्या वेळात त्यानी हा नश्वर देह टेवला. त्याची दिव्यज्योत हे नश्वर जग सोडून निर्वाण पावली तो दिवस माघ कृष्ण चतुर्दशीचा होता.

इंद्रादिक देवानी पुष्पवृष्टि केली. एक महान ऐतिहासिक पर्व आटोपले होते. श्रीभरतही तेथें दाखल झाला होता. अनेक सामंतही हजर होते. भरताचे हृदय शोक विव्हल झाले त्याच्या डोळ्यातून अश्रुधारा वाहू लागल्या. मन बधिर झाले. संवेदना नष्ट झाली. पिताजीचें निर्वाण हा जणु वज्राघातच होता. एखाद्या लहान मुलासारखा तो रडू लागला.

इंद्राच्या आज्ञेवरून अग्निदेवानें तीन अग्निकुंडाची रचना करण्यांत आली एक अग्निकुंड श्रीवृषभांच्या देहाच्या अग्नि संस्कारासाठी होते. दुसरें श्रेष्ठ गणधराच्या व तिसरे सामान्य केवलीच्या अग्निसंस्कारासाठी होते.

त्या अग्निकुंडांची पूजा करण्यात आली.

श्रीवृषभांच्या शरीराला अग्निदेवानें स्पर्श करतांच मंगलअग्निच्या महवासानें त्या देहाचें दहन सुरु झालें. अनेक सामंत, राजे, महाराजे व इतर लोक सारखे रडत होते. त्यांचा महान उपकारकर्ता आज दिसत नव्हता. भरताला तर कांही एक सुचत नव्हते. अग्निकुंडांतील ज्वाला वरखाली होत होत्या. जणुं मृत्यूचें ताण्डवच चालू होते. आपल्या लाल – निळ्या जीभा दाखवून तो अग्नि जगु सर्वांना हेंच सांगत होता की हे मानवानो, श्रीवृषभसारख्यांचे शरीरही जियें नाश पावते तिथें तुमचे काय? सर्वभक्षी काळाचा हस्तक म्हणजे मीच!

भरताचे मन शोकाग्नीने जळत होतें. काय विचार करावा, कसें मन शांत करावे हें त्याना सुचत नव्हते.

थोड्याच वेळात नश्वर शरीराची राख झाली. अग्नि शांत झाला. कुंडाभोवती हजारों देव, सहस्रावधि ऋषि–महर्षि आणि लक्षावधि मानव उभे होते. सर्वांच्या मनांत वैराग्याची अस्पष्टशी छटा उमटली होती.

त्यानंतर इंद्रादिक देवानी ती राख आपल्या मस्तकाला लावून स्वत:ला धन्य मानले. नंतर ती राख रत्नमय करंडात गोळा करुन स्वत: इंद्राने ती क्षीर समुद्रांत नेऊन टाकली.

ज्या ठिकाणी प्रभू निर्वाण पावले त्या ठिकाणी इंद्राने रत्नखचित स्तूप उभा केला. लक्षावधि दिव्यदीपज्योतींनी कैलास देदिप्यमान दिसू लागला. पधरा दिवस व पधरा रात्री हा महोत्सव चालू होता. भारतखंडांतील अलौलिक आत्मा निराम पावला होता. इंद्राने आपल्या देवदेवताना सारे कैलास सुशोभित करावयास आज्ञा केली होती लक्षावधि विविधरंगी पताकांनी ते शिखर भूषविलें गेलें होतें. स्वर्गीय नर्तिका आपल्या नूपुररवांनी वातावरण मुखरित करीत होत्या. गंधर्वांच्या गायनाने सारें वातवरण मधुर व सुखद झाले होते.

हा निर्वाण सोहळा फारच गाजला. सर्वत्र श्रीवृषभांची कीर्तिगीतें गायली गेली. हिममंडित कैलासाला श्रीवृषभांच्या सहवासाने तीर्थक्षेत्राचें महत्व प्राप्त झालें. इतकेंच नव्हे तर कैलासवासी होण्याला जीवनात महत्वाचें व मानाचे स्थान प्राप्त झालें.

० ० ०

या महोत्सवात श्री भरताने भाग घेतला असला तरी त्याने मन रमले नव्हते. इंद्रादिकांनी केलेल्या नाटकात श्री वृषभाचें पूर्व जन्मीचें चरित्र रंगविले होते. त्यामुळे पिताजींची आठवण ताजी झाली. श्री भरतेशाचे अश्रू थाबत नव्हते. शेवटी त्याला त्याच्या मोठ्या बंधूने, वृषभसेन गणधराने संबोधित केले—

ते म्हणाले, " भरतेश्वरा, तुला सर्वलोक एवढा विद्वान समजतात. जगांतील सारभूत तत्व काय आहे हे तू स्पष्ट जाणतोस असे असून हा शोक तू का आवरीत नाहीस ? मानवाच्या जन्माबरोबर मृत्यूची घटका निश्चत झालेली असते. उदय म्हटला की अस्त आलाच. आदि म्हणाला की अंत येतोच. हेच जन्ममरणाचें दुष्ट चक्र तोडून आपले पिताजी सिद्ध झाले आहेत. याच लोकाच्या अग्रभागी असलेल्या सिद्धशिलेवर ते अनंतसुखात मग्न आहेत. त्या दिव्यरम्याचे ज्ञान हेच परमतेजस्वी शरीर आहे

" हे भरत राजेश्वरा, मोहाने तुझी बुद्धि संभ्रमित झाली आहे ज्या पिताजींचा तुला शोक होत आहे त्याचे चरित्र तुला ठाऊकच आहे. तूच नाही का तुझ्या ' आनंद ' नावाच्या नाटकात श्री वृषभाच्या दहाजन्माचें चरित्र वर्णिले होते. प्रथम जयवर्मा नंतर क्रमाने महाबलराजा, ललितांग देव, वज्रजंघ चक्रवर्ति, भोगभूमीतील आर्य, श्रीधरदेव, राजा सुविधि नंतर पुन: अच्युतदेव, त्यानंतर राजा वज्रनाभि आणि शेवटी, सर्वार्थसिद्धींतील अहमिंद्र अशा प्रकारे दहा जन्मात तूच नाही का त्याचे जीवन वर्णिले होते. खऱ्या अर्थाने संसाराचे नाटकच नाही का तू दर्शविलेस ?

तुझी देखील हीच अवस्था झाली. तू एकेकाळी अतिगृद्ध नावाचा राजा होता. पापामुळे तू नरकात गेलास तेथे नाहीनाही ती दु:खे भोगून तू याच पृथ्वीवर व्याघ्र होऊन जन्मलास. मुनीच्या उपदेशाने तू देव होऊन स्वर्गात जन्मलास अशा प्रकारे जन्म-मरणाचा फेरा चालू होता मागच्या जन्मात तू अहमिंद्र देव होता तेथून तू वृषभाच्या पोटी भरत होऊन जन्मलास. तुझें भाग्य समज की तूही याच जन्मांत या जन्ममरणाचे अविरत चालत आलेले पाश तोडून मुक्त होशील."

भरताचे मुमुक्षु हृदय निवले, तेथेही विवेक निर्माण झाला. भरतेश्वराचे चित्त शांत झाले. मनातील ममत्वाची भूमिका तत्वज्ञानाने घेतली. सतत जन्म-मरणाच्या फेऱ्यात सापडणाऱ्या परंतु अनंतशक्तीचा महासागरात असलेल्या आत्म्याचे सम्यग्दर्शन झाले. मनावरील शंकाचे तीव्र दडपण कमी झाल्यावर आपल्या परिवारासह तो अयोध्येला परतला. परतताना त्याचे चित्त उल्हसित झाले

अयोध्येस आल्यावर तेथे त्याने पिताजीच्या निर्वाणाचा फारच मोठा सोहळा केला. तीन्ही वर्णांना अपार संपत्तीचे दान केले व त्याना संतुष्ट केले. राजधानीस दानतीर्थाचे स्वरूप प्राप्त झाले. भरतेश्वरही प्रमुदित झाले. स्वत: निर्माण केलेल्या ब्राम्हणवर्गाला त्याने फारच प्रेमादराने आमंत्रित केले त्याना रत्न, हिरे, माणके आणि सुवर्ण यांचे दान करून त्यांना संतुष्ट केले. भरत त्याना उद्देशून म्हणाला—

"दान हे या पृथ्वीतलावरील महान तत्व आहे. मानवजातीला तिलकभूत असलेला हा धर्म आहे भुकेलेल्याना अन्नदान, रोग्याना औषध-दान, भ्यालेल्यांना व दीनांना अभयदान आणि अज्ञानीजनाना ज्ञानदान अशी चार दाने देण्यात जेथील जनता स्वत:ला धन्य मानते तो देश समुन्नत होय"

ब्राह्मणानी भरतेश्वराला असे अभिवचन दिले की दारिद्र्य पत्करूनही *ज्ञानदानाचे व धर्मसेवेचे कंकण आम्ही बांधू कल्याहि मोहितलेला, लोभ-*प्रलोभनाना बळी पडून ब्राह्मणत्व आम्ही सोडणार नाही. खरे तत्व सांगतांना प्राणाची पर्वा करणार नाहीं. सर्वजनकल्याणाचा हा काटेरी मार्ग सोडून

आम्ही हीनदीन होणार नाहीं.

भरतेश्वराला त्यामुळें समाधान वाटलें. कारण धर्म, अर्थ आणि काम हे तीन पुरुषार्थ साधतांना परस्परांचा विरोध येणार नाही असे तो स्वतः वागत होता. धर्मसाधनेत कौटुंबिक जबाबदारी त्याने टाळली नव्हती. वैभवाच्या उपभोगात धर्मसाधनेकडे दुर्लक्ष केलें नव्हतें. व्यावहारिक जीवन सुखी बनविण्यासाठी अर्थाची – पैशाची आवश्यकता आहे. पण तो ध्येय नव्हे. साधन होय. साधनांना ध्येय करून तो आत्मसाधनेपासून कधीच ढळला नव्हता. हेच सत्य त्याने सर्वांपुढें मांडलें होतें. गृहस्थी जीवन कसे सुखी करावें हा पाठ त्यानेच जगापुढें मांडला होता. मैत्रीची भावना, क्षमता, दुःखी जीवांना पाहून करुणाभूत होण्याची भावना, आणि जे मार्गभ्रष्ट आहेत त्यांच्या बाबतीत माध्यस्थ वृत्ति या चार महत्त्वाच्या गोष्टी त्याने जगाला शिकविल्या होत्या.

सम्राट्पद मला तुच्छ वाटत आहे. या सर्व गोष्टींचा त्याग करून मीही कर्मरिपूंचा विनाश करावा असें वाटत आहे. आपल्या नित्य उपदेशाने माझ्या मनावरील आसक्तीची काजळी दूर झाली आहे. मी मला धन्य मानतो कीं प्रत्यक्ष सर्वज्ञ महावीरांचा सहवास मला घडला. गौतमासारखे महाश्रमण माझे मार्गदर्शक झालेत."

असें म्हणून श्रेणिकानें पुनः विनंती केली,

" हे प्रभो, श्रीभरतेशाच्या जीवनाचा अखेर कसा झाला हें सांगून मला उपकृत करावें."

श्रीगौतम म्हणाले, " हे राजा, भरत चक्रवर्ती असला तरी त्याला मोहाचा स्पर्श नव्हता. सरोवरांत कमळ जसें निर्लेप राहतें तसा तो सर्व भोगोपभोगातही निर्लेप होता. भोगात गुंतून राहण्याची त्याची मानसिक रचनाच नव्हती. निरासक्त जीवाचें असेच असतें. तो सर्व करूनही त्यांत रमत नाही. गुतत नाहीं जळालेला दोर जसा कुणास बांधू शकत नाहीं त्या प्रमाणे ज्याच्या वासना जळाल्या आहेत तोही बांधला जात नाहीं.'

एके दिवशीं आरशात पाहात असतां त्याला एक पांढरा केस दिसला. त्या केसाकडे पाहून तो म्हणाला —

" तुझाच मी शोध करीत होतो." मृत्यूचा जणुं ध्वजच होता तो पांढरा केस! भरताचें मन विरक्त झाले. त्याने सर्वप्रियजनाचा निरोप घेतला. राज्याची सर्व जबाबदारी आपला मोठा राजपुत्र श्रीअर्ककीर्ति याच्या शिरावर ठेवून त्यानें त्या राज्यसंपदेचा त्याग केला.

जंगलांत जाऊन एका भव्य शिलेवर त्याने ध्यान धरलें. निर्विघ्नपणें ध्यानात रमताच त्याला कैवल्य झालें. कैवल्य म्हणजे तिसरा नेत्र. चराचर जगताच्या खऱ्या स्वरूपाला जाणणारे ज्ञान म्हणजे कैवल्य! त्या कैवल्या-नंतरच इतर कर्ममळांचा नाश करायला त्याला उशीर लागला नाहीं. ज्ञानी माणसांची कर्मे नष्ट व्हायला कितीसा उशीर लागणार! एखाद्या साध्या वृक्षाचें कल्पवृक्षांत रूपांतर व्हावें तसें झालें. सम्राट् भरत आत्मसम्राट् झाला. मोक्षाचा अधिपति झाला. तीहि ज्योत निर्वाण पावली.

आम्ही हीनदीन होणार नाही.

भरतेश्वराला त्यामुळें समाधान वाटलें. कारण धर्म, अर्थ आणि काम हे तीन पुरुषार्थ साधतांना परस्पराचा विरोध येणार नाही असें तो स्वतः वागत होता. धर्मसाधनेत कौटुंबिक जबाबदारी त्यानें टाळली नव्हती. वैभवाच्या उपभोगात धर्मसाधनेकडे दुर्लक्ष केलें नव्हतें व्यावहारिक जीवन सुखी बनविण्यासाठी अर्थाची – संपत्तीची आवश्यकता आहे. पण तें ध्येय नव्हे. साधन होय. साधनांना ध्येय कल्पून तो आत्मपराङ्मुख कधीच झाला नव्हता. तेच तत्व त्यांने सर्वांपुढे मांडले होतें. गृहस्थी जीवन कसें सुखी करावें हा पाठ त्यानेंच जगापुढें मांडला होता. मैत्रीची भावना, क्षमता, दुःखी जीवांना पाहून कारुण्यमूत होण्याची आर्द्रता, आणि जे मार्गभ्रष्ट आहेत त्यांच्या बाबतीत माध्यस्थ वृत्ति या चार महत्वाच्या गोष्टी त्यानें जगाला शिकविल्या होत्या.

• • • •

अशाप्रकारें श्रीवृषभेशाचें महाचरित्र ऐकून भगवान महाश्रमण वर्धमानाच्या सभेंत आलेला सम्राट् श्रेणिक आनंदित झाला. प्रभू आदिनाथांची रसाळ कथा सांगतांना महर्षि गौतमही त्यात रमले होते.( अनंत योनींचा, जन्माजन्माचा पसारा टाकून श्री वृषभांच्या जीवनात झालेली क्रांति फारच बहारदार पद्धतीने गौतमाने वर्णिली होती.)

( सम्राट् श्रेणिक हात जोडून म्हणाला,

" हे महर्षि, आपण माझेवर फार उपकार केले मीहि याच मोह जालांत अडकलो होतों. तुमच्या अमृतवाणीने मी पुनीत झालों आहे) माझे

सम्राट्पद मला तुच्छ वाटत आहे. या सर्व गोष्टींचा त्याग करून मीही कर्मरिपूंचा विनाश करावा असे वाटत आहे. आपल्या नित्य उपदेशाने माझ्या मनावरील आसक्तीची काजळी दूर झाली आहे. मी मला धन्य मानतो की प्रत्यक्ष सर्वज्ञ महावीरांचा सहवास मला घडला. गौतमासारखे महाश्रमण माझे मार्गदर्शक झालेत. "

असें म्हणून श्रेणिकानें पुन: विनंती केली,

" हे प्रभो, श्रीभरतेशाच्या जीवनाचा अखेर कसा झाला हें सांगून मला उपकृत करावें. "

श्रीगौतम म्हणाले, " हे राजा, भरत चक्रवर्ती असला तरी त्याला मोहाचा स्पर्श नव्हता. सरोवरांत कमळ जसें निर्लेप राहतें तसा तो सर्व भोगोपभोगातही निर्लेप होता. भोगात गुतून राहण्याची त्याची मानसिक रचनाच नव्हती. निरासक्त जीवाचें असेच असतें. तो सर्व करूनही त्यांत रमत नाहीं. गुंतत नाहीं जळालेला दोर जसा कुणास बांधू शकत नाही त्या प्रमाणें ज्याच्या वासना जळाल्या आहेत तोही बांधला जात नाहीं. "

एके दिवशी आरशांत पाहात असतां त्याला एक पांढरा केस दिसला. त्या केसाकडे पाहून तो म्हणाला —

" तुझाच मी शोध करीत होतो." मृत्यूचा जणुं ध्वजच होता तो पांढरा केस ! भरताचें मन विरक्त झालें. त्यानें सर्वप्रियजनांचा निरोप घेतला. राज्याचीं सर्व जबाबदारी आपला मोठा राजपुत्र श्रीअर्ककीर्ति याच्या शिरावर ठेवून त्यानें त्या राज्यसंपदेचा त्याग केला.

जंगलांत जाऊन एका भव्य शिलेवर त्यानें ध्यान धरले. निर्विघ्नपणें ध्यानात रमतांच त्याला कैवल्य झालें. कैवल्य म्हणजे तिसरा नेत्र. चराचर जगताच्या खऱ्या स्वरूपाला जाणणारे ज्ञान म्हणजे कैवल्य ! त्या कैवल्यानंतरच इतर कर्ममळांचा नाश करायला त्याला उशीर लागला नाही. ज्ञानी माणसाचीं कर्में नष्ट व्हायला कितीसा उशीर लागणार ! एखाद्या साध्या वृक्षाचें कल्पवृक्षात रूपांतर व्हावें तसें झालें. सम्राट् भरत आत्मसम्राट् झाला. मोक्षाचा अधिपति झाला. दीहि ज्योत निर्वाण पावली.

" अशा प्रकारें, हे श्रेणिका, इतिहासांतील एक महापर्व इथें संपलें. तुझ्या पूर्वपुण्याईने व या कथेच्या श्रवणाने त्याच पदाला तू देखील जाशील."

असे म्हणून श्री गौतम मौन झाले.

सभा संपली. श्रेणिकाने वीर प्रभूची पूजा केली आणि तो राजवाड्यांत परत आला. श्रीवृषभाचे जीवन आठवण्यात, त्याच्या गुणाचे स्मरण करण्यांत, त्यानी सांगितलेल्या धर्मप्रवाहात रमून जाण्यांत त्याचे दिवस सुखात जात होते.

थोर पुरुषाच्या कथेने जो परिणाम घडतो तो शेंकडों तत्त्वग्रंथानें घडत नसतो, हेंच खरें.

० ० ०

## अखेर

ही कथा संपली. महापुराण म्हणजे सागर ! त्यातून वेंचून काहीसा सलग कथा भाग वाचकांसमोर ठेवला आहे. ही जीवनगाथा आहे महापुरुषाची. तिच्या वाचनाने मनावर संस्कार व्हावें व जडतत्वामुळें विचार – आचारावर चढलेली काजळी दूर व्हावी, आनंदाची निर्मिती व्हावी, हा हेतू ही कथा निरूपण करण्यात आहे.

या महान कथेंतील कथा भाग निवडतांना सर्वसामान्य वाचकवर्ग दृष्टिसमोर होता. महापुराण एक असले तरी तें वेगवेगळ्या महाकवींनी वेगवेगळ्या काळांत निरनिराळ्या भाषांत गाईलें आहे.

प्राकृत, अपभ्रंश, संस्कृत आणि कानडी या चार भाषेंतील महापुराण या कथेला आधारभूत आहेत. आधार महत्वाचा नाहीं. आधेय–कथावस्तु महत्वाची आहे. इकडे विनयाने मी आपलें लक्ष वेधूं इच्छितें.

